# श्रीमंत पंत अमात्य संस्थान बावडा

यांचें

# वंशवृत्त.



लेखक व प्रकाशक

रामचंद्र महादेव गोरे,

राशिवडें — संस्थान बावडा.



सन १९१५ इसवी.



किंमत एक रुपया.

# प्रस्तावना.



मराठीराज्यस्थापना, त्याचा विस्तार व त्याचें संरक्षण करण्यांत भादाणेकर कुलकर्णी—जे हल्लीं बावडेकर पंतअमात्य या नांवानें प्रसिद्ध आहेत—या घराण्यांतील पुरुषांचा फार मोठा विभाग आहे. ज्यांतील एका पुरुषानें एके वेळीं मराठीराज्यरूपी वृक्ष समूळ नाश पावत असतां अथवा पावलाच कीं काय असें झालें असतां त्यास तेजस्वी व पुष्ट केलें, ज्यानें पूर्वीं होऊन गेलेले व सांप्रत असणारे संस्थानिकांतील प्रतिनिधी, सचीव, घोरपडे, सेनापति इत्यादिकांचीं आणि पुष्कळ सरदारांचीं घराणीं उदयास आणिलीं व कोल्हापूरचें राज्य स्वतंत्र होण्याचा पाया घातला, अशा थोर पुरुषांच्या घराण्याची साद्यंत हकीकत मिळून ती प्रसिद्ध झाली असतां तीवरून महाराष्ट्राचे इतिहासाचा एक अंश पुरा झाल्यासारखें होईल. आजवर हें काम झालेलें नाहीं, आणि आतांही माझे कृतीनें तें पूर्ण होत आहे असें नाहीं. सांप्रत निरनिराळे ठिकाणीं ऐतिहासिक माहितीच्या प्रसिद्धीचें काम होत आहे व पुढेंही होत राहील. त्यांतून व इतरत्र जी माहिती मिळेल तीवरून यास पूर्णत्व येईल. येथें आजपर्यंत उपलब्ध असलेली माहिती एकत्र करून ठेविली आहे, इतकेंच.

हें काम विद्या, धन, दृढनिश्चय, उद्योगशीलता व साधनसामग्री यांनीं युक्त अशाकडून पुरें व्हावयाचें आहे. तोंपर्यंत माझ्यासारख्यानें जी माहिती निरनिराळे ठिकाणीं प्रसिद्ध आहे, जी प्रसिद्ध झालेली नसून कालांतरानें नाहींशी होईल व जीवरून योग्य ग्रंथकारास मदत

होईल अशी साध्य व उपलब्ध माहिती जशी ओबडधोबड स्थितींत मिळेल तशी ती एकत्र करून ठेवितां येईल तितकी ठेवावी, एवढेंच योग्य आहे. याच कारणासाठीं हा माझा प्रयत्न आहे.

या घराण्याचीं स्थलांतरें पुणें, शिवनेरी, राजगड, सातारा, विशाळगड, रांगणा, मालवण, पन्हाळा, गगनगड, या ठिकाणीं झालीं, आणि यांतील बरींच धामधुमीचे काळीं व कारणानें झालीं. यामुळें यांचें दप्तर सुरक्षित व एके ठिकाणीं राहिलें नाहीं. बहुतेक दप्तर साताऱ्यास राहिलें. सनदा व कांहीं कागद पन्हाळ्यास आले, आणि तेथून ते निरनिराळ्या ठिकाणीं फिरले. एके वेळीं रांगणा येथें व दुसऱ्या वेळीं गगनगड येथें अग्नीनें पुष्कळ कागदांचा नाश झाला. यांतून सनदा व कांहीं कागद मात्र वांचले. साताऱ्यास राहिलेल्या कागदांतील ऐतिहासिक उपयोगाचे कागद मे० ग्रांटडफ, एल्फिन्स्टन वगैरे इतिहासप्रिय युरोपीय लोकांनीं सर्वोत्तम बाबूराम अमात्य यांजकडून नेले. कांहीं सातारा येथील यांच्या वाड्यांत होते. कालांतरानें तो वाडा निरनिराळ्या लोकांच्या ताब्यांत गेल्यानें आतां तेथेंही शिल्लक राहिलेले नाहींत. यांजकडून गेलेलीं पत्रें, सनदा वगैरे महाराष्ट्रांतील व कर्नाटकांतील सरदार, इनामदार इत्यादिकांचे दप्तरीं सांपडण्याचा संभव आहे. तसेंच सातारा राज्याचें दप्तर पुणें येथें असून त्यांत यांचेविषयीं माहिती मिळण्यासारखे कांहीं थोडे कागद मिळतील असा संभव आहे.

यांचे दप्तरीं जे कागद मिळाले ते सर्व संगतवार नाहींत. यामुळें जेथें सर्व कागद संगतवार मिळत नसून तुटक अशा कागदांवरून संगति लावावी लागते व मिळालेले कागदावर वेळ, स्थळ, स्थिति हीं नमूद नसतां ठरवावयाचें असतें, अशा ठिकाणीं हें काम किती

त्रासाचें व दगदगीचें असतें व या कामीं वेळ व श्रम हीं किती व्यर्थ जातात याची कल्पना अशा कामीं खरे श्रम करणारावांचून इतरास व्हावयाची कठिण आहे.

हें चरित लिहितांना वर्णनाचा विस्तार न देतां सारांश देण्याचा प्रयत्न केला आहे. यांत काव्येतिहास संग्रहांतील कांहीं थोडे उतारे जशाचे तसेच दिले आहेत. बाकीच्यांतील व बखरींतील आणि कागदांतील तात्पर्यरूपानें दिले आहेत.

यांतील वर्णन खालीं दिलेले ग्रंथ व इतर आधार घेऊन तयार केलें आहे. मुख्यत्वें निळोपंत व रामचंद्रपंत यांचीं वर्णनें काव्येतिहास संग्रहांतील मराठ्यांच्या इतिहासावरील भागांचे आधारें लिहिलीं आहेत.

| | |
|---|---|
| १ काव्येतिहास संग्रह. | १ शाहूचें चरित्र. |
| १ राजारामाचें चरित्र. | १ अष्ट प्रधानांचा इतिहास. |
| १ शिवदिग्विजय. | १ पंतसचीव यांची बखर. |
| १ जुन्या बखरी. | १ सनदा. |
| १ इतर कागद व पत्रें. | १ ग्रांट डफकृत इतिहास. |
| १ एलफिन्स्टनकृत इतिहास. | १ प्रो० मोडककृत इतिहास. |
| १ कोल्हापूर ग्याझीटियरचें मराठी भाषांतर. | |
| १ रामदासाची बखर. | |

---

या वरील सर्व ग्रंथकारांचा मी अत्यंत उपकारी आहे.

या वंशचरित्राचे चार भाग केले असून पहिल्या भागांत मूळ ठिकाणचे पूर्वजांची व तेथील वतनासंबंधाचीं भांडणें वगैरेची माहिती आहे. दुसऱ्या भागांत मराठ्यांचें राज्य उदयास येऊं लागण्याच्या पूर्वी भोसले घराण्याशीं यांचा संबंध जडून सातारा व कोल्हापूर हीं राज्यें वेगळीं

होण्याचा समय येईपर्यंतच्या कालांतील माहिती आली आहे. तिसऱ्या भागांत संस्थानिक सामान्यत्वें मुखत्यारीनें वर्तत तोंपर्यंतच्या कालांतील माहिती असून चवथ्या भागांत त्या पुढील माहिती आली आहे. या शिवाय हल्लीं चालू असलेले संस्थानच्या प्रदेशाचे भूगोल व विशेष स्थलवर्णनासंबंधीं एक स्वतंत्र भाग दिला आहे. तसेंच एक संपूर्ण वंशावळ देऊन पहिल्या भागाकरितां एक व पुढील भागाकरितां एक अशा दोन तुटक वंशावळी दिल्या आहेत.

हल्लीं गादीवर विराजमान असलेले " **श्रीमंत माधवराव मोरेश्वर पंत अमात्य** " यांनीं हें वंशचरित्र लिहिण्याच्या कामाची आज्ञा मला देऊन दप्तर व सनदापत्रें पाहण्याची परवानगी दिली. यामुळें माझ्या मनांतील " घडेल तर कांहीं लिहावें " या इच्छेस प्रोत्साहन मिळून हें अल्पसें काम बाहेर आलें. याविषयीं मी श्रीमंतांचा अत्यंत उपकारी आहे.

हें अल्पसें वंशचरित्र लिहिण्याचें काम मजकडून करविल्याबद्दल जगन्नियंत्या परमेश्वराचे उपकार मानून ही प्रस्तावना पुरी करितों.

ग्रंथकर्ता.

**वाचकांस विनंति**:—या पुस्तकांत घालण्यासारखी माहिती ज्यास मिळेल किंवा ज्याकडे असेल, त्यांनीं ती मजकडे पाठविण्याची मेहेरबानी केल्यास मी त्यांचा उपकारी होईन, आणि सवड होतांच पुरवणीरूपानें ती प्रसिद्ध करीन.

ग्रंथकर्ता.

# अनुक्रमणिका.



नांव मिळत नाहीं.
काळोपंत
नारायण
गोविंद
सोनाजी
निळो
रामजी
मुरार
कृष्णा
नारो
(दत्तक गेले)
भानजी
नारो
मुरार
सोनाजी
नारो
(दत्तक)
आबाजी
निळो
रामचंद्र
नारो
शिवराम.
मोरेश्वर.
भगवंत.

निळो संस्थानस्थापक पहिले मुजूमदार.

|

रामचंद्र निळकंठ

|

भगवंतराव

|

कृष्णराव

|

सुबराव

|

मोरेश्वरराव — रामचंद्रराव

|

गोविंदराव

|

रघुनाथराव

|

रामराव

|

मोरेश्वरराव

|

माधवराव

|

परशुरामराव

श्रीरामचंद्र.

# बावडेकर पंत अमात्य हुकुमतपन्हा यांचें मूळवृत्त आणि वतनाची हकीकत.

## भाग १.

इसवी सनाचे पंधरावे शतकांत यांचे मूळपुरुष, भादाणें तर्फ सोनवळें प्रांत कल्याण ( कालियानी ) येथें राहत होते; आणि त्यांजकडे भादाणें, कुकसें ( कुक्ष ) वगैरे गांवचें वतनी कुलकर्ण होतें. हे ऋग्वेदी देशस्थ ब्राह्मण आहेत. बहुधा देशस्थ ब्राह्मणांत मुळचीं उपनांवें न राहतां तीं त्यांस गांवांवरून अथवा धंद्यांवरून नवीं प्राप्त होतात. त्यास अनुसरून यांस भादाणेकर असें नांव प्राप्त झालें.

इ० स० १४९० च्या सुमारास यांच्या पूर्वजांतील नारोपंत व काळोपंत असे दोघे बंधू एकत्र रहात होते. वडील नारोपंत हे मोठे धाडसी, पाणीदार व उदार प्रकृतीचे होते; परंतु द्रव्याभावामुळें त्यांचा प्रपंच सुखानें चालेना. त्यांस या स्थितींत चैन पडेना; ह्मणून त्यांनीं आपला उदयकाल पाहण्याचा निश्चय करून काळोपंतास घरीं ठेविलें; आणि आपण कर्नाटक प्रांतीं गेले. तेथें त्यांनीं लहानमोठीं अशीं सरकारचीं कामें करून अपार द्रव्य मिळविलें; आणि तें घरीं काळोपंत यांजकडे पाठविलें. ( हे वरचेवर काळोपंताकडे द्रव्य पाठवीत असत. एके वेळीं १०,७०० होन घरीं आल्याचा उल्लेख आहे. )

यावेळीं सोनवळें तर्फेची अदकारागिरी ( अधिकारगिरी ) व देशमुखी हीं वतनें महाद प्रभू या नांवाचे परभू गृहस्थाकडे होतीं.

त्यांस अत्यंत दारिद्य आलें होतें व कसाला पडला होता, ह्मणून तो हीं वतनें विकण्यास तयार झाला; परंतु गिऱ्हाइकाची उणीव होती. पुढें इ० स० १५३३ त काळोपंतांनीं तेरा हजार नक्त टक्के देऊन वरील दोन्हीं वतनें व त्या वतनास असणारे भादाणें व कुकसें असे दोन इनाम गांव, हीं खरेदी घेतलीं.

नारोपंत कर्नाटकांत असतांच मृत्यु पावले. त्यांस निळोपंत या नांवाचा एक पुत्र होता व तो बापाबरोबर कर्नाटकांत होता.

नारोपंताचे मरणानंतर कांहीं दिवसांनीं निळोपंत भादाणें येथें आपले घरीं येऊन राहिला. तेथें असतां त्यानें आपलें व चुलत्याचें पटत नाहीं असें पाहून, त्यांजपासून विभक्त होण्याचें योजिलें; आणि ती गोष्ट चुलत्यास कळविली.

याबेळीं काळोपंताची वजनदारी लोकांत व सरकारांत फार वाढली होती.

काळोपंतांनीं आपले वजनदारीवर व दरबारी लोकांचे आश्रयावर निळोपंतास नवीन संपादित वतनाचा विभाग देण्याचें नाकबूल केलें आणि त्यास सांगितलें कीं, आपण ही वृत्ति स्वतःचे श्रमानें व द्रव्यानें मिळविली आहे, यांत तुमचा कांहीं संबंध नाहीं. त्यावर निळोपंत ह्मणाले कीं, आजवर आपण एकत्र असून माझे वडिलांनीं अगणित द्रव्य घरीं पाठविलें, त्यांजपासून तुह्मीं प्रपंच चालविला, वृत्ति मिळविली आणि लौकिक संपादिला; असें असतां विभाग देत नाहीं ह्मणतां, हें योग्य नव्हे.

असा उभयतांचा कलह चालला असतां, त्याचा निकाल घरचे घरीं होईना; ह्मणून निळोपंतानें तेथील "हकीम" या हुद्याचे सरकारी अम्मलदाराकडे आपला विभाग मिळण्याकरितां फिर्याद केली.

हकीम यानें पंच नेमून आपले समोर चौकशीचें काम चालविलें. त्यांत गांवचे चौधरी वगैरे वतनदारांच्या साक्षी व इतर पुरावा घेऊन पंचांचे अनुमतानें "निळोपंताचे वडिलानें पाठविलेल्या द्रव्याच्यायोगानें वतन खरेदी करितां आलें; यासाठीं निळोपंतास विभाग मिळाला पाहिजे" असें ठरवून, वतनाचे विभाग करून ते उभयतांचे स्वाधीन केले.

असा विभाग होतांच काळोपंत कुक्षास जाऊन राहिले, आणि निळोपंत भादाणें येथेंच राहिला. असे उभयतां निरनिराळे ठिकाणीं राहून आपापल्या वृत्तीचा उपभोग घेत होते.

पुढें निळोपंत नौकरी मिळविण्याच्या उद्देशानें बेदरास जाऊन राहिला. थोड्याच दिवसांत तेथील बादशहानें त्यास कयालनिशी (खयाल = बुद्धि चालविणारा) या हुद्यावर नेमिलें. त्यानें कांहीं दिवस या हुद्याचें काम केल्यावर बादशहानें त्यास सोनवळें तर्फेचीं ठाणेदारी व मुजुमी (मुजुमदारी) हे अधिकार देऊन महालास पाठविलें. तेथें त्यानें या हुद्याचें काम दोन वर्षें केलें; आणि हिशेब देण्याकरितां बेदरास गेला. हिशेब पुरा झाल्यानंतर त्याची नेमणूक दुसरे ठाणेदारीवर झाली. तेव्हां त्यानें आपले वतनीं हिशाचे कामावर काळोपंतांस मुतालीक नेमून आपण नेमलेल्या ठाणेदारीवर गेला. तेथें त्यानें दहा वर्षेपर्यंत तें काम केलें. यानंतर बादशहानें निळोपंतास सोनवळें महालाचीं सरखोती दिली. ही सनद घेऊन तो आपले घरीं भादाण्यास आला.

निळोपंत बाहेर ठाणेदारीवर असतां काळोपंतानें सर्व वतन बळकावून निळोपंत घरीं येतांच त्याजबरोबर तक्रार चालविली. तेव्हां निळोपंतानें बादशहाचा हुकूम आणून काळोपंताकडून आपला विभाग काढून घेतला.

यापुढें काळोपंत आपले कुटुंबासुद्धां जव्हारच्या कोळी संस्थानिकाच्या आश्रयास जाऊन राहिले.

अशा रीतीनें उभय कुटुंबें वेगवेगळ्या ठिकाणीं रहात असतां बराच काल गेला. निळोपंत फार वृध्द झाले. त्यांचा पुत्र कृष्णराव प्रपंच चालवूं लागला. तिकडे काळोपंत मृत्यु पावले. त्यांचा पुत्र सोनाजी हाही उतार वयाचा झाला, व नातू मुराररराव हा प्रौढ व कर्ता झाला. असें असतां मुराररावानें निळोपंताचा व त्याचे वंशाचा समूळ नाश करून आपणास कोणीहि प्रतिस्पर्धी उरूं द्यावयाचा नाहीं असा बेत करून जव्हार संस्थानिकाची मदत घेतली; आणि एके रात्रीं भादाण्यास येऊन निळोपंताचे घरावर छापा घातला. त्या घाल्यांत त्या कुटुंबांतील निळोपंत, कृष्णराव वगैरे चवदा माणसें मारलीं गेलीं, व घरांतील सर्व चीजवस्त लुटली गेली.

यावेळीं कृष्णरावाची बाळंत झालेली स्त्री आपल्या खोलींत होती. हा आकांत तिला समजला तेव्हां दंगेखोर तिच्यापर्यंत येण्यापूर्वींच तिनें आपला बारा दिवसांचा मुलगा नारोपंत यास जिनांत लपवून त्यासुद्धां सवड पाहून सुरक्षित अशा जागीं जाऊन राहिली. यामुळें ती व तिचें मूल हीं दोघें मात्र जिवंत राहिलीं; बाकी कुटुंबांतील लहान–थोर बायका–पुरुष हीं सर्व मारलीं गेलीं. असा हा दुःखाचा प्रकार पाहून बाईची स्थिति कशी झाली असेल, याची कल्पना वाचकांनींच केली पाहिजे. ती स्वतः नवप्रसूत असून तिच्या समक्ष ही सर्व दुःखाची काहणी घडली. आतां तिला भर्ता व संरक्षण–कर्ता किंवा मायेचा असा कोणीहि राहिला नव्हता; सर्व संपत्ति लुटली गेली होती; दायाद जयी व बलाढ्य झाले होते. त्यांपासून आपला व आपल्या अर्भकाचा बचाव करावयाचा होता. अशा संकटांत एकादी सामान्य स्त्री खचित नाश पावली असती; परंतु ही सत्वशील व धैर्यशाली

बाई दुःखानें होरपळत असतांहि आपल्या पुढील परिणामाविषयीं विचार करूं लागली. तिचा निश्चय झाला कीं, या ठिकाणीं राहून आपले उभयतांचे प्राण वांचणार नाहींत. येथून दूर अंतरावर कोठें तरी अप्रसिद्ध रीतीनें राहून आपणास दिवस काढले पाहिजेत.

बाई असा निश्चय करून थोड्याच दिवसांत आपला गांव सोडून निघाली, ती वाटेनें हाल व विपत्ति भोगीत पुण्याजवळ आली आणि तेथून मावळांत जात असतां त्या प्रांतांतील कसबे खेडेंबारें या गांवीं आली. या ठिकाणीं ठकार नांवाचे एका सदय गृहस्थानें बाईस आश्रय दिला. हा गृहस्थ मोठा घरंदाज असून, फार मोठ्या विभागाचा ग्रामजोशी होता. त्यानें बाईस आपल्या कन्येप्रमाणें मानून मुलासह तिला आपल्या कुटुंबांतील मंडळींत गणिलें.

ठकाराच्या या उपकाराबद्दल या मुलाचे वंशजांनीं आपल्या भरभराटीचे दिवसांत त्यास केळवडें तर्फ खेडेंबारें या गांवांतील एक चाहूर जमीन इनाम दिली. ती त्याच घराण्याकडे अद्याप चालू आहे. तसेंच मराठी राजांकडून इनामें, धर्मादाय, नेमणुका वगैरे देवविल्या. या घराण्यांतील एक शाखा हल्लीं बावडा येथें आहे. तिजकडे उपाध्येपणाची वृत्ति, इनामें, नेमणुका वगैरे वेगळ्या चालू आहेत.

बाईनें भादाणें सोडिल्यानंतर मागें त्या भागाचे हकिमानें या निर्दय वधाची व लुटीची चौकशी करून मुराररावास देहांत शासन केलें; आणि काळोपंताचे दुसरे पुत्राचा मुलगा रामाजीपंत याजकडे सरकारतर्फे सर्व वतनाची वहिवाट दिली. यापुढें ही वहिवाट कोणाकोणाचे हातीं होती व त्यास कोणकोणतीं कारणें झालीं, याचा उल्लेख मिळत नाहीं; परंतु काळोपंताचे वंशांत इ० स० १६४६ चे सुमारास मुरार सोनाजीचा नातू मुरार भानजी हा या सर्व वतनाची वहिवाट करीत होता.

इकडे खेडेबारें येथें असतां नारोपंत लहानाचे मोठे झाले. त्यांची व त्यांचा पुत्र व नातू वगैरेंची हकीकत पुढें स्वतंत्र दिली आहे.

नारो कृष्ण व त्याचा पुत्र सोनाजी यांनीं या वतनासंबंधीं कांहीं खटपट केल्याचें कोठें आढळांत नाहीं. त्याचा नातू निळो सोनदेव हा शिवाजी महाराजांचा सरकारकून असतां इ० स० १६४८ त स्वारीबरोबर कल्याणास आला. त्यानें शिवाजीचा कल्याणास मुक्काम असतां, आपल्या वतनाची हकीकत त्यांस कळविली व चौकशी होण्याविषयीं विनंति केली. त्यावरून महाराजांनीं मुरार भानजी व गांवचे वतनदार आपल्यापुढें आणवून चौकशी केली. मुरार भानजीनें निळोपंत व आपण एकवंशीय असून, वतनांत निळोपंताचा हिस्सा असल्याचें कबूल केलें. महाराजांनीं निळोपंतास हिस्सा देवविला; आणि सांगितलें कीं, वतनाचे कामीं बादशाही सनद असावी. त्यावरून निळोपंतानें बादशहाकडे कारकून पाठवून सनद आणविली. आणि मुरार भानजी यास वतनावर मुतालिक नेमून आपण आपले हुद्याचे कामावर गेले.

यापुढें कल्याण प्रांतीं मोंगलांचा अंमल झाला. तेथें "जेंजी-दुसखान" हा मोंगल अधिकारी असतां दादाजी भास्कर नांवाचा मामलेदार मोंगलांचे नांवावर हें वतन आपणच उपभोगीत होता.

पुढें इ० स० १६९७-९८ च्या सुमारास निळोपंताचा पुत्र रामचंद्रपंत याणें कल्याण प्रांतीं मराठ्यांचा अंमल बसला असतां, राजाराम महाराजांकडून पेशवे, सचीव व लष्करी अम्मलदार यांस हुकूम देवविले कीं, मुरार भानजी यास रामचंद्रपंताचे वतनावरून दूर केलें आहे. वतन रामचंद्रपंताचे हवाली करून अंमल चालू करून द्यावा. याप्रमाणें हुकूम घेऊन रामचंद्रपंतानें आपला मुतालिक गोविंद

रघुनाथ पानशे यांस भादाण्यास पाठविलें. पानशे यांनीं हुकूम जिकडील तिकडे देऊन व मदत घेऊन मामलेदारास तंबी दिली आणि वतन ताब्यांत घेतलें; व परत आले.

यानंतर बराच काल गेला. मुरार भानजी मृत्यु पावला. यास पुत्र नसून त्यानें मरणसमयीं गोत्रजांतील रामाजीपंताचा पुत्र नारोपंत यास दत्तक घेतला होता. या नारोपंतास राधाबाई व वेणूताई अशा दोन स्त्रिया होत्या. वयही बरेच झालें, तथापि संतति झाली नाहीं. यामुळें वैराग्य उत्पन्न होऊन दोन्ही स्त्रिया व उपाध्ये बाबदेवभट्ट गिधवे यांस बरोबर घेऊन ते महायात्रेस गेले. त्रिस्थली यात्रा करून कांहीं दिवस काशीवास केला. तेथें आजारी पडले. त्यांस या दुखण्यांतून आपला निभाव होण्याची आशा उरली नाहीं. तेव्हां स्त्रिया व उपाध्ये यांस पुढील तजवीज सांगून आपण मृत्यु पावले. नंतर नारोपंताच्या स्त्रिया व उपाध्ये असे परत भादाण्यास आले.

भादाणें येथें आल्यावर राधाबाईनें वतनदार व ग्रामस्थ यांस बोलावून आणून सांगितलें कीं, आपण आपल्या बहिणीचा मुलगा दत्तक घेणार. तो घेण्याविषयीं आपल्या नवऱ्यानें मरणसमयीं परवानगी दिली आहे, आणि ही परवानगी दिल्याचे खरेपणाकरितां नारायण दीक्षित काशीकर यांच्या हातचें पत्र आणिलें आहे. याकरितां आपली या गोष्टीस मान्यता असावी. यावर सर्वांनीं बाईस सांगितलें कीं, या पत्राचे खरेपणाविषयीं प्रत्यंतर आणून दिल्यानंतर या दत्तकास मान्यता मिळेल. यापुढें बाईकडून पत्राचा खरेपणा ठरला नाहीं, ह्मणून ही गोष्ट तशीच राहिली.

इकडे रामचंद्रपंत मृत्यु पावून त्यांचे पुत्र भगवंतराव हे सातारा येथें असतां इ० स० १७४५ त नारो मुरार याच्या दोघी स्त्रिया व गिधवे

उपाध्ये असे तेथें येऊन त्यांस भेटले; आणि कळविलें कीं, आपल्या गोत्रांतील तिकडे कोणीहि राहिलें नाहीं. तुह्मी मालक असतां तिकडील व्यवस्था पहात नाहीं; ही सर्व हकीकत तुह्मांस कळवून पुढील व्यवस्था विचारण्याकरितां आलों आहे.

यानंतर भगवंतरावांनीं बायांकडून सर्व वतनाचा दस्त लिहून घेऊन आपले कनिष्ठ बंधु शिवरामपंत याचा पुत्र बाबूराव यास बरोबर कारकून देऊन बायांसमवेत भादाण्यास पाठविला.

यानंतर उभयतां बाया व उपाध्ये यांजमध्यें वैमनस्यें आलीं. राधाबाईनें आपला मेहुणा दादो गणेश नाईक तर्फ कुर्दें परगणा या गांवीं रहात होता तेथें जाऊन त्याचा मुलगा दत्तक घेतला, आणि वतनाची वहिवाट नाईक यांस सांगितली. नाईक याचे हातीं वहिवाट येतांच त्यानें वतनांतील पुष्कळ जमिनी आपल्या नांवें करून घेतल्या, व तसाच क्रम पुढेंही चालू ठेविला.

हें वर्तमान सातारा येथें भगवंतराव यांस समजलें. त्यांनीं बाईस असें न करण्याविषयीं पुष्कळ वेळां लिहिलें. पांच सहा वर्षें झालीं; तथापि कांहीं उपयोग होत नाहीं असें पाहून त्यांनीं इ० स० १७५१ त आपल्या वतनाची सर्व हकीकत महाराजांस कळविली. यावेळीं सातारा येथें सदाशिव चिमणाजी पेशवे होते. त्यांस भगवंतरावाच्या वतनाचा बंदोबस्त करून देण्याबद्दल महाराजांचा हुकूम झाला. सदाशिवरावांनीं दादो गणेश नाईक यांस हुकूम दिला कीं, नारोपंताच्या स्त्रिया साताऱ्यास येऊन, भाऊबंद भगवंतराव यांस वतन लिहून देऊन मुलगा घेऊन गेल्या असतां, तुह्मी वडील बाईस फिसालत देऊन बखेडा मांडिला आहे हें कामाचें नाहीं. आतां वतन व आजवरचा हिशेब बाबूराव याचे स्वाधीन करावा. पुण्यास बाळाजी बाजीराव पेशवे होते.

त्यांनीं या वतनाविषयीं कल्याण येथील आपले कामगार नारो रामचंद्र यांस हुकूम दिला कीं, बाई मुलगा दत्तक घेऊन गेली असतां, तिनें सरकारहुकुमाशिवाय परगोत्रांतील दत्तक घेतल्याचें समजतें; त्यास अधिकार नसतां बाईनें ही गोष्ट कां केली? याची चौकशी करावी; आणि नाईक यांजकडून पांच सालचा हिशेब, शिक्के, कागदपत्रें असतील तीं घेऊन बाबूरावाचे स्वाधीन करावीं. त्या प्रांतीं बाबूराव याची सरदेशमुखी, अधिकारगिरी, चौधरी, ज्योतिष, कुलकर्ण, गांव वगैरे जीं वतनें पुरातनचीं असतील, तीं हल्लीं चालूं नसलीं तरी चालूं करून द्यावीं.

भगवंतरावांनीं वरील दोन हुकूम आपल्या कारकुनाबरोबर देऊन त्यास कल्याण येथें पाठविलें. त्यानें तिकडे जाऊन ते हुकूम ज्याचे त्याजकडे दिले. पेशव्याच्या कामगारांनीं वतनें, कागद, शिक्के व हिशेब हीं नाईक यांजकडून घेऊन बाबूरावाचे स्वाधीन केलीं.

यापुढें या वतनासंबंधानें आपसांत ह्मणण्यासारखी गोष्ट घडली नाहीं. हल्लीं या वतनाचे उत्पन्नाबद्दल इंग्रज सरकारच्या ठाणें येथील खजिन्यांतून रोख रक्कम बाबूरावाचे (कोकिसरें घराणें) वंशाकडे मिळत असते.

याप्रमाणें काळोपंत व निळोपंत यांजपासून ज्या वतनाकरितां अनेक गडबडी झाल्या तें शेवटीं निळोपंताच्या वंशाकडे स्थिर झालें.

---

# भाग १ समाप्त.

# नारो कृष्ण.

याचे पूर्वज नारायणराव व त्याचे पुत्र निळोपंत आणि नातू कृष्णराव यांची हकीकत पहिले भागांत आलीच आहे. तसेंच नारो कृष्ण यांचें मूळ ठिकाणाहून मावळांत येणें याचेंही वर्णन आलें आहे.

नारोपंत हा बारा दिवसांचा असतांच आप्तस्वकीयांस मुकला होता. याची काळजी वाहण्यास फक्त आई मात्र जवळ होती. ती स्वतःचें घरदार, द्रव्यबल किंवा आप्त यांचे आधाराशिवाय परठिकाणीं व परक्याचे कृपेवर अवलंबून पुढील आशेवर कसे तरी कष्टानें दिवस काढीत होती. तिचे अंगचा कुलीनपणा व त्याच्या अंगभूत असणारे सद्गुण, त्या काळच्या थोर घराण्यांतील स्त्रियांच्या अंगीं असणारें धैर्य व गांभीर्य, श्रीमंती व गरिबी हीं अनुभवून येणारें ज्ञान व दक्षता, या तिच्या सर्व गुणांचा उपयोग नारोपंताचे अंगीं उत्तम गुण आणण्यांत झाला. नारोपंतास इच्यासारखा दुसरा शिक्षक क्वचितच मिळाला असता.

नारोपंत हा मावळांतील खेडेंबारें गांवीं ठकाराचे घरीं लहानाचा मोठा झाला. याच्या आईनें आपली कुलपरंपरागत लिहिण्यावाचण्याची विद्या याजकडून काळजीपूर्वक करविली. हा अमळ मोठा होतांच आपले पूर्वजांचा इतिहास आईचे मुखानें शिकला; आणि आपल्या भावी उन्नतावस्थेचा मार्ग शोधूं लागला. पुढें यानें इ० स० १५८० ते १६०० चे सुमारास शिवनेरी व चाकण यांचे जहागीरदार शिवाजीचे आजे मालोजी यांचा आश्रय संपादिला. आणि मरेपर्यंत एकनिष्ठेनें सेवा करून बरीच योग्यता मिळविली. यांस सोनजी नांवाचा एक पुत्र होता.

# सोनो नारायण.

## १६४५ पर्यंत.

सोनोपंत हा शहाजी राजे भोंसले यांचे पदरीं आपले बापाचे जागीं कारकुनाचें काम करूं लागला. बहुतकरून हा शहाजीबरोबर स्वारींत असे. यानें अहमदनगर व कर्नाटक यांतील कितीएक स्वारींत उत्तम सेवा करून शहाजीची मर्जी प्रसन्न करून घेतली. त्यावरून शहाजीनें यास आपले खासगींतील विश्वासाचे कामीं नेमिलें होतें, व पुढें शिवाजीनें यास ( इ० स० १६४१ ते १६४५ ) आपले डबीर केलें होतें.

इ० स० १६२६ त शहाजीनें जिजाबाईसाहेबांस शिवनेरी येथें ठेवून आपण विजापुराकडे जाण्याचें योजिलें; तेव्हां त्यानें जिजाबाई-साहेबांचे दिमतीस आपले पुरातन विश्वासू व परम प्रीतींतील कारकून सोनोपंत व बाळकृष्णपंत हणमंते यांस ठेविलें. पूर्वीं सोनोपंत पुणें येथें कुटुंबासुद्धां राहत होता, तो आतां शिवनेरी येथें राहूं लागला.

शिवाजी लहानाचा मोठा होईपर्यंत सोनोपंत व हणमंते यांच्या शिक्षेंत होता. त्यांनीं त्यास कटिखांद्यावरून खेळविलें होतें, व त्या वयास अनुरूप असें शिक्षणही दिलें होतें.

सोनोपंतानें शहाजीची आज्ञा घेऊन दादोजी कोंडदेव यांच्या सल्ल्यानें मौजे केळवडें तर्फ खेडेंबारें येथील एक चाहूर इनाम जमीन संपादन केली. ही जमीन हरि गोविंद कोडोलकर याचे नांवें सरकारीं कागदीं लागत होती.

हा इ० स० १६४५ त मृत्यु पावला. यानें निष्ठापूर्वक सेवा करून शहाजी, जिजाबाई व अल्पवयी शिवाजी यांची प्रीति संपादिली होती. यास निळोपंत व आबाजीपंत असे दोन पुत्र होते.

---

# निळो सोनदेव.

[ इ० स० १६४५ पासून १६७२ पर्यंत. ]

निळोपंत हे वडील जिवंत असतां त्यांचे हाताखालीं काम करीत असत. यांस वडिलांपासून कामाचें व विद्येचें शिक्षण प्राप्त झालें होतें. हे बाळपणापासून आपल्या यजमानाच्या घरीं वहिवाटत होते; यामुळें हे त्या कुटुंबाशीं दृढपरिचित झाले होते. हे इ० स० १६४५ पासून वडिलांचे जागीं डबिरीचें व आपलें सर कारकुनीचें कामही करूं लागले.

इ० स० १६३७ त शहाजीचे हुकुमावरून दादोजी कोंडदेव यानें शिवाजीस पुणें येथें राहण्यास नेलें. त्याजबरोबर निळोपंत पुण्यास जाऊन राहिले. पुढें शिवाजी वयांत येऊं लागला, आपल्या कह्यांत वागेना, त्याची स्वतंत्रतेची इच्छा अनावर झाली, असें पाहून दादोजीनें इ० स० १६४३ त जहागिरीचें सर्व काम त्याजवर सोपविलें.

यावेळीं शिवाजीनें निळोपंतास आपले मदतीस घेतलें; आणि त्यास सर कारकुनीचा हुद्दा देऊन त्याच्या अनुमतानें कारभाराचें काम चालविलें. निळोपंत हे शिवाजीच्या लहानपणापासून त्याजबरोबर होते; व तसेंच त्याच्या वाढत्या उमेदीचे उत्तेजक होते. त्याचा यांजवर भरंवसा होता. हे कामाचे माहितगार होते. तशीच यांस मावळची माहितीही उत्तम होती. कोणतेंही महत्कार्य घडण्यास अनुकूल अशा गोष्टी तें घडण्यापूर्वी तयार होत असतात; त्याप्रमाणें शिवाजीचे भाग्योदयाचे सिद्धीस सहायकारी जीं अंगें तयार झालीं होतीं, त्यांतील निळोपंत हें प्रधान अंग होतें. पुढें थोड्याच दिवसांत शिवाजीनें यांची योग्यता जाणून यांस सचिवीचा हुद्दा दिला.

इ० स० १६४४ त शिवाजी तळें, घोसाळें वगैरे किल्ले घेत असतां निळोपंतांचें शौर्य व चातुर्य पाहून, अत्यंत संतुष्ट झाला. तसेंच निळोपंतांनीं तोरणा वगैरे किल्ले व त्याखालील प्रदेश घेण्यांत आपली कामगिरी उत्तम केली. शिवाजीनें यांचे अंगचीं हुषारी, शौर्य व मुत्सद्दीपणा पाहून इ० स० १६४७ त हणमंते यांजकडील मुजूमदारीचा हुद्दा काढून यांस दिला.

निळोपंत काम करूं लागल्यापासून त्यांनीं आपला धाकटा बंधु आबाजी यास आपले मदतीस घेतला होता. दोघेही हुद्याचें काम करून लष्करी काम करीत असत.

शिवाजीचे मनांतून कालीयानी ज्यास हल्लीं कल्याण ह्मणतात, तो प्रांत घ्यावयाचें फार होतें. त्याजविषयीं त्याचे यत्न चालले होते. तेथील विजापूरकरांचा सरदार मुलाना अमेद याच्या दक्षतेनें व शूरत्वानें शिवाजीस कार्यसिद्धीविषयीं काळजी लागली होती. त्यास या कामगिरीवर कोणास नेमावें याबद्दल मोठा विचार पडला होता. असें असतां, निळोपंतांनीं या कामावर आबाजीपंतास नेमण्याविषयीं शिवाजीस मसलत दिली. ही योजना शिवाजीस पसंत पडून मोठा आनंद झाला. त्यानें तात्काळ त्या मोहिमेवर आबाजीपंताची नेमणूक करून त्याचे मदतीस आपले खासगीकडील एक हजार निवडक लोक दिले.

आबाजीपंत आपल्या जवळचे व महाराजांकडील लोक घेऊन इ० स० १६४८ त कल्याणप्रांतीं गेला. मुलाना सावध व शूर होता. त्याची व आबाजीची लढाई सुरू झाली. मुलाना आपल्या पूर्ण सामर्थ्यानें लढत होता. आबाजीपंतही पूर्ण उत्साहानें व धैर्यानें लढत होता. असें उभयतांमध्यें निकराचें युद्ध होत असतां, मुलानाच्या फौजेचा फार नाश होऊन शेवटीं मुलाना अमेद याचा पराभव झाला; आणि तो व त्याचा जनानखाना आबाजीपंताचे हातीं लागला.

याप्रमाणें लढाईचा शेवट होतांच, आबाजीपंतानें लढाईचें सर्व वर्तमान शिवाजीकडे लिहून, मुलानास मोठ्या बंदोबस्तानें त्याजकडे पाठविलें; आणि त्याची रूपवती सून शिवाजीकरितां राखून ठेविली. असें दिसतें कीं, पूर्वी मुसलमान योद्धे शत्रूचा पराभव होऊन त्यांच्यांतील उत्तम स्त्रिया सांपडल्या असतां त्या आपल्या सरदाराच्या किंवा मुख्याच्या जनानखान्यांत पाठवीत असत. अलीकडे टिपूचे वेळींही ही चाल असल्याचें प्रसिद्ध आहे. या पद्धतीस अनुसरून आबाजीपंतानें वरील स्त्री आपल्या राजाकरितां ठेविली होती असें दिसतें.

यापुढें आबाजीपंत त्या प्रांतांतील विजापूरकरांचीं ठाणीं घेण्यांत गुंतला. त्यानें तेथील सर्व ठाणीं घेऊन कल्याणापासून दक्षिणेस गोव्यापर्यंत सर्व कोंकणपट्टी जिंकून घेतली; आणि लढाईमुळें हवालदिल झालेल्या प्रजेस आश्वासनें देऊन व जिंकलेल्या प्रदेशाचा बंदोबस्त ठेवून तो कल्याणास परत आला.

हें वर्तमान शिवाजीस समजतांच त्यास परमानंद झाला. त्यानें मुलानास प्रतिबंधांतून मुक्त करून विजापुरास पाठविलें; आणि आपण निळोपंतांस बरोबर घेऊन कल्याणास आला. तेथें येतांच त्यानें मुलानाचे सुनेस प्रतिबंधांतून सोडून व वस्त्रालंकार देऊन विजापुरास पाठविलें आणि आपण उत्कृष्ट मनोनिग्रह व पूर्ण नीतिमत्ता यांविषयींचें उदाहरण होऊन लोकांस कित्ता घालून दिला.

शिवाजीनें आबाजीपंताचे कामगिरीनें संतुष्ट होऊन, त्यास त्या प्रांताचा सुभेदार नेमिलें. यासमयीं शिवाजीचा मुक्काम तेथें असतां निळोपंतांनीं आपल्या वडिलार्जित वतनाची हकीकत त्यास कळवून तें आपल्या ताब्यांत मिळविलें. (याची साग्र हकीकत पहिल्या भागांत आली आहे.) यानंतर शिवाजी व निळोपंत तेथून परत आले.

आबाजीपंत हा सुभेदार होतांच त्यानें त्या प्रांतांतील प्राचीन देव-स्थान, धर्मादाय इत्यादिकांस असलेल्या देणग्या चालू केल्या व कितीएकांस नव्या करून दिल्या. जमाबंदीकडील कामाची व्यवस्था लाविली. जुलूमजबरदस्ती बंद केली आणि दंगेखोरांचें पारिपत्य करून प्रजेस सुखी केलें.

" इ० सन १६४९ त निळोपंत शिवाजीबरोबर महाबळेश्वर, वाई, माहुली या मार्गानें रामदासस्वामींचे दर्शनाकरितां माजगांवास व तेथून सडेस्वारीबरोबर चाफळास आले. स्वामी शिंगणवाडीस आहेत असें समजतांच तेथून महाराज, निळोपंत, बाळाजी आवजी चिटणीस असे त्रिवर्ग वाडीस आले; आणि त्यांनीं स्वामींचें दर्शन घेऊन उपदेश देण्याविषयीं प्रार्थना केली. निळोपंतांनीं साहित्य तयार केल्यानंतर स्वामींनीं महाराज, निळोपंत व चिटणीस यांस मंत्रोपदेश करून थोडक्यांत आत्मानात्म विचार सांगितला.

निळोपंत व चिटणीस हे महाराजांचे प्रीतींतील एकनिष्ठ सेवक आहेत असें स्वामींनीं पाहून, त्यांस दुसरे दिवशीं दोन समासांत ( ग्रंथांतील प्रकरणांत ) सेवाधर्म सांगितला. याप्रमाणें निळोपंत तेथें धर्माचरणांत त्रिरात्र घालवून आणि रघुपतीचें दर्शन व प्रसाद संपादून चवथे दिवशीं भोजनोत्तर स्वारीबरोबर परत फिरले.

या वेळेपासून निळोपंतांचे घराण्यांत आराध्य दैवत रघुपति व दास-पंथ हीं चालू झालीं. निळोपंत वारंवार स्वामींचे दर्शनास जात व उपदेश ग्रहण करून परत येत. यांची स्वामींचे ठिकाणीं पूर्ण निष्ठा होती. इ० स० १६५८ त समर्थांनीं अंत्यज उद्धरिला. त्यावेळीं निळोपंत जवळ होते, असें वर्णन आहे. इ० स० १६६९ त चाफळ मुक्कामीं उद्धव गोसावी यांचे कीर्तनांत स्वामी श्रवणास बसले

असतां, शिवाजीनें हातांत मोरचेल व निळोपंतांनीं भालदारकाठी घेतली होती. ”

इ० १६५० त शिवाजीनें आबाजीपंतास पन्हाळा येथें बोलावून आणिलें; आणि त्यास कर्नाटकांत मोहिमेवर पाठविलें. त्यानें त्या प्रांतीं जाऊन तेथील कित्येक किल्ले, कोट व ठाणीं हीं जिंकून घेतलीं; आणि त्याचा बंदोबस्त राखिला.

निळोपंत शिवाजीबरोबर राहून स्वाऱ्यांत व मसलतींत गुंतलेले असत. शहाजीची प्रतिबंधांतून मुक्तता झाल्यापासून कांहीं वर्षें राज्यवृद्धीच्या म्हणण्यासारख्या उलाढाली झाल्या नाहींत. या मुदतींत निळोपंतांचें सर्व लक्ष, आपल्या हुद्याचे कामीं सुधारणा करण्यांत व राज्याचा बंदोबस्त व व्यवस्था करण्याचे कामीं शिवाजीस मदत करण्यांत गुंतलें होतें.

इ० स० १६५६ पासून शिवाजीच्या विजापूरकरांशीं लढाया सुरू झाल्या; आणि त्यांत निळोपंतांस पुनः लष्करी काम पडूं लागलें. राज्यविस्तार होऊन कामाची वांटणी होईपर्यंत बहुतेक मोहिमीचीं कामें निळोपंत व आबाजीपंत यांजवर पडत असत. यावेळीं यांची प्रसिद्धी इतकी वाढली होती कीं, इ० स० १६५७ त औरंगजेब बापाचे दुखण्यामुळें दिल्लीस जात असतां त्यानें शिवाजीकडून आलेले वकिलास उत्तर देऊन पाठविलें कीं, आबाजीपंतास पाठवावा. तो आल्यानंतर त्याजकडे सरदेशमुखी व जहागिरीबद्दल ठराव करून देऊं, तूर्त कोंकणचा बंदोबस्त करावा.

इ० स० १६५९ त शिवाजीचे पारिपत्याकरितां अफझलखान आला. यावेळीं शिवाजीनें पुढील कर्तव्य ठरविण्यासाठीं आपलें निळोपंतप्रभृति प्रमुख मंत्रिमंडळ बोलाविलें. त्यांत, खानास एकाएकीं आणवून ठार

मारण्याची व सरदारांनीं निरनिराळे ठिकाणीं राहून एकदम हल्ला करून त्याच्या लष्कराचा नाश करण्याची मसलत ठरली. खानास मारण्याची कामगिरी शिवाजीनें पतकरली. त्यानें स्वतः हें धोक्याचें काम न पतकरितां, कांहीं सवड काढून या कामावर दुसरा कोणी नेमावा, असा निळोपंतांचा आग्रह होता. शेवटीं शिवाजीनेंच तें काम पतकरून निळोपंतांस सांगितलें कीं, तुह्मीं या कामाविषयीं बिलकुल काळजी करूं नका, यांत धोका यावयाचा नाहीं; तथापि कदाचित् मसलत फसून अंगावर आलीच तर तुह्मीं आईसाहेबांचे विचारानें पुढील तजवीज करा.

मसलत ठरल्याप्रमाणें शिवाजीनें खानास मारिलें, व निळोपंतांनीं खानाचे लष्करावर छापा घालण्यांत आपले वांटणीची कामगिरी उत्कृष्ट बजाविली.

यानंतर शिवाजीवर रुस्तुमजमान नांवाचा सरदार आला. असे वरचेवर येणारे सरदारांशीं शिवाजी व त्याचे सैनिक यांस लढाई देण्यांत गुंतावें लागल्यामुळें दूरदूरचे प्रांतांचा बंदोबस्त राहीना; त्यास शत्रूचा उपद्रव होऊं लागला. तेव्हां शिवाजीनें आबाजीपंतास इ० स० १६६० त कालीयानी, भिंवडी व संपूर्ण कोंकण याचे बंदोबस्तास पाठविलें. आबाजीपंतानें तिकडे जाऊन शत्रूचे लोकांस आपले हद्दींतून हांकून लाविलें; आणि त्या प्रांतांचा बंदोबस्त राखिला.

यापुढें थोड्याच दिवसांत लढाया बंद होऊन स्वस्थता झाली. शिवाजीचीं कदीम वतनें [ वंशपरंपरें चालण्याचीं ] माहुलीपासून भिमथडी, इंदापूर, पुणें, चाकण वगैरे प्रदेशांत होतीं. त्यांची व्यवस्था आजवर चांगलीशी लागली नव्हती. इ० स० १६६० त शिवाजीनें निळोपंतांस मुजुमदारीचें काम करूनही या वतनी कारभाराचें काम

करण्यास सांगितलें. तेव्हां निळोपंतांनीं विनंति केली कीं, आपण या कारभाराचे कामाकडे असतां एके ठिकाणीं गुंतून रहावें लागेल; आणि त्यापासून लढाया वगैरेंनीं नवे मुलूख जिंकण्याचे प्रसंग प्राप्त होणार नाहींत. बरोबरीचे पेशवे अशीं कामें करून कीर्ति मिळवीत असतां आह्मीं अशी संधि दवडावी, हें योग्य वाटत नाहीं. अद्याप आमचे अंगीं अशीं श्रमाचीं कामें करून शौर्य गाजविण्याची उमेद आहे. याकरितां हें काम दुसऱ्या कोणास द्यावें. याजवर शिवाजीनें यांस सांगितलें कीं, आह्मीं नवा मुलूख जिंकणें, अथवा जिंकलेल्याचें संरक्षण करणें व बंदोबस्त राखणें हीं कामें समान समजतों. तुह्मीं आजपर्यंत पराक्रमाचीं, श्रमाचीं, धाडसाचीं व मसलतीचीं अनेक कामें केलीं आहेत, आणि यापुढेंही कराल; याविषयीं आमची पूर्ण खात्री आहे. हल्लीं हें कारभाराचें काम असेंच महत्वाचें व नाजूक झालेलें आहे. त्याची व्यवस्था लावण्यास याच योग्यतेचा मनुष्य पाहिजे; आणि तुह्मीं तसें आहां, हें मनांत आणून ही योजना केली आहे. आह्मीं बक्षीस अगर देणगी देतेवेळीं मोरोपंतास पेशवे ह्मणून पंचवीस फुलें दिलीं, तर त्याचवेळीं मुजुमदार ह्मणून तुह्मांस वीस फुलें देऊं. असें सांगून त्या प्रकारची सनद करून दिली; आणि आज्ञापत्र दिलें कीं, तुह्मीं कारभाराचें काम करीत असतां कोणासही त्याकरितां कमीजास्त बोलावें लागल्यामुळें कोणी तुह्मांविषयीं भलत्याच प्रकारानें आह्मांस समजावील, तर तें मनास आणिलें जाणार नाहीं. तुमचे कामाची तपासणी इतर कोणतेही प्रधानाकडे सांगितली जाणार नाहीं. एखादी तक्रार उत्पन्न झाल्यास त्याचा इनसाफ आह्मीं स्वतः करूं.

याप्रमाणें सनद व आज्ञापत्र निळोपंतांस मिळतांच, त्यांनीं कारभाराचें काम हातीं घेतलें, आणि त्यांत सुधारणा करून आपल्या अनुभविक जमाबंदी व हिशेबी ज्ञानानें वतनाची सुयंत्रित व्यवस्था लाविली.

निळोपंतांनीं वतनाच्या कामाची व्यवस्था लाविल्यानंतर शिवाजीनें त्यांस बरोबर स्वार व पायदळ देऊन नवा प्रदेश जिंकण्याकरितां कर्नाटकांत पाठविलें. निळोपंतांनीं तिकडे जाऊन कित्येक किल्ले व प्रांत जिंकून तेथें आपला अम्मल बसविला.

इ० स० १६६२ त सिंहगडावर कांहीं फितवा होऊन गडबड झाली. त्याचे बंदोबस्ताकरितां शिवाजीनें निळोपंत व मोरोपंत यांस पत्र पाठविलें कीं, आज्ञेप्रमाणें उभयतां किल्लेमजकुरीं जाऊन फितुरी लोकांस शिक्षा देऊन किल्ल्याचा बंदोबस्त करावा.

इ० स० १६६२।६३ च्या सुमारास शिवाजीचे ताब्यांत असलेल्या मुलुखापैकीं सुमारें $\frac{1}{2}$ भाग एकट्या आबाजीपंतानें जिंकिलेला होता. निळोपंतांनीं स्वतंत्र स्वाऱ्या करून कर्नाटकांत व इतर ठिकाणीं आणि शिवाजीचे हाताखालीं राहून जिंकलेला प्रदेश हे धरले असतां मराठी-राज्यस्थापनेंत या उभयतां चतुर व शूर सरदारांचा व मुत्सद्यांचा फार मोठा यशोभाग आहे असें सहज दिसून येईल.

इ० स० १६६४ त सुरत शहर लुटण्याच्या वेळीं निळोपंत शिवाजी-बरोबर होते.

शहाजीचे मरणामुळें जिजाबाईनें सती जाण्याचा निश्चय केला. शिवाजी व इतर मंडळींनीं तिचा बेत रहित होण्याविषयीं फार प्रयत्न केला; परंतु त्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं. ती कोणाचेंही न ऐकतां आग्रह धरून बसली. तेव्हां शेवटीं निळोपंतांनीं समाधानाच्या व उपदेशाच्या गोष्टी सांगून मोठ्या प्रयत्नानें तो बेत रहित करविला. निळोपंतांचीं सल्लामसलतीचीं कार्यें जशीं राजकीय कार्यांत तशींच घरगुती कामांतही घडत असत. जिजाबाई व शिवाजी यांची पूर्वींची

व आतांची स्थिति, तशीच संकटावस्था व सुखावस्था यावेळीं जवळ असून, सुखदुःखाचे विभागी होणारांतील, प्रसंगीं हितोपदेश करण्यायोग्य अशा जुन्या अवशेष मंडळींत निळोपंत हे प्रमुख होते. शिवाजी व जिजाबाई हीं उभयतां त्यांस फार मानीत; व त्यांजवर त्यांचा पूर्ण विश्वास असे.

इ० स० १६६६ त दिल्लीहून दिलीरखान व जयसिंग हे सरदार शिवाजीच्या पारिपत्याकरितां आले. तेव्हां शिवाजीनें त्यांचे प्रतिकाराविषयीं विचार करण्यासाठीं आपलें मंत्रीमंडळ जमविलें. त्यांत मोरोपंत, निळोपंत व अण्णाजी दत्तो हे प्रमुख होते. विचारांतीं ठरलें कीं, यावेळीं शत्रूशीं लढाई न देतां तह करणें हितावह आहे. पुढें त्याप्रमाणें तह होऊन शिवाजी बादशहाचे भेटीसाठीं दिल्लीस गेला. त्यानें जातांना सर्व राज्याचा कारभार वरील तिघांवर सोंपविला होता. या तिघांनीं शिवाजी परत येईपर्यंत राज्यांतील कारभाराचीं व बंदोबस्ताचीं कामें उत्तम चालविलीं होतीं. शिवाजी परत येतांच त्यानें मोंगलांस तहांत दिलेले २७ किल्ले व प्रांत हीं घेण्याच्या कामीं या तिघांस नेमिलें. यांतील प्रत्येकानें निरनिराळे ठिकाणीं लढून हें काम चार महिन्यांत शेवटास नेलें.

निळोपंत वरील लढाईंतून मोकळे होतांच शिवाजीनें त्यांस बसनूरचे मोहिमेवर पाठविलें. निळोपंतांनीं तिकडे जाऊन असाधारण श्रमाचीं, साहसाचीं व पराक्रमाचीं कामें केलीं. शिवाजीनें हें जाणून त्यांचा पुत्र रामचंद्रपंत यास या वेळीं नवीन वसविलेलें सिंधुदुर्ग याची वतनी सबनिशी दिली आणि मुतालिकाकडून काम घेण्याचें ठरविलें.

निळोपंतांनीं इ० स० १६६८–७० पर्यंतचे मराठी राज्याचे स्वस्थतेचे दिवस शिवाजीस एकंदर राज्यकारभाराचे नियम करण्याचे कामीं

व सरसालाचे हिशेब तपासण्याचे कामीं मदत करण्यांत व आपल्या खात्याचे नियम करण्यांत घालविले.

इ० स० १६७० पासून पुनः मुसलमानांशीं लढाया सुरू झाल्या. त्यांत निळोपंत शिवाजीबरोबर राहून लढायांचीं व लुटीचीं कामें करीत होते.

याप्रमाणें मराठी राज्याची सेवा करीत असतां, निळोपंत इ० स० १६७२ त मृत्यु पावले. यांनीं कारकून, सरकारकून, वतनी कारभारी, सचीव, अमात्य अशीं निरनिराळ्या हुद्यांचीं कामें ३२ वर्षे केलीं. त्यांचें लग्न केळवडें तर्फ खेडेबारें येथील गोविंदपंत कोडोलकर याचे कन्येशीं झालें होतें. ही स्त्री मौजे मुरादपूर तर्फ देवरूख या गांवीं मृत्यु पावली. त्या ठिकाणीं हिचें वृंदावन असून, त्यासंबंधीं धर्मकृत्य चालण्यासाठीं महाराजांकडून हा गांव इनाम मिळाला होता. यांस वडील नारोपंत व धाकटे रामचंद्रपंत असे दोन मुलगे होते. यांनीं तांदळी तर्फ रांजणगांव येथील ज्योतिष, कुलकर्ण वगैरे वतनें खरेदी घेतलीं. यांनीं आपलीं वडिलार्जित कल्याण प्रांतींचीं वतनें जीं भाऊबंदांनीं बळकाविलीं होतीं, तीं त्यांजकडून घेतलीं. यांस महाराजांकडून अमात्य या पदवीची जहागिरी मिळाली.

हे दुसरे प्रधान असून, यांचें काम जमाबंदी व खर्चाची चौकशी व व्यवस्था करणें व राखणें हें होतें. या कामांत महाराजांकडून जे नियम झाले व ज्यांचा अम्मल सुखावह असा झाला तें सर्व यांच्या श्रमाचें फल आहे. यावेळीं प्रत्येक प्रधानास आपापले हुद्याचीं कामें करून लष्करी कामें करावीं लागत होतीं. त्याप्रमाणें हे लष्करी काम करीत होते. लष्करी काम करीत असतां यांचें हुद्याचें साधारण काम मुतालिक चालवीत असत. प्रायः राज्याभिवृद्धीच्या आरंभापासून हे

दोनींही कामें करीत होते. लष्करी काम तर प्रथमपासूनच करीत होते, आणि यावेळीं या कामाचा भारही यांजवर फार होता. यांनीं लष्करी कामांत शिवाजीसारख्या योद्ध्याकडून, जींत शूरत्वाविषयीं शिफारस आहे, अशी सनद मिळविली. ही गोष्ट सामान्य नाहीं. याची योग्यता शिपाईच जाणतील, इतरांस त्याजबद्दल कल्पनाही होणें दुर्घट आहे. शिपायाची प्रशंसा शिपायाकडून होणें यासारखी आनंद व धन्यताजनक दुसरी कोणती गोष्ट आहे ?

हे जसे शूर शिपाई होते, तसेच उत्कृष्ट राज्यकारस्थानपटु मुत्सद्दी होते. यांच्या कर्तबगारीनें या वेळच्या मुत्सद्यांना थक्क करून सोडिलें होतें. हे राजघराण्यांतील घरगुती कामांत अनुभवी वडील माणसाप्रमाणें होते. शिवाजीच्या व यांच्या कांहीं स्वतंत्र स्वाऱ्या व लुटी शिवायकरून महाराज सर्व प्रकारचें काम करीत असतां, हे केवळ छायेप्रमाणें निरंतर त्यांजजवळ असत. ह्मणून हरएक संकटाचे व मसलतीचे वेळीं सल्ला देणें व जरूरीचें काम करणें हीं यांस करावीं लागत होतीं. यामुळें शिवाजीच्या हरएक गुणदोषांचे कृत्यांत यांचा यशापयशाचा अंश आहे. तेव्हां यांच्या कृत्याचें पूर्णपणें विवेचन करणें ह्मणजे शिवाजीच्या प्रत्येक गोष्टीचें वर्णन करणें होईल. पुढें पुढें पेशव्यांची नेमणूक होऊन ते पहिले प्रधान झाले; तथापि त्यांस नेहमीं कामगिरीवर दूर रहावें लागे, याकरितां निळोपंतांस मरेपर्यंत जीं कामें करावीं लागलीं, तीं त्यांनीं करून आपलें मंत्री हें नांव सार्थ केलें.

मराठीराज्यस्थापनेंत प्रथमपासून निळोपंतांचें अंग फार असून, तेंही त्यांत प्रधानत्वानें होतें. शिवाजीस स्वतंत्रतेची व राज्यस्थापनेची इच्छा होऊन ती वाढण्यास व त्याचें त्यास अनुकूल असें वर्तन होण्यास जशीं भारतीकथा, त्याचे पूर्वजांचे पराक्रम, आपल्या वंशांत राज्य मिळणार या वराचें स्मरण हीं कारणें झालीं, तसेंच या इच्छेच्या सिद्धीचा

भरंवसा उत्पन्न करण्यास व त्या सिद्ध करण्याचें साहित्य होण्यास, मावळे सरदारांप्रमाणें निळोपंत हे शूरत्व व मसलत या दोन्ही बाजूंनीं मुख्यत्वें कारण झाले. यांत यांचा फार मोठा वांटा आहे. दादोजी हे शिवाजीची इच्छा बदलण्याविषयीं सारखी खटपट करीत होते; परंतु त्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं. रामदास स्वामींची गांठ बरेच कालानें पडली. निळोपंत व हणमंते हेच शिवाजीचे मुळापासूनचे मंत्री होते, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं.

निळोपंतांनीं ३२ वर्षें शिवाजीची एकनिष्ठेनें सेवा केली. या मुदतींत, जो शिवाजी एका सरदाराचा मुलगा होता, तो एका विभागाचा राजा झाला, आणि हें होण्यास यांची सेवा सहाय्य झाली.

निळोपंतांचे घराण्यांतील प्रत्येक पुरुष स्वपराक्रमानें उन्नतावस्थेस पावत आला होता. त्याप्रमाणेंच हे बुद्धि, चातुर्य, शौर्य, पराक्रम इत्यादि गुणांनीं योग्यतेस आले. यांच्या मरणानें शिवाजी अत्यंत दुःखी झाला.

या अलौकिक स्थित्यंतरास शिवाजीच्या अंगचें शौर्य, धैर्य, स्वाभिमान इत्यादि गुणांप्रमाणेंच निळोपंतांचे अंगचें ज्ञान, दूरदृष्टि, निरालसपणा, स्वराज्यनिष्ठा आणि एकनिष्ठसेवा महाराष्ट्रांत स्वराज्याची स्थापना करण्यास उपयोगी पडली नाहीं असें कोण ह्मणेल?

निळोपंतांच्या घराण्यांतील प्रत्येक व्यक्ति उत्तरोत्तर कीर्तीच्या व उत्कर्षाच्या अत्युच्च शिखरास चढण्यास ‘ बापसे बेटा सवाई ’ या न्यायाप्रमाणें उद्योग करीत होती. याप्रमाणेंच या निळोपंतांनीं आपल्या बुद्धि, चातुर्य, शौर्यादि प्रभावाच्यायोगानें महाराष्ट्र भूजननी ‘ सुवीरसु ’ असें सर्वांस ह्मणण्यास लावून शिवाजीसारख्या गुणपरीक्षक राजास आपल्या मरणानें अति दुःखित केलें यांत कांहीं विशेष नाहीं.

# नारो निळकंठ.

( इ० सन १६७२ ते १६७४ पर्यंत. )

नारोपंत हे आपले वडील मृत्यु पावल्यावर इ० सन १६७२ त मुजुमदार झाले. शिवाजीनें यांस हा हुद्दा देऊन आपले स्वारीबरोबर घेतलें होतें. परंतु यांच्या मनाची प्रवृत्ति प्रपंचापेक्षां परमार्थाकडे फार होती. यांनीं आपलें लग्नही करून घेतलें नाहीं. यांचा बहुतेक वेळ स्नानसंध्या, जपजाप्य यांत जात असे. अशी यांची विरक्त स्थिति पाहून शिवाजी या हुद्यासंबंधाचें सर्व काम यांचे कनिष्ठ बंधू रामचंद्रपंत यांचे हातून घेऊं लागला.

नारोपंतांचें सर्व चित्त वैराग्यपर कामांत गुंतल्यामुळें, त्यांस अधिकाराचें काम गौण वाटून त्यांनीं आपल्या हुद्याचें काम कधींही केलें नाहीं. हे इ० सन १६७४ पर्यंत नामधारी मुजुमदार होते. वास्तविक तें काम रामचंद्रपंत करीत होते. शिवाजीनें राज्याभिषेकाच्या वेळीं यांस या हुद्यावरून काढून रामचंद्रपंतास मुजुमदार ( अमात्य ) केलें; आणि यास खर्चाकरितां शिवनें व पडवें हीं दोन गांवें नेमून दिलीं.

यानंतर यांनीं पूर्ण संन्यस्ताप्रमाणें आचरण ठेविलें. पुढें पुढें तर यांस स्वामी हें नांवही प्राप्त झालें. हे विजयदुर्ग येथें रहात होते.

इ० सन १६९८ त राजाराम महाराज कोंकणांत असतां हे त्यांचे भेटीकरितां विजयदुर्गाहून प्रभावळीपर्यंत आले. तेथें यांस महाराजांचें आज्ञापत्र आलें कीं, आपली भेट दिनशुद्धि पाहून व्हावी लागते, याजकरितां आपण तेथेंच मुक्काम करावा; आह्मीं तेथें येणार आहों. यानंतर पुढें उभयतांची भेट प्रभावळी येथें होऊन हे परत आपले ठिकाणीं गेले.

असे हे पुष्कळ वर्षें तापसस्थितींत राहून योगाभ्यास करीत असतां इ. स. १७०८ त शाहू दक्षिणेंत आल्यानें जी राजकीय उलाढाल चालली होती, त्यांत रामचंद्रपंतानें यांस सिंधुदुर्ग येथें जाऊन राहण्याविषयीं लिहिलें. यावेळीं यांच्या अंतःकरणवृत्तींत बदल होऊन मनांत आलें कीं, आपण शाहूस मिळून पराक्रमाचीं कामें करावीं. हें मनांत येतांच यांनीं आपले संपूर्ण हेतू व बेत ज्यांत लिहिले आहेत, असें विनंतिपत्र गिरजोजी पिसाळाचे मार्फत शाहूकडे पाठविलें. यावर शाहूनें नारोपंतास आज्ञापत्र पाठविलें कीं, तुम्हीं आपले पत्रांत, " बंधूचा आग्रह सिंधुदुर्ग येथें रहावें असा असून आपल्या मनांतून स्वामीसन्निध राहून कित्येक कामें करावीं " असें लिहिलें आहे; त्यास तुम्हांस इकडे आणण्या-कारितां पिसाळ यांजकडील लोक पाठविले आहेत. विलंब न करितां निघून यावें, तुमचे बहुमानांत अंतर होणार नाहीं. तुम्हीं प्रयोजनप्रसंगा-संबंधीं कित्येक गोष्टी लिहिल्या. त्याप्रमाणें कार्यभाग करून स्वामींस संतोषित करावें; व दर्शनास येऊन मनोदय सिद्धीस पाववून घ्यावा.

हें वर्तमान रामचंद्रपंतास समजून त्यानें त्यास शिवाजीचे भेटीस बोलाविलें असावें किंवा शाहूकडे जाण्यास प्रतिबंध केला असावा अथवा ताराबाईचे लोक मागें हटत हटत कोंकणांत उतरल्यामुळें यास संधी मिळाली नसावी. कसेंही असो; हे शाहूकडे न जातां शिवाजीचे भेटीस आले आणि आपण विजयदुर्ग येथेंच स्वस्थपणें राहण्याचें ठरवून परत गेले.

यांच्याजवळ एक दक्षिणावर्ति शंख होता. असा शंख दुर्मिळ असून तो ज्याच्याजवळ असेल, त्यास सर्व गोष्टी कल्याणप्रद होतात, असें ग्रंथांतरीं वर्णन आहे. ह्मणून हा जवळ बाळगण्याविषयीं मोठमोठे लोक यत्न करीत असतात. एकेवेळीं आरमारचे सुभेदार संभाजी आंग्रे यांनीं रामदुर्गाकडे स्वारीस जाण्यापूर्वीं आपला कारकून नारोपंताकडे पाठवून त्याजकडील शंख मिळविण्याविषयीं खटपट केली होती.

नारोपंत हे कांहीं दिवस सिंधुदुर्ग येथें जाऊन राहिले होते. तेथून पुढें राजापुराजवळचे धोपेश्वर गांवीं येऊन राहिले. हे तेथें असतां इ० स० १७१५ या वर्षीं समाधिस्थ झाले. यांनीं आपल्या आयुष्यांत एकदांच राजकीय कामांत पडण्याचें मनांत आणिलें होतें. त्याशिवाय यांचें सर्व आयुष्य तपाचरण व इतर धर्मसंबंधीं कामें करण्यांत गेलें. येथें त्यांची समाधि बांधून तिच्या व्यवस्थेस लागणाऱ्या खर्चाची नेमणूक रामचंद्रपंतांनीं केली आहे.

---

# रामचंद्र नीलकंठ.

(इ० स० १६७४—१७२०.)

याचा जन्म इ० स० १६५० च्या सुमारास झाला. याची बाल्यावस्था मातापित्याच्या छायेखालीं सुखानें गेली. लहान असतां हा आपले वडिलाबरोबर मेहमीं राजवाड्यांत जात असे. याचा तोंडावळा एखाद्यास स्वभावतः लोभविणारा होता. शिवाजीनें याचा स्वभाव, तेजस्वीपणा, हुशारी आणि चातुर्ययुक्त खेळ हीं पाहून भविष्य केलें कीं, पुढें हा मुलगा बुद्धिमान् व पराक्रमी होईल. तो निळोपंतांस ह्मणे कीं, या मुलानें तुह्मांस खरें पुत्रवान् केलें आहे. हें भविष्य शेवटीं खरें झालें. हा जसजसा मोठा होऊं लागला तसतसे याच्या अंगचे गुण विकास पावूं लागले.

हा अम्मळ मोठा झाल्यावर बापाबरोबर हुद्याचे कामांत वहिवाटूं लागला आणि स्वारीशिकारीस जाऊं लागला. कधीं कधीं तर निळोपंत इतर कामांत गुंतला असतां रामचंद्रपंतच शिवाजीबरोबर स्वारी-

शिकारीस जात असे. अशा प्रकारें हा लहानपणापासूनच लष्करांत व इतर कामांत वहिवाटून आपल्या कुशाग्र बुद्धीनें या वेळेपासूनच लहानसा मुत्सद्दी व सरदार बनूं लागला होता. यास या दोन्ही धंद्यांचें बाळकडू प्राप्त झालें होतें असें ह्मणण्यास हरकत नाहीं. अशा सर्व अनुकूल गोष्टी घडत गेल्यानें मोठेपणीं याजवर जे बिकट प्रसंग आले त्यांतून यास आपला निभाव करून घेतां आला.

इ० स० १६६७त शिवाजी नवा वसविलेला सिंधुदुर्ग पाहण्याकरितां निघाला, तेव्हां त्यानें आपल्याबरोबर रामचंद्रपंतास घेतलें होतें. स्वारी गगनगड घांटानें जंजिऱ्यास गेली. तेथील किल्ला पाहून शिवाजी संतुष्ट झाला. या पूर्वीं बसनूरचे स्वारींत निळोपंतानें मोठा पराक्रम केला होता आणि रामचंद्रपंताची हुशारी देखील शिवाजीच्या अनुभवास आली होती. याकरितां त्यानें या किल्ल्याच्या कामदारांच्या नेमणुका करितेवेळीं त्यांत रामचंद्रपंतास वतनी सबनिशी देऊन, त्याचे मुतालिकाकडून काम घेण्याविषयीं तेथील हवलदारास हुकूम दिला.

इ० स० १६७२ तील निळोपंताचे मृत्यूपासून त्यांचे ज्येष्ठ पुत्र नारोपंत हे मुजूमदार झाले. परंतु वास्तविक त्या हुद्याचें सर्व काम रामचंद्रपंतच करीत होता. त्यानें हें काम दोन वर्षें केलें.

इ० स० १६७४ त राज्याभिषेकाच्या वेळीं शिवाजीनें मुजूमदारीचा हुद्दा व त्यासंबंधीं जहागिरी रामचंद्रपंतास दिली. (नारोपंताकडील मुजूमदारी काढून यास देण्याचें कारण नारोपंताचे हकीकतींत आलें आहे.) शिवाजीची चाल अशी होती कीं, मुलगा आपल्या बापासारखा पराक्रमी असल्यावांचून त्यास त्याचा हुद्दा द्यावयाचा नाहीं. यास अनुसरून ही गोष्ट घडली.

राज्याभिषेकाच्या वेळीं इतर प्रधानांसमवेत रामचंद्रपंतांनीं नाना तीर्थांचें उदक वेदमंत्राचा घोष चालला असतां ब्राह्मणांच्या आज्ञेनें महाराजांवर सिंचन केलें. तक्तास अष्ट प्रधानांकरितां आठ खांब होते. त्यांतील डावे बाजूचे दुसरे खांबाखालीं यांची जागा असून यावेळीं हे तेथें बद्धांजली उभे होते. या पूर्वी अष्ट प्रधानांस पारशी अर्थाचीं नांवें होतीं तीं मोडून या प्रसंगीं त्याच अर्थाचीं संस्कृत नांवें देण्यांत आलीं. त्यांत रामचंद्रपंतांस " मुजूमदार " याच्या ऐवजीं " अमात्य " अशी पदवी मिळाली.

अशा वेळीं महाराजांकडून अमात्यास वस्त्रें, दागिने इत्यादि ज्या ज्या वस्तु मिळावयाची पद्धत होती त्यांचा तपशील.—

१. प्रथम भेटीचे वेळीं — चादर ( छडीदार ).

२. पदाचीं वस्त्रें — मंदील, चादर ( छडीदार ) जामेवार किनखाप, पटका.

३. शस्त्रें—ढाल, तलवार.

४. जवाहिरांचे दागिने — शिरपेंच, मोत्यांची कंठी, चौकडा, तुरा.

५. वाहनें - हत्ती व घोडा.

६. इतर जिन्नस—शिक्के, कठार (कठारीदार व शिक्का), रुप्याचे दांडीची चवरी, आणि कलमदान.

अमात्यांनीं महाराजांचे भेटीचे वेळीं कांहीं मोहोरा नजर कराव्या अशी वहिवाट होती. या मोहोरा बहुधा पंधरा असत.

राजमंडळांत अमात्याचीं कामें — दप्तरचें सर्व लिहिणें, सर्व कारखान्यांची एकबेरजी, स्वराज्यांतील जमाखर्चाची चौकशी, राजपत्रावर "लेखनालंकार" "बारसूद" हीं अक्षरें घालून तारीख घालणें, हीं होतीं.

या वेळीं कामाची व्यवस्था झाली, त्यांत चिटणिसांनीं अमात्याचे निसबतीस राहून देशाधिकारी, दिवाण, निसबतीचे मामलेदार, जिल्हेदार, सबनीस, हवलदार, कारखाननीस, आणि गांवगन्ना असणारे पाटील, कुळकर्णी वगैरे कामदार इत्यादिकांस पत्रें लिहावीं. ज्या त्या प्रधानांनीं आपापले कामांतील कायदे करावे आणि ते सर्वांनीं मानावे असे ठोकळ नियम झाले. महाराजांकडून अमात्यांस पत्रें यावयाचीं असतील त्याजवरील मायना—" प्रथम राजश्री, नांव, पंडीत, असें असून, शेवटीं बहुत काय लिहिणें सुज्ञ असा " असें लिहिण्याची पद्धत होती.

इ० स० १६७४–७६त शिवाजीनें रामदुर्ग व नरगुंद हे किल्ले बांधून ते रामचंद्रपंताचे स्वाधीन केले. पुढें अमात्यांनीं या किल्ल्याचे बंदोबस्ताकरितां त्याजवर आप्पाजीपंत सुर्यो (हल्लींचे हेबळीकराचे मूळ पुरुष) यांस नेमिलें.

इ० स० १६७८त शिवाजी रामदास स्वामींचे दर्शनास गेले, त्या वेळीं रामचंद्रपंत बरोबर होते. अमात्याकडे स्वामींचे मठसंस्थानचें काम होतें. शिवाय त्यांनीं ब्राह्मणभोजनाचे वेळीं त्यांची पूजा करावी, सभेच्या वेळीं बैठकीची तयारी करावी, समर्थ सभेस येऊन बसले असता छत्रपतींनीं उजवे बाजूस व अमात्यांनीं डावे बाजूस मोर्चेल घेऊन उभें असावें, रथाचे दिवशीं सोन्याची भालदार काठी घेऊन उजवे बाजूनें चालावें, समर्थ कीर्तनांत बसले नसतील तेव्हां गोसाव्याचे (हरिदासाचे) मागें उभें असावें, इत्यादि निर्मळ गुरुभक्तीचीं अनेक कामें करावीं अशी यांची वडिलापासून पद्धति होती. जेव्हां जेव्हां महाराज स्वामींचे दर्शनास जात, तेव्हां तेव्हां अमात्यास बरोबर असावें लागे. रामचंद्रपंतांची स्वामींचे ठिकाणीं परम निष्ठा असे आणि त्यांच्या एकनिष्ठ गुरुभक्तीनें त्यांजवर समर्थांची पूर्ण कृपा असे.

या वेळीं मराठी राज्याची नुकतीच स्थिरस्थावर झाली होती, परंतु जमीनमहसुलाची व्यवस्था सुरळीत लागावयाची होती; यामुळें जमिनीचा सारा नियमित वसूल होत नव्हता आणि तो ठरवितांना फार घोटाळा पडत असे. ही अडचण दूर करण्याकरितां रामचंद्रपंतांनीं आपले मदतीस अण्णाजी दत्तो सचीव यास घेऊन जमिनीचा धारा ठरविण्याचे कांहीं नियम केले आणि त्या रीतीनें जो धारा ठरविला, त्यास धारेबंदी असें नांव दिलें. ही धारेबंदी पिकांचा $\frac{1}{6}$ एकषष्ठांश राजभाग या मानास अनुसरून बागायत, भातशेती, वरकस इत्यादिकांस कांहीं थोड्या कमजास्तीचे फरकानें ठरविली होती. या वेळीं कल्याणा-सुद्धां सर्व कोंकणप्रांत दंग्याधोप्यामुळें उध्वस्त झाला होता. तेथील जमिनीची धारेबंदी ठरविली आणि वसाहत वाढविली. हें काम बरेच दिवस चाललें होतें. या धारेबंदीस वर्षाची ( मुदतीची ) इयत्ता नसून ही कायमची ठरविली होती. या कायमपणामुळें तेथील रयतेस सुख व संतोष होऊन ती या उभयतांची कीर्ति गात राहिली. त्या प्रांतांत ही धारेबंदी सुमारें २०० दोनशें वर्षें कायम होती. कोंकणप्रांतास ही रीति लागू झाल्यानंतर बाकीचे प्रांतास धारेबंदी व्हावयाची होती; परंतु इतर राजकीय उलाढालीमुळें हें काम इतकेंच राहिलें. ( या धारेबंदीस अनियत मुदतीची पैमाष ह्मणण्यास हरकत नाहीं. )

इ० स० १६८० त शिवाजीनें आपल्या अंतकाळीं अमात्यादि जवळ असलेले मुत्सद्दी व सरदार यांस बोलावून त्यांस आपले पश्चात् राज्यव्यवस्थेविषयीं स्वतःचें मनोगत कळविलें. यावेळीं शिवाजी वडील पुत्राचे दुर्वर्तनाबद्दल फार दुःखी झाला होता. त्यानें संभाजीचे अयोग्य वर्तनामुळें राज्यांत घोटाळा उत्पन्न होईल; परंतु त्याचें स्वरूप ओळखून रामचंद्रपंत व प्रल्हादपंत हे आपले हुशारीनें तो घोटाळा नाहींसा करितील आणि राज्य स्थितीवर आणतील असे खेदकारक

व भविष्यकथनासारखे उद्गार काढिले आणि शेवटीं या उभयतां मुत्सद्यांचे कर्तबगारीवर भरंवसा ठेवून त्यांस व सर्वांस योग्य वाटेल तशी राज्याची व्यवस्था करावयास सांगितलें.

शिवाजी मरण पावतांच राजारामाचे आईनें आपले पुत्रास गादीवर बसवून, संभाजीस पन्हाळा येथें आहे तसाच प्रतिबंधांत राहूं द्यावा, असें सर्वांच्या विचारानें ठरविलें. शिवाजी मृत्यु पावल्याचें वर्तमान समजण्यापूर्वीं त्याचा प्रतिबंध जास्त बंदोबस्ताचा करावा अशी योजना केली; परंतु बंदोबस्त होण्यापूर्वीं ही मसलत फुटली आणि मृत्यूचें वर्तमान संभाजीस समजलें. तेव्हां त्यानें जवळचे लोक अनुकूल करून घेऊन आपली सुटका करून घेतली. नंतर रायगडास येऊन राजारामाची आई, अण्णाजी दत्तो सचीव वगैरे कटांतील विशेष पुढारी व प्रत्यक्ष आपणाविरुद्ध वागलेले लोकांस ठार मारिलें आणि रामचंद्रपंत व इतर प्रधान यांचे घरीं चौक्या बसविल्या.

इ० स० १६८० च्या जून महिन्यांत संभाजीनें आपणास राज्याभिषेक करवून घेण्याचें ठरविलें. तेव्हां त्याच्या मर्जींतील मंडळींनीं त्यास सांगितलें कीं, अशा समारंभाच्या वेळीं प्रधानांच्या घरीं चौक्या असणें योग्य नाहीं. त्यावरून त्यानें चौक्या उठविल्या. त्यांत रामचंद्रपंतांच्या घरचीही चौकी उठविली. चौकी असल्या मुदतींत रामचंद्रपंतांचे मुतालीक अमात्याचें काम चालवित होते.

याप्रमाणें अमात्य हे गैरमर्जींत असतां दादाजी रघुनाथ प्रभू देशपांडे महाडकर यानें संभाजीचे मर्जींतील मंडळीमार्फत त्यांशीं बोलणें लाविलें कीं, आपण शिद्दीचे ताब्यांतील जंजीरा घेऊन महाराजांस देतों, आपणांस अमात्य पदवी मिळावी. संभाजीनें ही गोष्ट मान्य करून देशपांडे यांस तशी सनद करून दिली; आणि त्याचे मदतीस आपलें लष्कर दिलें.

या मोहिमेंत देशपांडे यांस यश आलें नाहीं, यामुळें त्यांस अमात्यपद देण्याचा बेत तसाच राहिला.

इ० स० १६८१ त रामदासस्वामी परळी येथें समाधिस्त झाले असतां संभाजीनें त्यांचा पुढील विधि करविण्याचे कामाकरितां रामचंद्रपंतांस आज्ञा करून तिकडे पाठविलें. रामचंद्रपंतांनीं परळीस जाऊन उद्धव गोसावी यांजकडून स्वामींचा अंत्यविधि करविला; आणि त्या ठिकाणीं समाधि व तिजवर लहानसें देवालय बांधून स्वामींचे मठसंस्थानची पुढची व्यवस्था लाविली.

यानंतर संभाजी रामचंद्रपंतास घेऊन समाधीचे दर्शनास गेला. तेव्हां त्यानें देवालय मोठें करण्याविषयीं रामचंद्रपंतास आज्ञा केली. पंतानीं समाधीसह देवालय मोठें बांधून स्वामींचे पुण्यतिथीचा उत्साह माघ वद्य १ पासून ९ पर्यंत करून दशमीचे दिवशीं ळळीत करण्याचें ठरविलें, आणि या कामाकरितां खर्चाची नेमणूक करविली.

रामचंद्रपंत हे संभाजीच्या कारकीर्दीच्या आरंभापासून अमात्याचें काम करीत होते, तथापि संभाजीचा याजवर झालेला रोष प्रथमतः कमी झालेला नव्हता. तो पुढें कांहीं दिवसांनीं कमी होत होत नाहींसा झाला. नंतर संभाजीनें यांस कुडाळपासून नरगुंद तुंगभद्रानदीपर्यंत देश स्वाधीन करून घेण्याकरितां पाठविलें. रामचंद्रपंतांनीं तिकडे जाऊन त्या प्रांताचा बंदोबस्त केला व आजूबाजूचा प्रदेश जिंकून मराठी राज्यांत सामील केला. या वेळीं सचिवीचें कामही रामचंद्रपंतांकडे सांगितलें होतें. कारण, अण्णाजी दत्तो मारला गेल्यापासून या हुद्यावर दुसऱ्याची नेमणूक झाली नव्हती.

संभाजीची कारकीर्द अशी होती कीं, राजा व्यसनांत निमग्न असून मनुष्याची निवड न जाणणारा होता. त्यानें ज्या कलुषास मुख्य

प्रधान केला होता, तो मंत्रतंत्र, होमहवनें यांनीं शत्रूपराभव व राज्य-वृद्धिविषयींचा भरंवसा बाळगून तीं कृत्यें करण्यांत गढलेला आणि राजास व्यसनें लावून त्या व्यसनास उत्तेजन देऊन राजाची मनोधारणा करणारा होता. त्याचे ठिकाणीं राज्य चालविण्यास व राजाची प्रसन्नता करून घेण्यास योग्य अशा अन्य साधनाविषयींचें अज्ञान होतें. राजा अशा प्रधानाचे सांगण्यावांचून इतर कोणाचेंही ऐकत नव्हता. व्यसन-परत्वामुळें त्यास विचार करण्यास वेळही मिळत नव्हता व त्याचे अंगीं तशी पात्रताही राहिली नव्हती.

रामचंद्रपंत व त्याचेसारखे जे थोडे शिवाजीचे वेळचे राज्यकारभारां-तील माहितगार, अनुभवी व कार्यकर्ते राहिले होते, त्यांचें यावेळीं कांहीं चालत नव्हतें. त्यांजवर राजाचा रोष होता. नव्या मुत्सद्यांचे अंगीं राज्यशकट चालविण्याचें सामर्थ्य नव्हतें यामुळें राज्यांत अव्यवस्था झाली, राज्य वाढण्याचा मार्ग राहिला, तें कमी होऊं लागलें. औरंग-जेब स्वतः हें राज्य बुडविण्याचे उद्योगास प्रवृत्त झाला. अशा वेळीं चातुर्य, दूरदृष्टि, दृढ उद्योग, साहस इत्यादि अनेक गुणांची राष्ट्रास गरज होती;. परंतु राजा व मुख्य प्रधान यांजवळ हे गुण नव्हते व अशा गुणी मनुष्याची त्यांस निवडही करितां येत नव्हती.

या स्थितीमुळें रामचंद्रपंतानें ही कारकीर्द जेमतेम आपला बोज राखून घालविली, आणि आपले चातुर्यानें कांहीं दिवसांनीं संभाजी-सारख्याचा आपणावरील विश्वास वाढविला. परंतु संभाजीनें याच्या ज्ञानाचा व कर्तबगारीचा उपयोग जितका करून घ्यावयास पाहिजे होता तितका करून घेतला नाहीं.

इ० स० १६८८।८९ त संभाजी व कलुषा यांस बादशहानें धरून नेऊन ठार मारल्याचें वर्तमान रायगड येथें समजलें. त्यावेळीं तेथें शिवाजीचे

कसास उतरलेले व राज्यभार वाहण्यास योग्य अशा मंडळींतील रामचंद्रपंत हाच कायतो असून नव्या होतकरू मुत्सद्यांतील प्रल्हाद निराजी हा एक होता.

रामचंद्रपंतानें सर्वांच्या विचारानें व संभाजीची स्त्री येसूबाई इच्या अनुमतानें औरंगजेबासारख्या प्रबल शत्रूपासून राज्यरक्षण होण्यास शिवाजी (शाहू) लहान असेपर्यंत राजारामानें राज्य करावें, असें ठरविलें; आणि त्यास गादीवर बसवून या समारंभाचीं आज्ञापत्रें, पोषाख, अलंकार हीं ठिकठिकाणचे सरदार व मानकरी यांजकडे गुप्त रीतीनें पाठविलीं. शिवाजीच्या वेळचे नियम चालू केले. संभाजीचे कारकीर्दींत लष्कर, सरदार, मुत्सद्दी, यांस आलेला शिथिलपणा व निरुत्साह घालविण्याचा, आणि ठिकठिकाणचा बंदोबस्त व लष्कर वाढविण्याचा प्रयत्न आरंभिला.

औरंगजेबास वाटत होतें कीं, संभाजीचे मरणानें मराठे हतवीर्य व विस्कळीत होतील; परंतु तसें न होतां त्यांनीं आपली जमवाजमव चालू केली असून रायगड येथें राहून उचल घेत आहेत असें पाहून त्यानें मनांत आणिलें कीं, राजासुद्धां सर्व धुरीण मंडळी रायगड येथें आहे ती आपले हस्तगत झाली असतां मराठ्यांचा अगदीं शेवट होईल. म्हणून त्यानें आपल्या नामांकित सरदारास फार मोठी फौज देऊन रायगडावर पाठविलें.

हें वर्तमान रामचंद्रपंतास समजतांच त्यास मोठा विचार पडला. त्यास पुढें येणारीं संकटें दिसूं लागलीं. त्यानें आपल्या बलाबलाचा व पुढील कर्तव्याचा विचार केला. त्यांत त्यास आढळून आलें कीं, अद्याप राज्याची पूर्वीसारखी व्यवस्था लागली नाहीं. ती लागण्याचे उपाय नुकतेच सुरू केले आहेत. शत्रूस तोंड देऊन लढणें किंवा अडविणें इतकी फौज व सरदार यांची तयारी झालेली नाहीं. यामुळें

शत्रूस प्रतिबंध न होतां या ठिकाणास लवकरच वेढा पडून त्यांत सर्वांस कोंडून रहावें लागेल. त्यापासून आपली तयारी होण्यास आणि प्रांताचा बंदोबस्त व दळणवळण राहण्यास अडचण येईल. वेढा उठविणें जरूर पडल्यास मदत मिळवितां व आणितां येणार नाहीं. वेढा घालणारास बाहेरून उपद्रव पोंचणार नाहीं. शत्रु बलाढ्य असून संभाजी व कलुषा यांस धरून नेऊन व त्यांचा नाश करून विजयी झाल्यानें उत्तेजन पावला आहे, व त्यानें तोच मार्ग आमच्या नाशाविषयीं योजिला आहे; ह्मणून तो या कामीं दीर्घ प्रयत्न केल्याशिवाय राहणार नाहीं.

याकरितां रायगड वर्ष सहा महिने लढेल, असा बंदोबस्त करून त्या ठिकाणीं शत्रुसेनेस गुंतून पाडावें आणि आपण सर्वांनीं बाहेर असावें. असें केल्यानें फुरसत मिळून फौजेची जमवाजमव व तयारी करितां येईल व ती होईपर्यंत अनेक हुलकावण्या व झुंकाड्या दाखवितां व देतां येतील. पुढें मदत पाठवून रायगडचा वेढा उठवितां येईल, मुलखाचा बंदोबस्त राखतां येईल, शत्रूस व त्याच्या प्रांतास उपद्रव देतां येईल, चोंहोंकडे दळणवळण ठेवितां येईल, अनेक मसलती करून त्या पार पाडण्याची तजवीज व व्यवस्था राहील. अशी अनेक प्रकारचीं सोय होईल.

रामचंद्रपंतानें याप्रमाणें येणाऱ्या संकटांचा व त्यांचें प्रतिकारांचा विचार करून रायगडचा चांगला बंदोबस्त केला. राजारामास तें ठिकाण सोडण्याविषयींची मसलत दिली. सर्वांच्या विचारानें तेथें येसूबाई व तिचा पुत्र शिवाजी यांस ठेविलें. नंतर शत्रूंस बातमी लागूं न देतां राजाराम कुटुंब व प्रमुखमंडळ यांसह परळी येथें आला; आणि तेथें रामाचें व स्वामींचे समाधीचें दर्शन घेऊन पन्हाळ्यास आला.

पुढें थोड्याच दिवसांत रायगडास वेढा पडल्याचें रामचंद्रपंतास समजलें. त्यानें तात्काळ बाळ जोशी संगमेश्वरकर यांजकडून मुहूर्त आणवून धनाजी जाधव व संताजी घोरपडे यांजबरोबर फौज व सरदार आणि त्यांचीं पथकें अशीं देऊन त्यांस रायगडाचा वेढा उठविण्यास व मोंगलास आणि त्यांचे प्रांतास उपद्रव देण्यास पाठविलें. या सर्व फौजेवर धनाजीस मुख्य नेमिलें होतें. या सर्व लष्कराच्या निरनिराळ्या टोळ्या होऊन त्यांनीं मोंगलास मनस्वी उपद्रव दिला.

या टोळ्यापैकीं संताजी घोरपडे यानें आपले लोकांसहित मोंगलांचे प्रांतास उपद्रव देत असतां अकस्मात् बादशहाचे थोरले लष्करावर छापा घालून खुद्द बादशहाचे डेऱ्याचे कळस लुटून आणिले आणि परत येत असतां रायगडाजवळ झुलफिकारखानाचे लष्करावर हल्ला करून त्याचे लष्करांतील हत्ती पाडाव करून आणिले. त्यावरून राजारामानें घोरपड्यास मोठा किताब दिला.

रामचंद्रपंतास घोरपड्यास दिलेला किताब त्याचे शूरत्वास पुरेसा न वाटून समाधान वाटलें नाहीं. त्यानें त्यास सेनापतीचें पद देण्याविषयींची राजारामाजवळ शिफारस केली. राजारामानें पंतास सांगितलें कीं, माझ्या मनांतून हा किताब धनाजी जाधवास द्यावयाचा आहे. त्यावरून रामचंद्रपंतानें त्यास सांगितलें कीं, घोरपडे हे शूर असून त्यांनीं हल्लीं केलेला पराक्रम अवर्णनीय व निरुपम आहे. ते आपले गुणाची परीक्षा देऊन कसास उतरले आहेत. या पदास असाच अलौकिक पराक्रमाचा पुरुष पात्र आहे. यावेळीं शौर्य व गुण यांची चहा होऊन ते वाढविणें अगत्याचें आहे. शौर्य गाजविण्याविषयीं हुरूप उत्पन्न करविण्याच्या कालांत, सवड असतां कामगिरीप्रमाणें बक्षीस न देणें हें फार अहितकारक होईल. आपल्या फौजेंत

सेनापति नाहीं. हंबीररावाचेंही आतां कोणी नाहीं. याकरितां हें पद घोरपड्यास द्यावें. याप्रमाणें रामचंद्रपंताच्या विचारपूर्वक दिलेल्या सल्लामसलतीच्यायोगानें राजारामानें आपला संकल्प फिरवून घोरपडे यांस सेनापतीचें पद दिलें.

अशी मराठ्यांची आपल्या उत्कर्षाची तयारी व खटपट सुरूं असतां, त्याजवर मोंगलांची मोठी फौज येऊन तिच्या निरानिराळ्या टोळ्या झाल्या व त्या मराठी राज्यांत पसरल्या. उभयपक्षांत युद्धें होऊं लागलीं. मराठ्यांची झालेली फौजेची तयारी मोंगलांचे प्रतिकारास पुरी पडेना. राजारामास व त्याचे मंत्री-मंडळास वारंवार स्थलांतरें करावीं लागलीं. एके ठिकाणीं विसांवा घेऊन एकादी मसलत करण्यास अवकाश मिळेना. जिकडे जावें तिकडे मोंगलांची फौज आहेच. त्याच्या अफाट सेनासमुद्राचा सर्वत्र प्रवेश होऊं लागला. दिवसानुदिवस त्या फौजेपुढें मराठ्यांचें कांहीं चालेनासें झालें. एकेक ठिकाण शत्रूचे हस्तगत होऊं लागलें. राजारामास स्वतःचे रक्षणाची काळजी वा लागली; आणि महाराष्ट्रांत मराठ्यांचें राज्य राहण्याविषयीं बहुतेकांची निराशा झाली.

तेव्हां याचे विचारासाठीं राजारामासहित सर्व मंत्रीमंडळ एकत्र जमलें. त्यांत रामचंद्रपंतानें सर्वांचे विचारानें ठरविलें कीं, राजारामानें या प्रांतीं राहून निभाव लागणार नाहीं. याकरितां त्याच्यासहित सर्वांनीं चंदीस जाऊन आपला बचाव करावा आणि तेथें जमाव जमवून आपलें सामर्थ्य वाढवावें. मागें कोणीतरी योग्य सरदारानें राहून महाराष्ट्रांतील राज्याचें रक्षण करावें.

यानंतर मागें महाराष्ट्रांत राज्य रक्षणाकरितां कोणीं रहावें, कोण योग्य असून ही कामगिरी पतकरितो, याविषयीं विचार चालला. " ज्यावेळीं

आपली सेना नाश पावली आहे व पावत आहे, प्रबल शत्रू युद्धास उभा आहे, त्याचे हल्ले सुरू आहेत, आपल्या नव्या तयारीस त्यांजकडून प्रतिबंध होत आहे, आपली निभावणी होत नाहीं असें जाणून राजा राज्याचा त्याग करून दूर देशीं जात आहे आणि त्याजबरोबरच बहुतेक निवडक सरदार व मुत्सद्दीही जात आहेत, अशावेळीं ही कामागिरी कोण पतकरणार?'' शेवटीं अशा बिकट प्रसंगीं रामचंद्रपंतानें अत्यंत दुर्घट, जोखमीची, मोठ्या धाडसाची अशी हीं कामागिरी स्वतः करण्याचें पतकरलें.

राजाराम निराश होत्साता चंदीस जात असतां त्यानें राज्य, लोकलोकपाल व स्वामित्व हीं सर्व रामचंद्रपंताचे स्वाधीन करून त्यास सांगितलें कीं, रांगणा, गगनगड, विशाळगड वगैरे किल्ले व प्रांत यांचें संरक्षण करून संस्थान जतन होईल असें करावें, मोंगलांशीं लढाया द्याव्या, शिवाजीची सुटका होईल अशी तजवीज करावी. विशाळगडीं सर्व काबिला (राजकुटुंब) आहे त्याचें संरक्षण करावें. इकडील वर्तमान नेहमीं चंदीस कळवीत असावें. तुमचे हाताखालीं राहून संताजी घोरपडे व त्यांचे बंधू बहिरजी आणि मालोजी यांनीं सांगाल ती कामगिरी करावी इत्यादि पुष्कळ प्रकारांनीं सांगून अखेरीस तुम्हांस पुढें सुचेल तसें करावें असा पूर्ण अधिकार दिला.

रामचंद्रपंतानें बाळ जोशी यांजकडून मुहूर्त आणवून, चतुर व होतकरू अशा प्रल्हादपंतास सर्व मुत्सद्दी व सरदार यांसह राजारामाबरोबर देऊन, वाटेनें उघडकीस येणार नाहीं असें जाण्यास सांगून, त्याची चंदीस रवानगी करून दिली आणि आपण पुढील तजविजीस लागला.

मराठ्यांस ही वेळ अनिष्ट व धोक्याची आली होती. औरंगजेब जातीनें दक्षिणेंत राहून आपल्या सर्व सामर्थ्यानें त्यास बुडविण्याचा यत्न करीत होता. बादशहा युद्धकलाप्रवीण असून, कणीकनीतिनिपुण,

व्यवहारदक्ष, अनुभवी अशा अनेक गुणांनीं युक्त होता. त्यानें विजापुरासारखीं राज्यें बुडवून सर्वत्र आपली सत्ता व दरारा बसविला होता. त्याचेजवळ असंख्य खजिना, समुद्रासारखी अफाट सेना आणि उत्तम उत्तम सरदार अशी युद्धसामग्री होती. अशा प्रबल शत्रूपुढें मराठ्यांस टिकाव धरावयाचा असून, त्यांच्यांतील एकट्या रामचंद्रपंताच्या बुद्धिसामर्थ्यावर व कर्तृत्वावर ती गोष्ट अवलंबून राहिली होती. मराठ्यांच्या सैन्याचा ठिकठिकाणीं पराभव होऊन व ठिकाणें जाऊन ते धाकानें व भीतीनें नाउमेद झाले होते. त्यांच्याजवळ ह्मणण्यासारखें सैन्य, खजिना, दारूगोळा वगैरे युद्धोपयोगी साहित्य राहिलें नव्हतें. एकंदरींत हा प्रसंग शौर्य, धैर्य, गांभीर्य, कल्पकता, दूरदृष्टि, अनुभव इत्यादि अनेक गुणांपैकीं एक दोन गुण अंगीं असणारांकडून निभावण्यासारखा नव्हता. अशा आणीबाणीच्या प्रसंगीं राज्यसूत्रें हातीं घेणें हें साहसाचें, धाडसाचें व धोक्याचें काम असून, तें रामचंद्रपंतानें अंगिकारिलें होतें.

राजारामाची रवानगी चंदीस होतांच रामचंद्रपंतानें एकदम आपल्या कामाकरितां निरनिराळ्या तजविजी व उपाय सुरू केले. फुटकळ मराठे सरदारांस मोंगलांचे लष्करास व प्रांतास उपद्रव देण्याविषयीं कळवून, त्यांजकडून तो क्रम सुरू करविला. किल्ल्यावर दारूगोळा व लोक यांची भरती करून त्यांस मजबुती आणिली. कोंकणांतून लोक आणून सैन्याची भरती चालविली. वाडीकर खेम सांवत यांजकडे रामाजी अप्पाजी यांस पाठवून त्याशीं तह केला. वाडीकराच्या पदरचे सोनजी राणे, चांदजी राणे वगैरे सरदारांस वतनदाऱ्या देऊन त्यांस आपले पदरीं ठेवून घेतलें. ( राणे घराण्यांतील कानजी, रावजी, जेताजी वगैरे पुष्कळ लोकांनीं अमात्यास फार चांगली मदत केली. ) शिवाजीच्या वेळचे लष्करी नियम सुरू केले. जसजशी फौज जमू

लागली तसतशी तिच्या वेगळाल्या टोळ्या बादशाही प्रांतास व लष्करास उपद्रव देण्याकरितां पाठविल्या. जो जो जिकडे जिकडे जाऊन अम्मल बसवितों असें ह्मणाला, त्यास त्यास तिकडे तिकडे पाठविलें. संताजी घोरपडे यास कर्नाटकचे बाजूस पाठविलें. आपण आपला प्रदेश संभाळून शत्रूचे प्रदेशीं फौजा घालण्याचा व तो मारण्याचा (लुटण्याचा) उद्योग सुरू केला.

याप्रमाणें रामचंद्रपंताची खटपट सुरू असतां मोंगलाचे लोक पुढें सरकत होते. त्यांत मोंगलांचा वेढा पन्हाळ्यास पडला असतां, तेथें कागलकर घाटगे होते. त्यांनीं त्याशीं लढाई चालवून अमात्याकडे मदत मिळण्याविषयीं कळविलें. अमात्यांनीं आपल्याजवळील थोडे लोक पन्हाळ्यास पाठवून संताजी घोरपडे यांस मदतीस जाण्याविषयीं लिहिलें. त्याप्रमाणें घोरपडे हे मदतीस गेले नाहींत. घाटगे यांनीं मोठ्या शौर्यानें लढाई चालवून लढण्याची पराकाष्ठा केली. त्यांत पुढें आपला निभाव दिसेना; तेव्हां त्यांनीं अमात्यास कळविलें कीं, आमची लढण्याची शर्थ झाली. घोरपड्याकडून मदत आली नाहीं. यानंतर आमचा परिणाम काय? हा निरोप पोंचतांच अमात्यांनीं घाटगे यांस कळविलें कीं, हरतऱ्हा करून तुह्मीं आपले प्राण वांचवा. किल्ला दिल्यास हरकत नाहीं. बाजत बरसात झाल्यानंतर परत घेतां येईल. त्याची काय बिशाद आहे?

घोरपडे यास रामचंद्रपंताचे हुकमतींत वागण्याविषयीं महाराजांची आज्ञा असतां या प्रसंगीं पन्हाळ्यास मदत केली नाहीं. शेंडूर प्रांतांतील झाडींत राहून व गुत्ती वगैरे ठिकाणें घेऊन तुंगभद्रा नदीपर्यंत मुलूख लुटीत राहिले. ही गोष्ट अमात्यांनीं चंदीस महाराजांकडे कळविली. राजारामानें जासूद पाठवून घोरपड्याकडील अधिकाराचे शिक्के

आणवून ते रामचंद्रपंताकडे पाठविले. याप्रमाणें महाराजांची इतराजी होतांच घोरपडे रामचंद्रपंताचे भेटीकरितां विशाळगडीं आले. तेथें त्यांस रामचंद्रपंतानें सांगून पाठविलें कीं, मी आपली भेट घेऊं इच्छित नाहीं. महाराज सेनापतीचीं वस्त्रें जाधवराव यांस देत असतां तीं तुह्मांस देवविलीं त्याचे उत्तम उतराई झालांत. आतां आह्मांस तुमची शिफारस महाराजांकडे करतां यावयाची नाहीं. याकरितां आपणच महाराजांकडे जावें. संताजीनें नानाप्रकारच्या आर्जवांनीं रामचंद्रपंताची भेट घेण्याची खटपट केली; परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. तेव्हां त्यानें आपले बंधू बहिरजी व मालोजी यांस विशाळगडीं रामचंद्रपंताजवळ ठेवून आपण चंदीस जाण्याचें ठरविलें. संताजीनें चंदीस जाऊन त्या ठिकाणीं मोठमोठीं धाडसाचीं कामें करून राजारामाची मर्जी संपादन केली.

अशी स्थिति असतां चंदीहून पुष्कळशा सनदा रामचंद्रपंताकडे आल्या. तो प्रकार असा:—

पूर्वी बादशाही अमलांत त्यांतील नौकर किंवा इतर यांनीं बादशहाकडून पुष्कळ सनदा मिळविल्या असून त्यांचा अम्मल मात्र झालेला नव्हता, किंवा त्या पोंकळ होत्या असें ह्मणतां येईल. अशा अनेक सनदा घेऊन लोक चंदीस राजारामाकडे जाऊन त्या आधारें नव्या सनदा घेऊन महाराष्ट्रांत आले. या सनदा कांहीं जुन्या सनदांचे आधारें व कांहीं नव्या सनदांचे आधारें तयार झाल्या होत्या.

मूळ बादशहाकडील सनदा हल्लींचे लोकांनीं किंवा त्यांच्या वडिलांनीं मिळविल्या असून, त्या मिळविण्याची रीति किंवा पद्धति पुढीलप्रमाणें होती.

हा प्रांत विजापूरचा बादशहा अली अदीलशहा याच्या ताब्यांतून मराठ्यांचे ताब्यांत आला, तेव्हां बादशहाचे पदरीं असणारे या

प्रांतांतील लोक आपापले घरीं येऊं लागले. त्यांनीं येतांना बादशहास अर्ज केला कीं, आह्मीं आपले घरीं जातों, आह्मांस तैनात पोंचली नाहीं. आमचे प्रांतांतून आपलीं ठाणीं उठून आलीं. त्या प्रांतीं साहेबांचा नक्षा राहील, असें देणें द्यावें. असा अर्ज करून ज्यास ज्या गोष्टीचें अगत्य होतें, त्यानें त्या त्या गोष्टीविषयीं फर्मान मागितलें. बादशहानें त्यांच्या मागण्याप्रमाणें फर्मानें दिलीं. यावेळीं फर्मान मिळविण्यास लहान काम असतां मुनशी २, अर्जबेग २, व नजर ५, आणि मोठें काम असतां मुनशी ३, अर्जबेग ३, व नजर १०, असा खर्च येत असे. याप्रमाणें द्रव्याची तयारी झाल्यानंतर अर्जदारानें मुनशीस सांगावें कीं, अमूक कामास फर्मान पाहिजे. यानंतर मुनशीनें अर्जबेगास कळवावें आणि त्यानें बादशहास कळवावें कीं, अमूक जमातदार आपले घरीं जात आहे. त्यास पैसा पोंचला नाहीं याकरितां अफाट शिरपाव मागत आहे, वगैरे सांगितलें असतां फर्मान मिळत असे. ही फर्मान देण्यांत खर्चाची व पायरीची रीति शिवाजीनें आपल्या कारकीर्दींत आपल्या देणगीचे वेळीं चालू ठेविली होती, असें ह्मणतात.

या प्रकारच्या बादशहाकडून मिळविलेल्या व त्यानंतर शिवाजी, संभाजी यांच्या कारकीर्दींतील भोगवटा न मिळालेल्या अशा सनदांच्या आधारानें नव्या झालेल्या व कांहीं अगदीं नव्या सनदा, या सर्व इ० स० १६९१त भोगवटा मिळविण्याकरितां व दाखला राहून पुऱ्या होण्याकरितां रामचंद्रपंताकडे आल्या.

राज्याचा बंदोबस्त न होतां अशा सनदा मात्र फार आल्या. त्यायोगानें रामचंद्रपंतास मोठा विचार पडला. त्यानें विशाळगडीं ताराबाईचे समक्ष सर्व राजमंडळचे लोक ( यावेळीं जवळ असणारे )

मिळवून या गोष्टीचा खल केला आणि कांहीं नियम केले. त्यांतील ठोकळ ठोकळ पुढें दिले आहेत.

१. ज्यांनीं शंभर करीची सनद घेतली असेल, त्यास निम्में द्यावें.

२. ज्यांनीं जमिनीची सनद घेतली असेल त्यांस निम्में द्यावें.

३. ज्यांनीं गांव, मुकाशे, यांच्या सनदा आणिल्या असतील, त्यांतील ज्यांस गांव सरेसारखे ( जे लोक गांव भोगण्यायोग्य ) असतील त्यासच गांव द्यावे; बाकीच्यांस ऐवजमात्र द्यावा. आणि हीं देणीं कार्यभाग जाणून द्यावीं.

४. बादशहाकडे प्रांत नसतां मिळविलेले फर्मानाबद्दल कांहीं देऊं नये.

५. देसकत, देशपांड्ये वगैरे मोठ्या उत्पन्नाबद्दल बादशहाचें फर्मान, तसेंच शिवाजी व संभाजी राजे यांचीं आज्ञापत्रें वगैरे असून भोगवटा असल्यास हीं उत्पन्नें द्यावीं. तसें नसल्यास कांहीं देऊं नये.

अशा प्रकारचे नियम करून याच सालीं त्यानें खारेंपाटण, संवदळ, राजापूर, लांजें, संगमेश्वर, साळशी या सहा महालांतील सनदांची व्यवस्था लाविली; व पुढें हाच क्रम चालू ठेविला.

राजाराम चंदीस गेल्यावेळीं ताराबाई गरोदर असून त्यानें तिला विशाळगडीं ठेविलें होतें. तेथें ती इ० स० १६९१ त प्रसूत होऊन तिला पुत्र झाला. त्याचें नांव शिवाजी असें ठेविलें. रामचंद्रपंत इकडील हरएक वर्तमान चंदीस कळवीत असे. त्याप्रमाणें त्यानें हें पुत्र झाल्याचें वर्तमान राजारामास कळविलें.

पुढें कांहीं दिवसांनीं राजारामानें आपल्या कुटुंबाचीं मंडळी चंदीस पाठविण्याविषयीं रामचंद्रपंतास लिहून विशाळगडास लोक पाठविले. रामचंद्रपंतानें खंडो बल्लाळ चिटणीस याचे आप्त राजापूर येथील बिसाजी शंकर सावकार यास विशाळगडीं बोलावून आणिलें आणि त्याचे विश्वासूपणाची खात्री करून घेऊन त्यांचे जहाजांतून जलमार्गानें राजकुटुंबाची रवानगी चंदीस केली; आणि ही बातमी कोणास कळूं नये याविषयीं फार खबरदारी ठेविली. पुढें त्यास मंडळी सुखरूप पोंचल्याचें लिहून आलें.

रामचंद्रपंताजवळ असलेल्या कारकुनांतील परशुराम त्रिंबक कुलकर्णी किन्हईकर व शंकराजी नारायण हे शूरत्वांत व हुशारींत पुढें पुढें सरसावत होते. इ० स० १६९२ त रामचंद्रपंतानें या दोघांस मोंगलांचे अमलांत गेलेले किल्ले व प्रांत हीं परत घेण्यास बरोबर लोक देऊन पाठविलें, आणि आपण जातीनेंही त्या उद्योगास लागला. त्यानें लढून पन्हाळा घेतला. शंकराजी नारायण यानें मोठ्या शूरत्वानें मोंगलापासून राजगड परत घेतला. या त्याच्या कामगिरीनें संतुष्ट होऊन रामचंद्रपंतानें त्यास वांई परगण्याची मामलत दिली. मोंगलापासून किल्ले व प्रांत परत घेण्यांत शंकराजीपंत व परशुरामपंत यांचे मोठे पराक्रम होत असलेले पाहून तें वर्तमान रामचंद्रपंतानें चंदी येथें राजारामास कळविलें, आणि त्याजकडून शंकराजीपंतास मदारूल महाम व परशुरामपंतास समशेर बहादूर शहाजंग असे किताब आणवून दिले.

राजाराम चंदीस गेल्यानंतर तेथें त्यानें अष्टप्रधानांच्या नेमणुका केल्यांत रामचंद्रपंताकडील अमात्यपद हणमंते यास दिलें. हें पद निळो सोनदेव यास मिळण्याच्यापूर्वी कांहीं दिवस हणमंते यांजकडे होतें. तें आपल्यास मिळावें अशी हणमंते याची अत्यंत खटपट

होती. चंदी येथें हणमंते महाराजांचे उपयोगीं पुष्कळ पडले असून, त्यांनीं फार दिवसांपूर्वीं गमावलेला आपला अधिकार मिळण्याबद्दल महाराजांजवळ अत्यंत आग्रह धरिला; तेव्हां राजारामानें त्यास तो अधिकार दिला; आणि रामचंद्रपंत यांस हुकुमतपन्हा ( हुकूम करतील तो महाराजांनींही मोडूं नये ) असा किताब व अधिकार दिला. तसेंच अष्टप्रधानांप्रमाणें मानमान्यतेची योग्यता देऊन विशाळगडीं वस्त्रें पाठवून दिलीं. हणमंते यांच्या आग्रह व समाधानीकरितां त्यास अमात्यपद दिलें, परंतु राजारामानें रामचंद्रपंताची थोर योग्यता जाणून त्यास फार मोठ्या योग्यतेची नवी पदवी योजून दिली. याच वेळीं संताजी घोरपडे यास पुनः सेनापतीचें पद देऊन त्यास व धनाजी जाधव यास महाराष्ट्र मुलखीं रामचंद्रपंताचे मदतीस पाठविलें.

इ० स० १६९३ त फिरून मोंगलांनीं पन्हाळ्यास वेढा घातला. तो उठविण्याकरितां रामचंद्रपंतानें माणकोजी, हिरोजी, बापूजी, प्रतापजी, साठम इत्यादि सरदारांबरोबर सैन्य देऊन पाठविलें. या वेळीं कितीएक किल्ले व प्रांत मोंगल व मराठ्यांचे ताब्यांत जात येत असत. त्यास वेढे पडत व उठत. अशी त्यांची आंदोलकाप्रमाणें दोहों बाजूंकडे स्थिति असे. कांहीं किल्ल्यांस दरसाल वेढा व लढाई हीं नियमित अशीं झालीं होतीं. कित्येक प्रदेश दोन दोन तीन तीन वेळां एकमेकांचे ताब्यांत आले व गेले. तथापि मराठ्यांनीं किल्ले, प्रांत, हे मुसलमानांचे अमलांत फार दिवस राहूं दिले नाहींत.

संताजी घोरपडे यानें मिरज प्रांत मोंगलापासून घेतला. याजकरितां रामचंद्रपंतानें त्यास त्या प्रांतांची देशमुखी दिली. रामचंद्रपंतानें विचार केला कीं, असें देणें देण्याइतका अधिकार धन्यानें आपल्यास दिला आहे, आणि यांत धन्याचें हितही आहे. याचप्रमाणें असेच ज्यांनीं ज्यांनीं राज्याभिवृद्धीस मनःपूर्वक मदत केली, त्यांस त्यानें आपल्या

अधिकारांत देणग्या दिल्या व कांहीं लोकांच्या महाराजाकडे शिफारसी केल्या.

इ० स० १६९४।१६९५ त राजारामानें आबाजी सोनदेव यांचे नांवें गडकिल्ल्याचे मामल्याचें काम रामचंद्रपंताचे हुकुमानें चालविण्याची सनद दिली.

त्या सनदेंत हें काम करण्यास आपलेसारखा "मोकार मनुष्य असावा लागतो" इत्यादि आबाजीपंताचें शौर्यगुणाचे दर्शक शब्द आहेत.

रामचंद्रपंतानें सरदार व शिपाई यांस बक्षिसानें, शिफारसीनें उत्तेजन देऊन व त्यांस निरनिराळ्या कामगिऱ्या व त्यांचीं स्थानें यांची योजना करून त्याजकडून तीं तीं कामें करून घेतलीं. जरूर तेथें मदती पाठविल्या. असे त्याचेएकसारखे अव्याहत उद्योग सुरू होते.

बादशहाकडून नव्या नव्या येणाऱ्या फौजेच्या टोळ्या व प्रांतांत असणारे त्याचे सरदार यांजकडून मराठ्यांस वारंवार अडथळे होत होते. तथापि रामचंद्रपंतानें त्यांस न जुमानितां जेथें तेथें त्यांचा नाश केला, त्यांचा मुलूख लुटून खर्चाची बेगमी केली, कोंकण व घांट बांधारीचे किल्ले, मुलुख यांचें संरक्षण केलें. वारंवार चंदीकडे मदत पाठविली आणि क्रमाक्रमानें आपला पक्ष जोरांत आणिला.

या पूर्वीं बादशहास मराठ्यांची काळजी किंवा खातर वाटत नव्हती. आतां ती त्यास वाटूं लागली. तो जातीनें महाराष्ट्रांत मराठ्यांचे नाशाविषयीं प्रयत्न करीत असतां, त्यांचा नाश न होतां दिवसानुदिवस त्यांची शक्ति वाढूं लागली, आणि त्यांजपासून त्यास अत्यंत उपद्रव होऊं लागला. तेव्हां बादशहास वाटूं लागलें कीं, आपला चंदीकडील

लढाईचा कार्यभाग लवकर आटपला असतां मराठे नाउमेद होतील, आणि तिकडे गुंतलेलें आपलें सैन्य मोकळें होऊन आपणांस या प्रांतीं मदतीस येईल. ह्मणून त्यानें चंदीकडील लढाई नेटानें चालविण्याची तजवीज केली आणि आपण त्या लढाईच्या निकालाची वाट पहात व मराठ्यांचा उपद्रव सोसीत राहिला.

बादशहा दक्षिणेस गलगले गांवीं जाण्यानें समजत होता कीं, मराठे तिकडे येतील; परंतु रामचंद्रपंत पूर्वेस सोलापुरापर्यंत मुलूख लुटीत राहिला. बादशहा आपला उद्देश सिद्धीस जात नाहीं असें पाहून भीमातीरीं परत आला.

बादशहा विजापुरीं गेला असें पाहून रामचंद्रपंतानें शंकराजी नारायण यास मोंगलांचे ताब्यांत गेलेले किल्ले परत घेण्यास पाठविलें आणि आपण विशाळगडाहून निघून पन्हाळा व पावनगड यांजवर हल्ले केले. या किल्ल्यास माळा लावून आपले लोक वर चढविले आणि शत्रूचे लोकांस हांकून लाविलें.

शंकराजी नारायण यानें सिंहगड, पुरंदर, तोरणा, रोहिडा, पुणें वगैरे प्रांत व किल्ले मोठ्या शौर्यानें जिंकून घेतले. हें वर्तमान रामचंद्रपंतानें राजारामास कळविलें.

राजाराम चंदी येथें असतां महाराष्ट्रांत त्याचे ठिकाणीं रामचंद्रपंत हुकुमतपन्हा होता. त्याचे मदतीस जाधव, घोरपडे हे चंदीहून पाठविले होते. त्यांनीं मोंगलांच्या मुलुखांत कहर मांडिला होता. रामचंद्रपंताचे हाताखालीं वहिवाटून परशुराम त्रिंबक, शंकराजी नारायण वगैरे मंडळी शौर्य गाजवून प्रसिद्धीस येत होती. इतर सरदार आपापले शक्तीप्रमाणें कामें करीत होते. या सर्वांचीं सूत्रें हुकुमतपन्हा

याजकडे होतीं. तीं त्यानें उत्तम वहिवाटून सर्वांकडून योग्य कामगिऱ्या घेतल्या. स्वतः लढाया व लुटी करून राज्य रक्षिलें व वाढविलें; आणि आपले पक्षास इतकें सामर्थ्य आणिलें कीं, त्यास स्वतःचे (महाराष्ट्रांतील) मुलुखाचें संरक्षण करिता येऊन चंदीकडेही मदत पाठवितां आली. हीं मराठ्यांची मदतीचीं सैन्यें बादशहाकडून त्याचे सैन्याकडे जाणारी मदत, सामुग्री व द्रव्य यांस उपद्रव देत असत आणि वेढा घालणाऱ्या मोंगल सैन्याचे आजूबाजूस राहून त्यास उपद्रव देण्याचें काम करीत. यापासून वेढ्याचें काम बरोबर न चालून किल्ला फार दिवस लढविण्यास राजारामास मदत झाली. एक वेळ इ० स० १६९३ त संताजी घोरपडे यानें चंदीजवळ मोंगल सैन्याचा चांगला पराभव केला.

अशी मदत होत असतांही राजारामास चंदीचा वेढा उठण्याचा संभव दिसेना. मोंगलांचा उपद्रव फार होऊं लागला. किल्ला त्यांचे हातीं जाईल असा सुमार दिसूं लागला. तेव्हां त्यानें विचार केला कीं, आतां या ठिकाणीं राहून आपला निभाव लागणार नाहीं. आपण देशीं जावें. तिकडे रामचंद्रपंत बेलाग असे किल्ले व फौज बाळगून आहे. शंकाजीपंत व परशुरामपंत असे कर्ते निपजले आहेत. इकडील दौलत टाकून गेल्यास हरकत नाहीं. तिकडे सर्व मंडळी राज्य रक्षून आहेत. कोणत्याही गोष्टीची उणीव नाहीं. हा विचार करून तो इ० स० १६९७ चे दिसेंबर महिन्यांत तेथून गुप्तरूपानें निघून विशाळगडीं येऊन पोंचला.

राजाराम विशाळगडीं आल्यानंतर रामचंद्रपंत, शंकाजीपंत व परशुरामपंत या त्रिवर्गांनीं त्यास विनंति केली कीं, आजपर्यंत कळलें तसें राज्याचें रक्षण केलें, यापुढें महाराजांनीं बंदोबस्त राखावा. हें ऐकून राजाराम संतुष्ट होऊन त्यानें त्यास सांगितलें कीं, आजवर तुम्हींच हें

राज्य रक्षण केलें आहे आणि यापुढेंही त्याचें संरक्षण करणारे तुह्मींच आहां. अशी योग्य प्रशंसा करून त्यानें त्यांस वस्त्रेंभूषणें देऊन त्यांचा मोठा गौरव केला.

रामचंद्रपंत हुकुमतपन्हा याचे अंगचे कर्तृत्वानें व श्रमानें राज्य रक्षण होऊन आपणास इकडे येऊन राहण्यास जागा राहिली, यामुळें राजारामास संतोष होऊन त्यानें सर्व कारभाराचें काम त्याजवर सोंपविलें. तो कोणतेंही काम त्याच्या विचारावांचून करीनासा झाला. त्यानें त्याचे कारभाराचे मदतीस, अंताजी मंगाजी वाकनीस व आबाजी निळो पारसनवीस यांस सरंजाम देऊन, दिले.

जरी सर्व कारभार रामचंद्रपंताचे मसलतीनें चालत होता, तरी त्यास या वेळीं हुकुमतपन्हा या पदापासून संतोष वाटेनासा झाला. राजाराम चंदीस असतां या पदाचा जितका उपयोग व मोठेपणा होता, तितका आतां राहिला नाहीं. त्यास पूर्वीचें यापेक्षां कमी योग्यतेचें अमात्यपद उपयोगीं वाटूं लागलें. राजा जवळ असतां हुकुमतपन्हा किंवा प्रतिनिधि-सारखीं पदें कार्यकर्त्या व तेजस्वी पुरुषास निरुपयोगी वाटावीं, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तसें रामचंद्रपंतास वाटून त्यास उदासीनता आली. ही त्याची वृत्ति वाकनिसांनीं राजारामास कळविली. राजा-रामास या गोष्टीचा मोठा विचार पडला कीं, रामचंद्रपंतास अमात्यपद दिल्यास हल्लीं हणमंते अमात्य आहेत त्याची तजवीज काय करावी. त्यावर चिटणीस यांनीं सुचविलें कीं, प्रतिनिधिपद नारो प्रल्हाद याजकडे आहे; परंतु तो बापासारखा पराक्रमी नाहीं. तेव्हां त्यास दुसरें कांहीं तरी काम सांगून हणमंते यास प्रतिनिधिपद द्यावें व रामचंद्रपंतास अमात्यपद द्यावें. यापासून दोघेही संतुष्ट होतील. ही युक्ति राजा-रामास पसंत पडून त्यानें त्याप्रमाणें इ० स० १६९८ त रामचंद्रपंतास

हुकुमतपन्हा पद कायम ठेवून शिवाय अमात्य पद दिलें; आणि त्याचा कारकून शंकराजी नारायण यास सचीव पद दिलें.

यापुढें रामचंद्रपंत या दोन्हीं पदांचीं कामें झटून व हुषारीनें करूं लागला. त्यानें राजधानीस सोईची अशी सातारा ही जागा ठरवून तेथें राजधानी करविली.

याप्रमाणें रामचंद्रपंत मोठ्या दक्षतेनें कारभाराचें काम चालवीत असतां इ० स० १७००त राजाराम स्वारी करून सिंहगडीं परत आला. या स्वारीच्या श्रमानें त्यास विषमज्वर झाला. त्यास आपण या आजारांतून वांचत नाहीं असें वाटतांच, त्यानें रामचंद्रपंत आदिकरून प्रधान व सरदार यांस जवळ बोलावून सांगितलें कीं, माझा अंतकाळ जवळ आला, माझ्या पश्चात्चें कर्तव्य तुह्मीं सर्व जाणत आहां. तुह्मीं प्रत्येक प्रतिसृष्टि करणारे आहां. माझे मरणानें श्रमास अंतर करूं नका. शिवाजी सुटून येतील असें करा. सर्वजण रामचंद्र-पंताचे आज्ञेंत वागा. असें सांगून सर्वांस रामचंद्रपंताचे हातीं व रामचंद्रपंतास सर्वांचे हातीं देऊन आपण ईश्वरभजनीं चित्त लावून परधामास गेला.

पुढें रामचंद्रपंतानें विठोजी राजे भोसले बावीकर याचे वंशांतील शिवाजी राजे भोसले यास आणवून त्याजकडून राजारामाचा अंत्यविधि करविला व दानधर्म फार केला.

शिवाजीचा नित्यपूजेचा बाण राजाराम आपलेजवळ बाळगून प्रत्यहीं पूजा करीत असे. राजारामाचे मरणानंतर रामचंद्रपंतानें त्या बाणाची स्थापना सिंहगडीं करून त्याजकडे नित्य पूजा, नैवेद्य, नंदा-दीप, चौघडा, भालदार, चोपदार वगैरेंची नेमणूक केली आणि ही व्यवस्था कायम चालावी यासाठीं सरंजाम नेमून दिला. तसेंच राजा-

रामाचे पुण्यतिथीचा समारंभ व्हावा असें ठरवून त्याचे खर्चास अंभेपुरी हा गांव व सरंजाम नेमून दिला आणि त्याची देखरेख सिंहगडच्या हवालदारानें अमात्यांनीं ठरवून दिलेले नियमाप्रमाणें पहावी अशी योजना केली. तशी पद्धत व वहिवाट अद्याप चालत आहे.

रामचंद्रपंतानें राजारामाचे मृत्यूचें वर्तमान पन्हाळा येथें ताराबाई, राजसबाई, उभयतां राजपुत्र यांस व विशाळगडीं अंबिकाबाईस कळविलें. अंबिकाबाईनें पतीचा देह अप्राप्त असें जाणून त्याचे पागोट्याशीं सहगमन केलें. हें वर्तमान रामचंद्रपंतास समजलें. त्यानें त्या ठिकाणीं पुष्कळ दानधर्म केला.

राजारामाच्या मृत्यूचें वर्तमान औरंगजेबास समजतांच त्यास वाटलें कीं, आपणास ही अनुकूल संधि प्राप्त झाली आहे. यावेळीं स्वारी केली असतां मराठ्यांकडून प्रतिबंध न होतां ते नाश पावतील. असें मनांत योजून त्यानें तत्काळ शाहिस्तेखानाबरोबर मोठें सैन्य देऊन त्यास मराठ्यांवर पाठविलें.

हें वर्तमान रामचंद्रपंतास समजलें. पूर्वींप्रमाणें पुन्हा दुसऱ्यानें स्वराज्य रक्षणासाठीं त्यास आपली सर्वशक्ति व बुद्धिसर्वस्व खर्च करण्याची पाळी आली.

मराठ्यांकडे एक धनी कैदेंत, एक धनी मृत्यु पावलेला, राजपुत्र अज्ञान, लोक दुःखी असून, सैन्य, द्रव्य, युद्धसामग्री हीं जेमतेम बाताबेताचीं होतीं.

शत्रूकडे युद्धकुशल व कावेबाज असा बादशहा स्वतः युद्ध चालविणारा, नामांकित व कसलेले सरदार, असंख्य सैन्य, भरपूर खजिना, विपुल सामग्री अशी तयारी होती.

याप्रमाणें दोघांत बलाबलाचें प्रमाण अगदीं विषम असून कमी पक्षानें आपला बचाव करून शत्रूवर जय मिळवावयाचें सामान्य कृत्य नसून मोठ्या संकटाचें, जोखमीचें, जबाबदारीचें व विचाराचें होतें.

असें असतां रामचंद्रपंतानें आपल्या अलौकिक बुद्धिसामर्थ्यानें, पूर्ण मुत्सद्दीपणानें, युद्धकलानैपुण्याच्या योजनेनें व सावधगिरीनें, फार श्रम व साहस करून या लढाईचें काम शेवटास नेलें; आणि तेणें करून त्यास मिळालेले " हुकुमतपन्हा " व " कुलकुल्ला " या पदांचें सार्थक्य करून दाखविलें.

रामचंद्रपंतानें कोणत्याही अडचणीस न जुमानितां शत्रूपराभवाची तयारी केली. त्यानें चोहोंकडून फौज जमविली. संताजी घोरपडे, धनाजी जाधव व इतर सरदार यांस शत्रूच्या तोंडावर पाठविलें. परशुराम त्रिंबक समशेरजंग बहादूर व शंकराजी नारायण सचीव या उभयतांबरोबर २५ पंचवीस हजार फौज देऊन पुण्यास पाठविलें. आपणाबरोबर दहा हजार फौज घेऊन सिंहगडचे माचीचे मैदानांत राहिला.

सेनापतीनें भीमानदीचे पलीकडे जाऊन शाहिस्तेखानाशीं लढाई दिली. अति तुंबळ संग्राम झाला. महाराज असतां ज्या लढाया झाल्या, त्यापेक्षां ही लढाई फार भयंकर झाली. यांत मराठे मोठ्या निकरानें व त्वेषानें लढले. यामुळें खानाच्या फौजेचा अति नाश होऊन त्याचा पूर्ण पराभव झाला; आणि खान तेथून पळून औरंगाबादेस बादशहाकडे गेला. बादशहा हें पराभवाचें वर्तमान ऐकून, धनी नसतांही मराठ्यांच्या व त्यांच्या सरदारांच्या शूरत्वाविषयीं, एकमताविषयीं व त्यांनीं लढायासारखीं कामें चालविल्याविषयीं आश्चर्यचकित झाला; आणि आपण योजिलेल्या कार्याविषयीं साशंक झाला.

याप्रमाणें खानाचा पराभव करून सेनापति लष्करसह पुण्यास आले आणि तेथील सरदार व लष्कर यांस बरोबर घेऊन सिंहगडास आले. रामचंद्रपंत कोसभर सामोरा जाऊन सर्वांस मोठ्या समारंभानें घेऊन आला. नंतर रामचंद्रपंतानें दरबार भरवून वस्त्रेंभूषणें देऊन सर्वांचा गौरव केला. चांगली शिपाईगिरी करणाराची स्तुति करून त्यांस बक्षिसें दिलीं आणि सांगितलें कीं, लहान राजपुत्र शिवाजी व संभाजी तुह्मांजवळ आहेत. थोरल्या महाराजांनीं राज्य मिळविलें तें सर्व तुह्मां हिंदूंचें आहे. त्याचें रक्षण करणें हें तुमचें कर्तव्य आहे. धनी हातास येतील असें करावें. इत्यादि राजा व राज्य यांविषयीं अभिमान व उत्साहजनक भाषण झाल्यावर सर्वांनीं उत्तरें दिलीं कीं, महाराज होते तेव्हांपेक्षांही जीवाची आशा न धरितां चाकरी करूं. आपण आमचे महाराजच आहां, असें मानितों. यावर रामचंद्रपंत बोलला कीं, ही सर्व लज्जा तुमची आहे. हिचें संरक्षण करा. इत्यादि प्रकारचीं मोठ्या कळवळ्याचीं भाषणें होऊन दरबार बरखास्त झालें.

रामचंद्रपंतानें या दरबारास हजर नसणारे परसोजी भोंसले सेनासाहेब सुभा, खंडेराव दाभाडे सेनाधुरंधर, सिदोजीराव निंबाळकर सरलष्कर, आटोळे, पांढरे इत्यादि सर्व लहान मोठ्या सरदारांस झालेलें वर्तमान कळवून राज्य—रक्षणाविषयीं लिहिलें. सर्वांकडून त्याचीं उत्तरें आलीं कीं, "आपण महाराजांचे ठिकाणीं आहां. खासास्वारी असतां कामकाज उदईक करूं ह्मणत होतों, सांप्रत उद्याचें काम आज करून आपणास विनंति लिहित जाऊं. आपल्या हुकुमाबरोबर प्राण तृणवत् मानून उडी घेऊं. आपण कांहीं काळजी करूं नये". अशीं सर्वांचीं उत्तरें पाहून रामचंद्रपंत ह्मणाला कीं, शिवाजीचें दैव थोर उदित आहे.

रामचंद्रपंतानें ह्याप्रमाणें सर्वांचीं अंतःकरणें मराठी राज्याकडे लाविलीं. किल्ले, कोट व प्रांत यांचे अधिकाऱ्यांस बंदोबस्त व सावधगिरी राखण्याविषयीं लिहिलें. जरूर जेथें मदत पाठविली.

शाहूनें ( शिवाजीनें ) भक्ताजी हुजरे व बंकी गाईकवाड यांजबरोबर रामचंद्रपंतास सांगून पाठविलें कीं, " उभयतां आईसाहेबांचे पायांवर डोकें ठेविलें आहे. उभयतां बंधूंस आशीर्वाद सांगावा. तुह्मीं ( रामचंद्रपंत ) काकासाहेबांचे ठिकाणीं आहां. लहान मोठीं सर्व कार्यें कर्ते तुह्मीं काकासाहेबच आहां. काकासाहेबांचे मागें आपण लढाई दिली, हें ऐकून आनंद झाला. थोरले महाराज व काकासाहेब यांचे पुण्यानें यश आलें. आह्मांस नेण्याचा यत्न करीत आहांच. श्रीकृपेनें घडेल तो सुदीन. काकासाहेबांनीं राज्य रक्षिलें तें आपण रक्षण करावें. श्रीकृपेनें चांगले दिवस प्राप्त होतील ". याप्रकारचा निरोप पोहोंचतांच रामचंद्रपंताचें अंतःकरण सद्गदीत होऊन त्याचे नेत्रांतून अश्रू वाहूं लागले. त्यानें ऋणानुबंध असेल तसा योग येईल, असें ह्मणून सर्व मंडळीसमक्ष " शिवाजी फार योग्य राजपुत्र आहेत " अशी त्याची स्तुति केली.

यानंतर रामचंद्रपंतानें सेनापति आदिकरून सरदारास मोंगलांचे मुलुखांत उपद्रव देण्यास पाठविलें. कारभाराची व्यवस्था लावण्यांत कांहीं दिवस घालविले. सिंहगडाचे आश्रयानें ४५ हजार फौज ठेविली; आणि आपण पन्हाळ्यास जाण्याकरितां निघाला. प्रतापगडास येऊन श्रीचें दर्शन घेतलें. तेथून सातान्यास येऊन परळीस गेला. तेथें स्वामींच्या समाधीचें दर्शन घेतलें. पुढें वसंतगडास येऊन तेथील किल्ल्याची व्यवस्था पाहिली. याप्रमाणें वाटेवरील व आजूबाजूचे किल्ले व ठिकाणें यांचा बंदोबस्त पहात व मुक्काम करीत पन्हाळ्यास आला. तेथें ताराबाई व राजसबाई यांस भेटून महाराजांकरितां फार श्रमी झाला. नंतर स्वतःचें दुःख आंवरून उभयतां बाईसाहेबांस पुष्कळ प्रकारच्या समाधानाच्या गोष्टी सांगून त्यांचा दुःखभार हलका केला.

याप्रमाणें रामचंद्रपंत राज्याची व्यवस्था पहात असतां एके दिवशीं ताराबाईनें रामचंद्रपंत, शंकराजीपंत व परशुरामपंत यांस बोलावून नेऊन सांगितलें कीं, आपला पुत्र शिवाजी याची मुंज करून त्यास राज्याभिषेक करा. तेव्हां रामचंद्रपंतानें ताराबाईस सांगितलें कीं, इतक्यांत मुंजीची घाई कशाला पाहिजे. थोरले शिवाजी लष्करांत आहेत त्यांचें वय सोळा वर्षांचें झालें. अद्याप मुंज झाली नाहीं. ते लवकरच येतील असें बाळजोशीराव संगमेश्वरकर यांच्या सांगण्यांत आहे. त्यांचाही ( शिवाजी ऊर्फ शाहू ) निरोप भक्ताजीबरोबर आपल्यास आलाच आहे. याकरितां ते आल्यानंतर त्यांची व यांची मुंज एकदांच समारंभानें करूं. ते तक्तारूढ होतील हे उभयतां ( शिवाजी व संभाजी ) युवराज होतील. हें रामचंद्रपंताचें भाषण ऐकून ताराबाई अत्यंत रागावली; आणि ह्मणाली कीं, ते धनी आणि हे चोर असा अर्थ नाहीं. याची मुंज आणि राज्याभिषेक अवश्य कर्तव्य आहे. हें आग्रहाचें व अन्यायाचें बोलणें ऐकून रामचंद्रपंतास फार वाईट वाटलें. आणि तो ह्मणाला कीं, माझ्या बोलण्याचा अर्थ असा नव्हता. राजाराम महाराजांनीं वास्तविक तक्ताचे अधिकारी ते ( शिवाजी ऊर्फ शाहू ) असें लक्षांत आणून व वागवून आपण स्वतः राज्याभिषेक करून घेतला नाहीं. ते मंचकारूढ मात्र झाले. त्यांचेवर ( शाहूवर ) अंतःकरणपूर्वक लक्षच तसें होतें. मरणसमयीं देखील जें सांगितलें तें सर्वांस माहीत आहे. आपल्या मनांत द्वैत उत्पन्न होऊन असें करावयाचें असल्यास अवश्य करावें. असें बोलून उठून घरीं जाऊं लागला. तेव्हां शंकराजीपंत व परशुरामपंत यांनीं हात जोडून त्यास विनंति केली कीं, आपण या गोष्टीविषयीं आग्रह न धरितां धन्याच्या मर्जीस रुकार द्यावा. त्यावर रामचंद्रपंत बोलला कीं, धनी ह्मणतील तसा रुकार देणारा मनुष्य मी नव्हे. तुमच्या सर्वांच्या विचारास आल्यास करावें, याप्रमाणें बोलून तो आपल्या घरीं निघून गेला.

यानंतर ताराबाईनें शंकराजीपंत व परशुरामपंत यास रामचंद्रपंताचा राग शांत करून या गोष्टीस त्याचा रुकार घेऊन येण्यास पाठविलें. त्याप्रमाणें ते उभयतां रामचंद्रपंताकडे आले, आणि मर्जी पाहून बोलले कीं, आपण बरायखुद्द जातीनें धनीपणा करीत आलां. त्याप्रमाणें महाराज चालवीत आले. परंतु आईसाहेबांची मर्जी एकप्रकारची (तऱ्हेची) पडली. त्यास आपण रुकार द्यावा. यावर शेवटीं रामचंद्रपंतानें सांगितलें कीं, कल्याणप्रद असेल तें करा. हा मजकूर उभयतांनीं आईसाहेबांस कळविला. ताराबाईनें आपला हेतु सिद्धीस नेण्याचाच निश्चय केला. तेव्हां बेत ठरून शके १६२३ त पन्हाळा येथें मुंज व राज्याभिषेक हे समारंभ मोठ्या थाटानें झाले. याप्रमाणें राज्याभिषेक करून ताराबाईनें हें कलहाचें बीज हट्टानें पेरून ठेविलें. यावेळीं शिवाजीचें वय १० वर्षांचें व संभाजीचें ३ वर्षांचें होतें.

रामचंद्रपंत अमात्य कुलकुला (सर्वांपेक्षां मोठा) हा सर्व राज्यकारभार चालवीत होता. ताराबाईचे द्वैतबुध्यात्मक स्त्रीस्वभावजन्य अदूर–दृष्टीचे आग्रही स्वभावानें त्यास राज्यकारभारांत पुष्कळ अडचणी येत. या कारणानें तो पूर्वीप्रमाणें संतोषानें कारभाराचें काम करीत नसे. तथापि याजवर सर्व राज्यभार होता म्हणून या स्वराज्यनिष्ठास निरुपायानें कां होईना पण राज्याचा बंदोबस्त व व्यवस्था राखण्याकरितां निरंतर काळजी वहावी लागे.

औरंगजेबास मराठ्याकडील विलक्षण बुद्धिमान् व दक्ष असा राज्यसूत्रचालक रामचंद्रपंत हा मुख्य प्रतिस्पर्धि असून तो त्यास फार जाचक झाला होता. त्याजपुढें बादशहाच्या मसलती फिक्या पडत. यामुळें त्यावरील मराठ्यांचा विश्वास उडावा व मराठ्यांमध्यें फाटाफूट व्हावी या हेतूनें बादशहानें रामचंद्रपंतास "तो आपल्याकडे फितूर आहे अशा अर्थाचीं पत्रें लिहून तीं परशुरामपंताचे हातीं जातील अशी

योजना केली. परशुरामपंतानें तीं पत्रें ताराबाईकडे दिलीं. यावरून कांहीं दिवस ताराबाईचा रामचंद्रपंतावरील विश्वास उडाला होता; आणि परशुरामपंत मर्जींत आले होते. कोणीं ह्मणतात कीं, यामुळें परशुरामपंतास ताराबाईनें प्रतिनिधिपद दिलें.

औरंगजेबानें सुमारें इ० स० १६९९ पासून आपल्या सैन्याचे मुख्य दोन भाग केले. एका भागावर झुलफिकारखानास मुख्य नेमून त्यास मराठ्यांचे फिरत्या फौजेवर पाठविलें होतें. त्याजकडे मराठ्यांच्या फिरत्या टोळ्यांचा नाश करणें, त्यांच्या सेनापतीच्या फौजेवर नजर ठेवणें, आपल्या प्रांताचा बचाव करणें आणि साधल्यास मराठ्यांचा नाश करणें, बादशहाचे लष्करास त्यांजपासून उपद्रव न होईल अशी तजवीज करणें अशा प्रकारच्या कामाची योजना सांगितली होती; आणि आपण स्वतः दुसरा भाग घेऊन मराठ्यांचे किल्ले व प्रांत घेण्याचें काम चालविलें होतें.

मराठे सरदार व सेनापति यांनीं व त्यांच्या टोळ्यांनीं खानाचे लष्करास व त्याचे विभागास कधीं चुकवाचुकवी करावी; केव्हां त्याशीं लढाई करावी, कधीं त्यास पाठीवर घेऊन फिरावें, केव्हां त्यापासून पळून जावें, कधीं त्यावर छापे घालावे, केव्हां त्याचे मुलखांत लूट करीत फिरावें. जाधव, घोरपडे वगैरे मोठमोठ्या सेनापतींनीं खानाच्या व बादशहाच्या सैन्यावर चांगली नजर राखून आपल्या व इतर सरदारांच्या लहान लहान टोळ्यांकडून मोंगलांचे मुलखास सारखा उपद्रव मांडिला होता. अशा निरनिराळ्या प्रसंगीं व जागीं त्यांशीं वागून खानास व त्याचे लष्करास अत्यंत जेरीस आणिलें. त्याचें मराठ्यांपुढें कांहीं चालेनासें झालें. मराठे दिवसेंदिवस लढाईंत जास्त जास्त वाकब व धीट होत चालले होते. असा हा क्रम ६।७ वर्षें सारखा चालू

होता. शेवटीं शेवटीं मराठ्यांचा जमाव फार वाढत चालला. तो असा कीं, वाटेल त्या शूर मराठ्यानें एक चपल घोडा, बंदूक, तलवार व भाला मिळवावा व शिपाई बनावें. असे कांहीं लोक एकत्र झाले कीं त्यांची टोळी बने, आणि कोणा तरी मराठे सरदाराच्या निशाणाखालीं राहून ती मोंगलांचे मुलुखांत शिरे. यांस वेतनाची काळजी बेताचीच असे. हे बहुधा लुटीवर आपला खर्च चालवीत. हे दसऱ्यास स्वारीला बाहेर पडत, ते मृगास मुक्कामाची जागा पहात. तोंपर्यंत कोठेंही स्थिर रहात नसत. अशा टोळ्यांनीं बहुतेक महाराष्ट्र व्यापिला होता.

बादशहा मराठ्यांचे डोंगरी किल्ले व प्रांत घेत घेत दक्षिणेकडे चालला होता. त्यांत प्रत्येक किल्ला घेत असतां त्याचा पुष्कळ नाश होत होता, आणि त्याच्या अवाढव्य फौजेस दरएक ठिकाणीं फार वेळ मोडावा लागत होता. त्यानें सातारच्या किल्ल्यास वेढा घातला. किल्ला घेण्याकरितां त्यावर पुष्कळ हल्ले केले, सुरुंग लाविले; परंतु प्रत्येक वेळीं त्याच्या शूर शिपायांचा नाश होऊन त्यास मागें परतावें लागलें. यावेळीं या किल्ल्यावर प्रयागजी परभू या नांवाचा किल्लेदार होता. त्याचे शूरपणानें तो किल्ला पुष्कळ दिवस लढत होता. शेवटीं किल्लेदार पडला व त्यावरील सामग्री संपली तेव्हां तो बादशहाचे हातीं आला. याप्रमाणेंच इ० स० १७०१ त बादशहानें आपला पुष्कळ नाश करून पन्हाळा घेतला. या लढाईंत रामचंद्रपंतास आश्रयस्थानाची बळकटी जास्त उपयोगी पडली. मराठ्यांचें राज्यचालकत्व व राज्याचें उगमस्थान सह्याद्री पर्वतांत असून, त्या स्थानास, त्यांतील पहाडी किल्ले, त्या भोंवतालची झाडी, त्यापासून सर्व बाजूस दूरवर पसरलेलीं जंगलें, त्यांतील चढउताराचे पायरस्ते, विरल व दरिद्री लोकवस्ति, त्यांतील घांट, पांजा इत्यादि अत्यंत उभ्या चढणीचे

व उताराचे मार्ग, सर्वत्र झाडीमय प्रदेश या सर्वांच्या योगानें या स्थानास दुर्गमता व बळकटी अथवा जवळ जवळ अभेद्यत्व आलें होतें. यांतील किल्ल्यांच्या रांगा दाक्षिणोत्तर फार दूरवर पसरलेल्या असून, या किल्ल्यांतील थोडे किल्ले मिळाल्यानें शत्रूची पूर्तता होणारी नव्हती.

रामचंद्रपंतानें दरएक किल्ल्यास वेढा पडण्यापूर्वी लोक, दारूगोळा, धान्य व इतर सामग्री यांची बेगमी करून किल्ला फार दिवस लढेल अशी तजवीज राखिली होती. किल्ला लढत असतां सवड मिळेल तेथें तो त्यास मदत पोंचवीत असे, आणि वेढा घालणाऱ्या फौजेस बाहेरून उपद्रव पोंचेल अशी तजवीज राखीत असे. मोंगलांच्या फौजेचे हालचालीवर नेहमीं नजर राखी. त्यानें आपली हालचाल गुप्त राहणेची तजवीज ठेविली होती. राजकुटुंबाच्या राहण्याच्या ठिकाणाची बातमी शत्रूस समजूं नये ह्मणून तो त्यांचें स्थान वारंवार बदलीत होता.

यानें कोंकण व मावळ यांतून आपल्या सैन्याची भरती करण्याचें काम अव्याहत चालूं ठेविलें होतें. आपल्या लोकांच्या निरनिराळ्या टोळ्या शत्रूचे प्रदेश लुटण्याकरितां पाठवून द्रव्याची मदत मिळवीत होता; व बंदरचे व्यापाऱ्यांकडून युद्धोपयोगी साहित्य व क्वचित् प्रसंगीं द्रव्यसहाय्यही मिळवीत होता.

या वेळेच्या सुमारास बंदरच्या व्यापाऱ्यांचा गलबतांवरून परदेशाशीं मोठा व्यापार चालत असून त्यांस गलबतांच्या संरक्षणासाठीं हत्यारें, दारूगोळा वगैरे बाळगावीं लागत. ते हीं साधनें परदेशांतून मिळवीत. असे व्यापारी लहानसहान संस्थानिकांप्रमाणें असत.

रामचंद्रपंताच्या अशा दक्षतेच्या वागण्यानें बादशहाच्या अवाढव्य फौजेस सह्याद्रीवरील किल्ले घेण्यास ५।६ वर्षें गुंतून पडावें लागलें.

त्यास किल्ले घेण्यास जसजसा अधिक वेळ मोडूं लागला, तसतशी रामचंद्रपंतास आपली शक्ति वाढविण्यास व निरनिराळ्या मसलती करण्यास जास्त जास्त सवड मिळत गेली.

बादशहा प्रत्यहीं आपली शक्ति कमी करीत व किल्ले जिंकिल्याचा आनंद मानीत दक्षिणेकडे चालला होता. तो दूर जातांच रामचंद्रपंतानें आपले गेलेले किल्ले परत घेण्याची योजना करून त्या कामावर परशुराम त्रिंबक व शंकराजी नारायण यांस नेमिलें व आपणही त्या उद्योगास लागला. परशुरामपंतानें सातारा, वसंतगड हे घेतले. शंकराजीपंतानेंही कांहीं किल्ले घेतले.

रामचंद्रपंतानें इ० स० १७०५त पन्हाळा, पावनगड हे किल्ले घेतले. नंतर त्यानें बत्तीसशिराळ्याचे ठाण्यास वेढा घातला आणि हल्ले करून तें ठाणें घेतलें. त्या ठिकाणीं मोंगलांचा फार नाश झाला.

याप्रमाणें रामचंद्रपंतानें थोड्याच दिवसांत एकामागून एक असे बहुतेक किल्ले व प्रदेश पुनः मराठ्यांच्या सत्तेंत आणिले. या त्याच्या जयानें लढाईचें पारडें फिरविलें आणि मराठ्यांचा उत्साह वाढविला. यानंतर रामचंद्रपंतानें पन्हाळा हें राजधानीचें ठिकाण केलें.

मराठ्यांनीं झुलफिकारखानास पुरे पुरे करून सोडिलें आहे हें वर्तमान बादशहास वेळोवेळीं समजत होतें. स्वतः बादशहाचे लष्कराभोंवतीं घिरट्या घालून ते त्यास सारखा उपद्रव देत होते हें तो पहात होता. दिल्लीहून येणारी मदत व खजिना सुरक्षितपणें त्यास पोंचत नव्हता हेंही त्यास माहीत होतें. असें असतां त्यास समजलें कीं, आपण ७।८ वर्षें लढाई चालवून मिळविलेला प्रदेश थोड्या अवकाशांत मराठ्यांनीं परत घेतला. तेव्हां आतां त्याचें धैर्य खचून गेलें. तो

मराठ्यांस बुडविण्याचे कामीं अगदीं निराश झाला. त्यास दिसूं लागलें कीं, आपल्या सभोंवार आपल्यास घेरून उपद्रव देत पसरलेल्या मराठ्यांच्या सैन्याचा आपल्यावर लवकरच हल्ला होऊन आपला पूर्ण नाश झाल्याशिवाय रहात नाहीं. याकरितां तो टाळण्यासाठीं त्यास एकदम लढाई सोडून देऊन परत फिरणें भाग पडलें. त्याप्रमाणें तो अहमदनगराकडे जावयास निघाला. बादशहा इतका जेरीस आला व तो इतक्यांतच परत फिरेल या गोष्टीचें अनुमान मराठ्यांस झालें नव्हतें, यामुळें बादशहास परत जातां आलें.

याप्रमाणें स्वतःच्या संरक्षणाच्या भीतीनें बादशहा अहमदनगराकडे जावयास निघाला असतां वाटेंत मराठ्यांनीं त्याजभोंवतीं जमून त्यास उपद्रव देऊन इतका घाबरवून सोडिला कीं, त्यानें आपल्या मदतीस झुलफिकारखानास बोलाविलें; आणि मोठ्या संकटानें अहमदनगरास जाऊन पोंहोंचला.

यानंतर मराठ्यांनीं आपलीं मोंगलांच्या ताब्यांत राहिलेलीं सर्व ठिकाणें परत घेतलीं, रणभूमीचें क्षेत्र शत्रूचे प्रदेशांत नेलें; आणि शत्रूच्या प्रदेशांत दूरवर शिरून त्यास सारखा उपद्रव देण्याचें काम चालू ठेविलें.

याप्रमाणें रामचंद्रपंतानें शिवाजीच्या युद्धपद्धतीचा स्वीकार करून मुत्सद्दीपणाची योजना, सावधगिरी व धिमेपणानें वागणें, यायोगानें स्वतः बादशहावर व जाधव, घोरपडे इत्यादि सेनापतींकडून झुलफिकारखानावर एकसारखी नजर राखून मराठ्यांच्या पूर्ण नाशाकरितां सुरू झालेली लढाई ७।८ वर्षें सारखी चालवून शत्रूस जेरीस आणून शेवटास नेली, आणि मराठ्यांचें राज्य व नांव राखून त्यांचा चोहोंकडे दरारा बसविला. बादशहा पूर्वीं मराठ्यांस डोंगरांतील उंदीर ह्मणत

होता आणि प्रथम वास्तविक तशी स्थिति होतीही; परंतु मराठ्यांनीं क्रमाक्रमानें आपणास ‘ सिंह ’ या पदास आणिलें.

बादशहाचा मुक्काम अहमदनगर येथें असतां तो तेथें इ० स० १७०८ त मृत्यु पावला. त्याच्या मरणानें दिल्लीचे तक्ताविषयीं त्याच्या मुलांमध्यें कलह उत्पन्न झाला. दक्षिणेंत बादशहाजवळ असलेला त्याचा मुलगा कामबक्ष हा दक्षिणेंतील सर्व सैन्य घेऊन दिल्लीकडे चालला. तो तिकडे जात असतां वाटेंत त्यास मराठ्यांनीं मोंगली मुलुखांत धुमाकूळ मांडिल्याच्या बातम्या ऐकूं येऊं लागल्या. तेव्हां त्यानें मराठ्यांत आपसांत कलह लागून किंवा शाहू हा त्यांचा राजा होऊन आपल्या प्रांताचा त्याजपासूनचा उपद्रव चुकावा, या उद्देशानें आपल्या प्रतिबंधांत असलेल्या शाहूस दक्षिणेंतील आपल्या प्रांतांतील चौथाई व सरदेशमुखीचे हक्क देण्याचें कबूल करून आणि त्याच्याकडून त्यानें मोंगलांच्या प्रदेशास उपद्रव न देतां स्वतःचें राज्य करावें, असा करार करून घेऊन प्रतिबंधांतून मुक्त केलें, आणि त्याजबरोबर कांहीं फौज देऊन त्यास दक्षिणेंत रवाना केलें.

शाहू प्रतिबंधांतून सुटून हळूहळू दक्षिणेकडे येत असतां त्यानें ताराबाई, अष्टप्रधान व सेनापति यांस आपण मुक्त होऊन स्वराज्यांत येत असल्याचीं पत्रें लिहून तीं जासुदाबरोबर रवाना केलीं.

शाहूचें पत्र ताराबाईस पोंचलें. तिनें मनांत दायादी दुर्बुद्धि आणिली. यावेळीं राज्यावर तिचा मुलगा असून त्यास राज्याभिषेक झाला होता. तो अज्ञान असून थोडा वेडसर होता. शाहू इकडे आल्यावर तो वडील वारस ह्मणून मालक होणार आणि तसें झालें असतां ताराबाई व तिचा पुत्र यांचें महत्व कमी पडणार हें आपलपोटेपणाच्या अनुदार, हट्टी व हेकेखोर स्वभावाचे ताराबाईस खपण्यासारखें

नव्हतें. यासाठीं तिनें सर्व प्रधान, सेनापति, सरदार, एकत्र मिळवून त्यांस सांगितलें कीं, हल्लीं येत आहे हा खरा शाहू नसून तोतया आहे. पूर्वीं एक तोतया आला होता, तुह्मीं त्याचा नाश केला. संभाजी राजांनीं तुह्मां सर्वांवर इतराजी करून तुह्मांस विनाकारण पीडा दिली, कितीएक चांगलीं माणसें ठार मारिलीं, कांहींस प्रतिबंधांत ठेविलें, कांहींस घरीं बसविलें, आणि राज्य गमाविलें. त्यानंतर राजाराम महाराजांनीं चंदीस जाऊन तुह्मां सर्वांस वाढविलें, श्रम करून राज्य सोडविलें. याकरितां त्यांचे पुत्र शिवाजी राजे यांस अंतर न देतां शाहू खोटा किंवा खरा कसाही असो, त्याशीं लढाई करून त्यास धरून आणा. याप्रकारचें बोलून अन्न भरलेलें ताट आणवून तें सर्वांपुढें ठेवून त्यावर हात मारून सर्वांनीं शपथ घ्यावी, असा आग्रह धरून बसली.

हें पाहून सरळ व उदार विचारांचा रामचंद्रपंतही घोटाळ्यांत पडला. या वेळीं शाहूचे सुटकेकरितां मराठ्यांकडून एकादी मसलत, खटपट किंवा मागणी झालेली नव्हती. मोंगलांनीं शाहूस सोडून द्यावें असें एखादें संकट मोंगलांवर आल्याचें दिसत नव्हतें. तेव्हां येत असलेला शाहूच आहे असें मानण्यास कारण संभवत नसतां अकस्मात् त्याच्या सुटकेची बातमी आली. याकरितां रामचंद्रपंताचें मन या गोष्टीचे खरे-खोटेपणाविषयीं बुचकळ्यांत पडून द्विधा झालें. त्यास याचा तपास करून निश्चय करण्यास फुरसत मिळण्यापूर्वीं शपथ केल्यावांचून भागत नाहीं, आपले विरुद्ध बोलण्याचा परिणाम ताराबाईवर व जमलेल्या मंडळीवर कांहीं होत नाहीं, पूर्वीं शिवाजीच्या राज्याभिषेकाच्यावेळीं जशी त्याच्या मतास माघार खावी लागली तोच प्रसंग आतां आला. सुटका होत नाहीं, असें पाहून इतरांबरोबर रामचंद्रपंतानेंही शपथ घेतली.

याचवेळीं ठरलें कीं, सेनापति व प्रतिनिधि यांनीं फौज घेऊन शाहूबरोबर लढाईस पुढें जावें. रामचंद्रपंतानें ताराबाईजवळ राहून त्यांस मागाहून कुमक पाठवावी. त्याप्रमाणें सेनापति व प्रतिनिधि निघून गेले. रामचंद्रपंतानें पेशवे, सचिव, यांस आपापल्या फौजेसह त्यांच्या मदतीस पाठविलें. इतर राहिलेल्या लोकांस आपापलीं स्थलें संरक्षण करून असावें अशीं आज्ञापत्रें पाठविलीं.

हें वर्तमान ऐकून शाहूनें पुढें येण्याचें बंद करून गंगातीरींच मुक्काम केला. अशासाठीं कीं, आपण कोणी तोतया नसून खरा शाहू आहों हें सर्व मराठ्यांस समजून त्यांची अनुकूलता आपल्यास प्राप्त व्हावी आणि लढाईची तयारी करितां यावी. पुढें लोकांत जसजशी शाहू खरा असल्याची खात्री व प्रसिद्धि होत चालली तसतसे लहान मोठे मराठे सैनिक त्यास येऊन मिळूं लागले, आणि त्यांचा जमाव वाढूं लागला. बरीच फौज जमतांच तो पुन्हा दक्षिणेकडे चालूं लागला. दरएक मुक्कामास त्याचा जमाव वाढत होता.

शाहू गंगातीरीं असतां रामचंद्रपंतानें आपला विश्वासू मनुष्य त्याच्या खरेखोटेपणाच्या तपासास पाठविला. त्यानें तपास करून कळविलें कीं, शाहू खरा असून त्याजबरोबर केसरकर वगैरे माहितीची मंडळीही आहे.

ही खरी बातमी रामचंद्रपंतास समजतांच त्याचे मनांत मोठा घोंटाळा उडाला. ताराबाईचा पक्ष धरून राहिल्यास पदरीं हरामखोरी येते. शाहूचा पक्ष स्वीकारल्यास शपथेस बाध येतो. दोहोंपैकीं कोणताही पक्ष अंगिकारिला तरी दोष येण्याचें चुकत नाहीं. ताराबाईचे विषम (द्वैत) बुद्धीपासून आपणावर व राज्यावर संकट आलें आहे. आतां होईल तसें होवो, अन्नावर हात ठेवून केलेली शपथ

पाळणें योग्य झालें आहे. आपसांत उत्पन्न झालेल्या कलहाचा परिणाम चांगला व्हावयाचा नाहीं, हें त्यास पक्कें कळून चुकलें होतें. आपणास राज्याच्या खऱ्या वारसाविरुद्ध निरुपायानें वागावें लागत आहे. त्यांतूनही ज्याला सोडवून आणण्याविषयीं आपण कांहीं कालापूर्वीं खटपट करीत होतों, त्याचेविरुद्ध होतांना त्यास अत्यंत वाईट वाटलें.

शाहूबरोबर लढाई करण्याकरितां गेलेले सेनापति व प्रतिनिधि यांची व शाहूची गांठ पुण्याच्या उत्तरेस पडली. शाहूनें सेनापतीकडे मनुष्य पाठवून त्याचें मन आपल्या पक्षाकडे वळवून घेतलें. बाह्यात्कारी सेनापतींनीं थोडीशी लढाई करावी आणि शाहूस जाऊन मिळावें, असें ठरलें. लढाई सुरू झाली. सेनापति थोडा वेळ लढल्यासारखें करून शाहूस जाऊन मिळाले. सगळ्या लढाईचा भर एकट्या प्रतिनिधीवर पडला. ते मनापासून लढले; परंतु सेनापति फितूर झाल्यामुळें त्यांत त्यांचा पराभव झाला. सर्व मराठे सरदार शाहूस मिळाले. प्रतिनिधि परत साताऱ्यास आले. लागलींच पाठोपाठ शाहू सेनापतीसह साताऱ्यास आला. पुनः तेथें त्याची व प्रतिनिधीची लढाई झाली. त्यांत प्रतिनिधीचा पराभव होऊन ते शाहूचे हातीं लागले. शाहूनें त्यास कैदेंत ठेविलें. पुढें कांहीं दिवस शाहू सातारा येथेंच राहून त्यानें ताराबाईच्या पक्षाकडील लोकांत सर्वत्र फितुरी चालू ठेविली, आणि त्यानें आपला गादीवरील हक्क सांगून, पूर्वींचीं कामें ज्यांचीं त्यांजकडे देऊन, देणगीनें, बक्षिसानें किंवा अशा निरनिराळ्या उपायांनीं पुष्कळ लोक आपल्या पक्षाकडे करून घेतले. त्यानें प्रथमपासून फितवा सुरू केला होता. आतां त्याच्या पक्षास जास्त यश येऊं लागलें.

शाहूनें सातारा येथें आपणास राज्याभिषेक करून घेतला. त्या वेळीं त्यानें अष्टप्रधानांची योजना केली. त्यांत त्याच्या पक्षास मिळा-

लेल्या जुन्या प्रधानांचे जागीं त्यांचीच योजना केली; व इतरांचे जागीं नवे प्रधान नेमिले. त्यांत अमात्यांचे जागीं दुसऱ्याची नेमणूक झाली.

शंकराजी पंत सचीव यानें ताराबाईजवळ इतर प्रधानांप्रमाणें अन्नावर हात ठेवून शपथ घेतली होती; परंतु पुढें त्यास शपथेमुळें शाहूस मिळतां येईना व ताराबाईकरितां शाहूशीं स्वतः लढाई सुरू करवेना. या अडचणीमुळें त्यानें जलसमाधी घेऊन आत्महत्या केली. हें वर्तमान शाहूस समजतांच, त्यानें त्याचे अज्ञान मुलास सचिवीचा हुद्दा देऊन आपले पक्षाचा केला.

या वेळीं रामचंद्रपंत ताराबाईसह पन्हाळा येथें असून, त्यास शाहूकडील बातमी समजत होती. त्यानें मोंगलास लिहिलें कीं, मराठ्यांचा राजा शाहू नसून शिवाजी आहे. यासाठीं चौथाईच्या सनदा देणें त्या शिवाजीच्या नांवें द्याव्या. त्यावरून शाहूस त्या मिळेनात. त्या त्याच्या नांवें तयार मात्र झाल्या होत्या.

रामचंद्रपंत गिरजोजी यादवासह फिरत असतां, त्यास वाडीचे खेम सावंत माणगांव येथें भेटले. त्यानें त्याजकडून ताराबाईच्या पक्षास राहण्याची शपथ घेवविली. आपल्या पक्षाकडील लोक शाहूस मिळूं नयेत अशी रामचंद्रपंताची खटपट होती.

याप्रमाणें उभयपक्ष आपापल्या बाजूची बळकटी वाढवीत असतां, मोंगल शाहूस मराठ्यांचा राजा असा मान्य करून चौथाईच्या सनदा देईनात. तेव्हां शाहूस ताराबाईशीं युद्ध करून आपली राज्यांवरची मालकी ठरवून घेणें भाग झालें.

शाहू मोठ्या तयारीनें ताराबाईच्या पारिपत्याकरितां पन्हाळ्याकडे यावयास निघाला. त्यानें चंदन वंदन हे किल्ले घेतले. रामचंद्रपंतास

हें वर्तमान समजतांच, तो पन्हाळ्याहून ताराबाईसह राजकुटुंबास घेऊन रांगण्यास गेला. शाहू पन्हाळा, विशाळगड वगैरे किल्ले घेऊन पुढें येऊं लागला. हें पाहून रामचंद्रपंत ताराबाईसह मालवणास गेला, आणि तेथें राजकुटुंब ठेवून आपण रांगण्यास आला. शाहूनें रांगण्यास वेढा दिला, तेव्हां रामचंद्रपंत, गिरजोजी यादव, हिंदुराव घोरपडे यांनीं त्यांशीं लढून किल्ल्याचा बचाव केला.

रामचंद्रपंताचीं शाहूच्या विरुद्ध कारस्थानें चालू होतीं. त्यांत त्यानें असा एक घाट घातला होता कीं, शाहू रांगणा येथें लढाईंत गुंतला असतां सातारा ताराबाईच्या ताब्यांत यावा. सचीव, रायाजी मल्हार, सुभानजी (अचेले = अटोळे) इत्यादि बरेच लोक शाहूचे लष्करांतून फोडून ताराबाईच्या पक्षाचे होतील अशी तजवीज चालविली होती. ताराबाईचें रामचंद्रपंतास रांगणा येथें आलेलें पत्र असें:—

" श्रीरमाकांत.

राजेश्री रामचंद्र पंडीत अमात्य यास.

प्रती श्रीमत् मातुश्री ताराबाई उपरी. तुह्मीं पत्रें पुरवणीया ३ पाठविल्या त्या प्रविष्ट झाल्या. त्यामध्यें लिहिलें कीं, सातारीयास राजेश्री केसो त्रिमल आहेत त्याकडे राजकारण करून खेळ करून पहावा. याकरितां राजेश्री हिंदुराव व राजेश्री गिरजोजी यादव यांचे विद्यमानें पत्र पाठविलें आहे कीं, तुह्मीं मातोश्री साहेबांचे पायांस निष्ठा धरून ज्या स्थळीं आहां तें स्थळ हस्तवस्य करून देणें आणि आपला मजुरा करून घेणें. एवढें कार्य संपादिलीयावर तुमचे नातू निळोपंताचे स्त्रीचे पदरीं घातले आहेत त्यास पेशवाई द्यावी. तुह्मीं सर्वस्वे कारभार करावा. एविषयीं आह्मीं धण्याजवळी विनंती करून अभिष्ट सिद्धिस पाववितो ह्मणून विशदर्थे पत्र पाठविलें आहे. त्याचे पुत्र राजेश्री बाबू-

राव केशव याकरवीं लेहविलें आहे. जरी साहेबाचे पुण्येंकरून तिहीं हात दिला तरी मातवर स्थळ हस्तगत होतें. फिरोन मनसबा उभा राहातो. याकरितां पत्रें पाठविलीं आहेत ह्मणून लिहिलें तें अक्षरशा विदित जालें. तुह्मीं जो खल अगर श्रम कराल तो आमच्या हिताचाच कराल एतदर्थी सर्वाविषयीं भरोसा तुमचा मानिला आहे. याकरितां तुह्मीं जीं पत्रें पाठविलीं तीं उत्तम पाठविलीं. त्यांणीं निष्ठा धरून कार्यसिद्ध केलीयावरी त्याचें अभिष्ट तुमचे वचनाप्रमाणें सिद्धिस पावलें जाईल. राजेश्री त्रिंबक शिवदेव मुतालीक दिमत सचीव याचे अनुसंधान राजेश्री केसो महादेव व रामचंद्र महादेव यांणीं सांगोन पाठविलें कीं, त्र्यंबकपंतीं स्वामीच्या पायास निष्ठा धरिली आहे कीं सांप्रत सैन्यांत आहेत तेथून आपल्या जिल्हेस जावे आणि स्वामींचे पदरीं पडावें. गडकिल्ले आदिकरून हस्तवस्य करून द्यावे. येगोष्टीस तूर्त गड किल्ले नातवान पडिले आहेत. त्याचे बेगमीस दहा हजार रुपये द्यावे आणि आपणास सरकारकुनीचा हुद्दा पदरीं अगर वाकनिसी द्यावी ह्मणून व येविषयीं खासा त्यांचे पदरीं पत्र सकळितार्थी आलें. त्यावरून राजेश्री हिंदुराव व राजेश्री गिरजोजी यादव ऐसे बसोन या गोष्टीचा विचार करून त्र्यंबक सिवदेव यास समाधानाचें पत्र पाठविलें. द्रव्य द्यावें त्यास चार सहस्र रुपयांची हुंडी बाबाजी कृष्ण याकडे करून पाठविली. राहिलें द्रव्य कार्यसिद्ध होताच. ऐसा निर्वाह शपथपूर्वक करून दिला. सरकारकुनीचा हुद्दा साहेबाचे आज्ञेवेगळा मात्र करितां नये. याकरितां उभयतांनीं आग्रह केला कीं हातीचें राजकारण जाऊ देऊ नये याकरितां तुह्मीं वाकनिसी देतो ऐसें पत्र शपथपूर्वक व तुळसी ऐसे पाठविणें. तुह्माविषयीं मातुश्री साहेबास आह्मीं उभयतां अर्ज करवून देऊं. ह्मणून त्यावरून याप्रमाणें पत्रें पाठविलीं. जरी साहेबाचे पुण्येंकरून हे गोष्टी संपादिली ह्मणजे थोर कार्य जालें. शाहू राजे याची कमरच मोडोन हतप्रभ होऊन जातातीं. ह्मणून विशदार्थे

लिहिले कीं हुद्याविषयीं द्रव्याविषयीं वचन गुंतले आहे खरें करावें लागेल. ह्मणून तरी जी गोष्टी तुह्मी योजिली तें उत्तम आहे. आमचें राज्य सुरक्षित जाले. ज्याणी या समयांत सेवा केली त्याचे गोमटे न करावे तरी कोणाचे करावे. त्यामध्यें तुह्मासारिखे लोक मध्यस्त असतां तुमचे वचन गुंतले तेंच आमचें वचन. येगोष्टीस अन्यथा होते ऐसे नाहीं. त्र्यंबक सिवदेव याणें लिहिल्याप्रमाणें कार्यसिद्धि अविलंबें केली. गड किल्ले हस्तवस्य जाले ह्मणजे तुमच्या वचनाप्रमाणें वाकनिसीचा हुद्दा सांगितला जाईल व द्रव्याची अनुकूलता केली जाईल. करितां कार्य त्वरेनें करावें. जों लष्कर प्रसिद्ध गडाखाले आहे तों कार्य झाल्यानें पायबंद बसोन बाजू सावरते. या कारणानें त्वरा होय ऐसी गोष्ट करणें. रायाजी मल्हार याचे मनांत पश्चात्ताप येऊन त्याचे अनुसंधान आले कीं, आपणावरी मातोश्री साहेब दया करतील. पूर्ववत आपल्या हाते सेवा घेतील. तरी आपण सुभानजी (अचेलो = आटोळो असें होईल.) यासहवर्तमान निघोन त्या प्रांते जातों. आपल्याकडे दिवाणची बाकी आहे ते माफ करावी व वरातदाराचे गैरादे आहेत त्याचे त्वष्ट न लावावे. पुढें मन:पूर्वक दया करून सेवा घ्यावी येगोष्टीचा निर्वाह जालीया लिहिलेप्रमाणें कार्य करितों ह्मणून त्यावरून त्याच्या मुद्देपणाप्रमाणें मात्र करून समाधानपत्रें त्याकडे पाठविलीं आहेत; परंतु जाले वर्तमान साहेबास विदित व्हावें ह्मणून लिहिले ते विदित जाले. राजेश्री रायाजी मल्हार यास समाधानपत्रें पाठविलीं. उत्तम केलें. आटोळे देखील निघोन जाऊन निष्ठेनें सेवा करूं लागले. तरी सर्व प्रकारे त्याचे चालविले जाईल. परंतु आतां येवढ्या आठा चौ दिवसांत गेल्यानें कार्याचे पुढे छावणीस लष्कर जाईल. ते समयीं जातो ऐसे ह्मटलीयानें लटिके अनुसंधान ऐसे दिसोन येते. याकरितां ज्यांणीं राजकारणें लाविलीं आहेत त्यांणीं जोंवरी तुह्मीं शाहू राजा रांगणें याखाले गोवून पाडिला आहे या संधी-

मध्यें ज्यांणीं निष्ठा धरिली आहे त्यांणीं कार्ये करून द्यावीं ह्मणजे तुमच्या प्रयोजनाचीं आहेत. पुढें तुह्मीं शाहूस पराभवाते पावलियावरी कोणएक शरण येईना. याकरितां तुह्मीं येगोष्टीची चौकशी करून ज्यास जे सांगोन पाठविणें तें पाठवून त्वरा होय तें करणें. परकी माणूस राजकारणास येईल तें गडावरी घेत नव जाणें. कोणाचे हुजूर कैसे असतात हें कळत नाहीं याकरितां वरचेवरी गडाखालेच जाबसाल देऊन रवाना करीत जाणें. वरकड तुह्मीं आपल्याविषयींचा अर्थ कितेक राजेश्री बाळाजी महादेव यास लिहिला तो सविस्तर विदित जाला. घोड्याकरितां मातुश्रीची दया निदर्शनास आली ह्मणून लिहिलें तरी आमची दया अगर लोभ तुह्मांठायीं आहे तो घोड्यावरून अगर वस्त्रापात्रावरून तुमचे निदर्शनास यावा ऐसी गोष्टी नाहीं. तुह्मापेक्षां घोडी अगर आणखी प्रसंग विशेष आहे ऐसे नाहीं. ऐसे असतां तुह्मीं घडी घडी मनांत संदेह मानावा हे गोष्टी उचीत नाहीं. येविषयीं साहेबीं उदंड सांगितलें अगर लिहिलें ते तुह्मांस प्रमाण वाटतें ऐसें नाहीं. जे गोष्टी निदर्शनास येईल ते करणें. याउपरी तरी निःसंदेह होऊन राजाभिवृद्धीस प्रवर्तले आहा त्याप्रमाणें प्रवर्तोन संतोष पावणें. आह्मांस तुह्मापेक्षां दुसरे वस्यक आहे ऐसे नाहीं. सर्व राज्यभार तुह्मावरी टाकिला आहे. श्रीदयेनें तुह्मास यश येतच आहे. जाणीजे छ० १९ मोहरम. बहुत लिहिणें तरी तुह्मी सुज्ञ असा ० लेखनशुद्ध ”

यांप्रमाणें चालविलेलें कारस्थान पूर्ण होण्यापूर्वी शाहूनें पावसाळ्याकरितां वेढा उठवून कोल्हापुरास छावणी नेली. तेथें असतां त्यास मोंगलाकडून मिळावयाच्या सनदा मिळाल्या. अर्थात् शाहू व ताराबाई यांजमधील मुख्यत्वाचा किंवा परराजांनीं राजा कबूल करण्याचा तंटा नाहींसा झाला.

ताराबाई व रामचंद्रपंत यांजमधील पत्रव्यवहारावरून दिसून येईल कीं, ताराबाईचे स्वभावापासून रामचंद्रपंतास कशी अडचण पडत असे. ही अडचण राजारामाचे मृत्युपासून त्यास बाधत होती. तथापि शाहू दक्षिणेंत येऊन जुन्या मुत्सद्यांची फाटाफूट होईपर्यंत त्यास राजकारणांत इतर मुत्सद्यांची मदत मिळत असे. ते साधारण कामांत ताराबाईच्या मताप्रमाणें वागत किंवा वागले तरी कांहीं बिघडत नसे. परंतु यावेळीं रामचंद्रपंताची स्थिति बिकट झाली होती. त्यास जुन्या वजनदार मुत्सद्यांचा आधार नव्हता किंवा धनी (ताराबाई) याजवर पूर्ण विश्वासून राहून आपल्या मताप्रमाणें राजकारण करण्याची सोयही राहिली नव्हती.

आजवर शाहूस जय मिळाले; परंतु आतां त्याजवर उलट लाट येण्याची वेळ आली होती. लोकांत प्रथम झालेल्या शाहूच्या हक्काविषयींची समजूत बदलूं लागली होती. ती अशी कीं, संभाजीनें घालविलेलें राज्य पुन्हां ताराबाईच्या नवऱ्यानें भयंकर विपत्ति सोसून व लढाया करून मिळविलें व वाढविलें, त्याच्या मुलास राज्याभिषेक झाला आहे, राज्याचे कामीं केवळ वंशपरंपरेचा संबंध कमी पाळला जातो. इत्यादि गोष्टीविषयींचे विचार लोकांचे मनांत घोळूं लागले होते.

ताराबाईचा पक्ष अद्याप बलवान होता. तिचे पक्षाचे लोकांच्या चळवळी सुरू होत्या. तिजकडे रामचंद्रपंतासारखा कसलेला मुत्सद्दी होता. यामुळें एखादी उलटापालट केव्हां घडून येईल याचा नियम नव्हता. ह्मणून शाहू आपल्या पक्षाची व जाग्याची बळकटी राखण्याकरितां व वाढविण्याकरितां लढाईचें काम बंद करून एकदम साताऱ्यास निघून गेला; आणि तेथें लोकास आपल्या पक्षास अनुकूल करून घेण्याच्या यत्नास लागला.

शाहू साताऱ्यास गेल्यानंतर ताराबाई रांगण्यास आली. पुढें थोड्याच दिवसांत रामचंद्रपंतानें पन्हाळ्याच्या किल्लेदारास वश करून घेऊन तो किल्ला घेतला, आणि तेथें राजकुटुंबाचें राहण्याचें ठिकाण केलें.

शाहू व ताराबाई यांच्या तंट्यापासून मोंगलांची इच्छा सफल झाली. मराठ्यांच्या शत्रूशीं लढाया बंद झाल्या. आपसांतील लढाया देखील जोरानें चालत नसत. शाहू व ताराबाई दोघेही मालक. ह्मणून कांहीं लोक इकडे व कांहीं लोक तिकडे असत. परंतु त्यांजमध्येंही शत्रूसारखा भाव किंवा द्वेष उत्पन्न होत नव्हता. या दोघांच्या तंट्यांत पक्षाभिमानाशिवाय अधिक कोणी पडेनासे झाले.

या प्रकारच्या स्थितीमुळें ताराबाई संपूर्ण राज्य मिळविण्याचा नाद सोडून रामचंद्रपंताचे विचारें आपले ताब्यांत असणाऱ्या प्रदेशाचें राज्य पन्हाळा येथें राहून चालवूं लागली. तेव्हांपासून पन्हाळ्याचें राज्य किंवा पुढें कोल्हापूरचें राज्य व सातारचें राज्य अशीं नांवें चालू झालीं.

इ० स० १७०९-१० यांत वाडीचे सांवतानीं कोल्हापूरच्या घांटाखालील प्रदेशास उपद्रव दिला. याकरितां रामचंद्रपंतानें सांवतावर स्वारी केली आणि त्याचा पराभव करून त्याचा प्रदेश व वाडी जिंकून घेतली. पुढें सांवताकडून छत्रपतीचे पायांशीं दुर्बुद्धि धरणार नाहीं असा करार करून घेऊन त्याचा घेतलेला मुलूख त्याचे हवालीं केला.

इ० स० १७११ त रामचंद्रपंत व हिंदुराव घोरपडे पन्हाळे प्रांतीं फिरत असतां लष्करचा मुक्काम कोगें गांवीं झाला. तेथून उभयतां नजीकचे बहिरेश्वर गांवीं गेले आणि तेथील श्रीजलशयन या देवतेचें रम्यस्थान पाहून व देवतेचें दर्शन घेऊन देवाचे पूजेउर्जेसाठीं व तेथें पुष्पवाटिका तयार करून व मठ बांधून अतीत-अभ्यागत यांची भोजनादि सोय व्हावी यासाठीं जमीन नेमून देऊन परत लष्करांत आले.

याच सालीं माघमासीं सांवत यांनीं कोल्हापूरकरांच्या कोंकणांतील मुलखास उपद्रव देऊन कामत्याचे कोटास वेढा दिला. त्याचे बंदोबस्तासाठीं चांदजीराव राणे अरुळेकर यास आज्ञापत्र गेलें कीं, "फोंडसांवत कुडाळकर याणें वालावल खारेपाटण इकडे जमाव पाठवून कित्येक लोकांचे कबिले धरून नेले. हल्लीं सांवताकडील जमाव कामत्याचे कोटास वेढा देऊन त्यानें यलगार मांडिला आहे ह्मणोन विदित झालें. अशास त्याजागीं राजेश्री तानसांवत भोसले व साद (सिद) सांवत व तुह्मीं आणि वरकड सरदार आहां. तुमची मदत करणें अगत्य आहे. यास्तव हुजूरून स्वाराचा व हशमाचा पोक्त जमाव रवाना केला आहे, सत्वर येऊन पोंचेल; आणि सांवताकडील जमावास जतीजा पावतील. कृष्णाजी भास्कर यांसही जमावानिशीं रवाना केले आहेत. राजेश्री कान्होजी आंग्रे याजकडूनही जमाव व दारूगोळी रवाना करविली आहे. तीही लवकर येऊन पोंचेल. याकरितां तुह्मीं मनांत न डगमगतां व सांवताकडील जमावाचा हिशेब न धरितां कोट शर्तीनें राखून आपल्या सेवेचा मजुरा करून घेणें. कोटमजकुरीं हुजूरून जमाव आला असें जाणून हुषार व खबरदार राहून कोट जतन करणें."

या सांवताच्या स्वारीनें गगनगड तनख्याचे पुष्कळ गांवांचा नाश झाला.

इ० स० १७१२ (इ० स० १७११ त शिवाजी वारला व इ० स० १७१२ त त्याचे गरोदर स्त्रीपासून पुत्रप्रसव झाला असें छत्रपतीच्या वंशावळबद्ध यादींत आहे) ताराबाईचा पुत्र शिवाजी मृत्यु पावला. यामुळें रामचंद्रपंतानें राजसबाईचा पुत्र संभाजी यास गादीवर बसविलें. यावेळीं त्याचें वय १५ वर्षांचें होतें. त्यानें ताराबाईस राज्यकारभारांतून काढून राजसबाईचे विचारें आपण संपूर्ण राज्यकारभार पाहूं लागला.

शिवाजी मृत्यु पावला त्यावेळीं त्याची बायको भवानीबाई गरोदर होती. पुढें तिला पुत्र झाला. त्याचा नाश करण्याची राजसबाईची मसलत होती. याकरितां ताराबाईनें तो पुत्र मृत्यु पावला असा बहाणा करून रामचंद्रपंताच्या विचारें त्यास बरोबर कांहीं थोडे विश्वासू नोकर देऊन गगनगड येथें अमात्याचे वडील पुत्र भगवंतराव यांजकडे पाठविलें. तो मुलगा भगवंतराव यांनीं कांहीं दिवस गुप्तपणानें आपणाजवळ बाळगिला. हा मुलगा पुढें साताराच्या गादीवर बसला. ती हकीकत अलाहिदा ठिकाणीं येईल.

पुढें आंग्रे यांनीं कोल्हापूरकरांच्या कोंकणांतील प्रदेशास उपद्रव सुरू केला. त्याचे बंदोबस्तास इ० स० १७१५त चांदजीराव राणे अरुळेकर यास आज्ञापत्र पाठविलें.—"दत्ताजी आंग्रे याणें खारेपाटणची गढी घेऊन गगनगड-तनख्याचे गांवांस उपद्रव मांडिला आहे. त्यास तुह्मीं आपले कबिले वरघाटीं ठेवून लोकसहीत गगनगडकरी यांस सामील होऊन स्वारीशिकारी करून आंग्रे बलखुद होतील ती तजवीज करावी आणि गडचे घेऱ्यांतील गांवांस उपद्रव न लागे असें करावें."

याच सालीं रत्नागिरीहून मदतीचें मागणें आल्यावरून कान्होजीराव राणे व बापूजीराव राणे यांस त्यांचे लोकांसह तिकडे मदतीस पाठविलें.

पूर्वीं कान्होजीराव, बापूजीराव, चांदजीराव, अर्जोजी कुसूरकर वगैरे या प्रांतांतील शूरलोक भाऊबंदी तंट्यामुळें देशांतरास गेले होते. रामचंद्रपंतानें त्यांस अभय देऊन आणविलें आणि लढायांच्या कामास लाविलें. त्यांस व त्यांच्या जमावाच्या बेगमीस नेमणुका, जमिनी, गांव इत्यादि लावून दिले.

अशा रीतीनें कोल्हापूरराज्याची मांडणी व बचाव करण्यांत आणि कारभाराचें व स्वारीचें काम करण्यांत रामचंद्रपंताच्या आयुष्याचे शेव-

टचे दिवस गेले. या उद्योगांत असतां त्यास इ० स० १७२० या वर्षी पन्हाळा येथें मृत्यू प्राप्त झाला.

यास दोन स्त्रिया होत्या. वडील स्त्री जानकीबाई हीं मोरोपंत पिंगळे पेशवे यांची कन्या व धाकटी स्त्री यादवराव शिवदेव काटे (चे) यांची कन्या. यादवराव यांनीं लग्नाच्यावेळीं यास कोल्हापूर व तारळे-तर्फेचें आपलें नाडगौंडीचें वतन धारादत्त केलें.

रामचंद्रपंतास भगवंतराव ऊर्फ बाजीराव, मोरेश्वरराव ऊर्फ अप्पाजी-राव आणि शिवरामपंत असे तिघे पुत्र व व्यंकूबाई नांवाची एक कन्या अशीं अपत्यें होतीं.

रामचंद्रपंताचे आश्रयानें लहानपदापासून थोरपदापर्यंत वाढलेले असे पुष्कळ लोक होते व अद्याप आहेत. त्यांतील परशरामपंत व शंकराजी नारायण हे कारकून असतां याच्या शिफारसीनें प्रधान पदावर पोंचले. यानें विश्वासराव पोंवार यास योग्यतेस चढविलें. घोरपड्यास सेनापति पद देवविलें. याचा सरदार दमाजी थोरात हा कांहीं दिवस शाहूशीं भांडण्यास समर्थ होता. यांशिवाय अनेक लहान मोठ्या पदांचीं मनुष्यें याच्या आश्रयाखालीं उदयास आलीं.

याच्या लष्करांत कोंकणांतील व मावळांतील कुलीन मराठे व देशी हद्दीचे झेंडेधनगर यांची संख्या फार असे.

हा स्वधर्मनिष्ठ होता. हा रामदास पंथाचा अभिमानी रामभक्त होता. रामाची उपासना याच्या वडिलापासून याच्या घराण्यांत आली. याची ज्योतिषांतील मुहूर्तावर निष्ठा होती. हरएक महत्वाचे प्रसंगीं चांगली वेळ मिळण्याविषयीं प्रयत्न करीत होता. यानें लढायादिकांच्या

वेळीं चांगले मुहूर्त सांगितल्याबद्दल बऱ्याच देणग्या दिल्या व देवविल्या आहेत. यानें आचरें, साळशी, कामतें इत्यादि देवस्थानास चौघडे, नंदादीप आदिकरून खर्च चालण्यासारखीं इनामें दिलीं. रंगनाथ स्वामीस निगडीगांव इनाम देऊन राजपत्रें करून दिलीं. याप्रमाणें महाराष्ट्र, कोंकण व कर्नाटक यांत देवस्थानें व धर्मादाय याप्रीत्यर्थ इनामें दिलीं व देवविलीं आहेत. तीं इतकीं पुष्कळ आहेत कीं, त्याचा अदमासही करितां यावयाचा नाहीं.

यानें स्वतःकरितां मिळविलेल्या वतनाच्या सनदा फार आहेत. त्यांत राजशक ३० व ४१ या सनदांत आणि याचे वडिलांनीं मिळविलेल्या सनदांत उत्पन्नाचा तपशील दिला आहे. त्यांतील कांहीं खालीं दाखल केला आहे.

## वडिलार्जित वतनें.

सोनवळें प्रांत कल्याण येथील अदकारागिरी, देशमुखी व ज्योतिष याचें गांवगन्नांचें उत्पन्न आणि भादाणें, कुक्ष वगैरे इनाम गांव.

केळवडें तर्फ खेडेवारें येथील एक चाहूर इनाम जमीन.

तांदळी तर्फ रांजणगांव येथील कुलकर्ण व ज्योतिष.

मुरादपूर हा गांव वृंदावनाचें धर्मकृत्य चालविण्याकरितां इनाम.

रामचंद्रपंतानें स्वतः संपादिलेलीं व खरेदी केलेलीं उत्पन्नें. आजरें तर्फेचें देशकुलकर्ण व कुलकर्ण इ० स० १७९१ त खरेदी घेतलें. खारेपाटण व साळशी या महालची सरदेशमुखी व त्या वतनास इनाम गांव चार.

इनामगांवें शेळोली, राशिवडें, तांदळी वगैरे.

पन्हाळा, कऱ्हाड, मिरज, कोल्हापूर, तारळें, आजरें, हुकेरी, बेळगांव, कुडाळ या प्रांताची बाबती व जकात जिल्हेनिसबतीची व सरजकात.

साळशी महालचा दाहिजा.

कोल्हापूर व तारळें तर्फेची नाडगौंडी आणि या वतनास इनामगांवें.

कऱ्हाडचें कुलकर्ण व इनाम गांव १५ आणि मोकाशे गांव १७ व निसबत वार गांव ११ अकरा.

याशिवाय निरनिराळ्या सनदांतून इनामगांव, किल्ल्याच्या व जंजिऱ्याच्या वतनी सबनिशा, निसबतीचे मामले, बाबती, नऊ सुभे हायच्या जिल्हेबाबती, विजापूरचा सरंजाम, किल्ले नरगुंद, नवलगुंद, रामदुर्ग येथील सरंजाम, गांव, मुकाशे, पतकाच्या मुतालिक्या वगैरे आणखीही अनेक प्रकारच्या वतनाचा तपशील आहे. पुढें या वतना-पैकीं राज्याचे विभागणीमुळें बरींच उत्पन्नें यांजकडे चाललीं नाहींत.

याप्रमाणें यानें जशीं आपणास उत्पन्नें मिळविलीं तशींच इतरांसही पुष्कळ दिलीं व देवविलीं.

याची शरीरप्रकृति निरोगी होती, हाडगांत मोठे होते, हा उंच व भव्य होता, तसाच शक्तिमानही होता.

यास वस्त्रें मिळाल्यापासून यानें ४८ वर्षें आपल्या अधिकाराचें काम केलें. त्यापूर्वीं याचे वडील व वडील बंधू अधिकारावर असतां ७।८ वर्षें हा शिवाजीमहाराजाबरोबर स्वारींत असे. मरणसमयीं याचें वय सुमारें ७०-७५ वर्षांचें असावें. यानें मरणकालपर्यंत कारभाराचें काम केलें.

शिवाजीच्यावेळीं शूर व मुत्सद्दी अशीं अनेक तेजस्वी माणसें निपजलीं. त्यांतीलच रामचंद्रपंत हा एक होता. या कालीं अशा माणसांत भर पडत होती. परंतु संभाजीच्या कारकीर्दींत त्यास ऱ्हास प्राप्त होऊन बहुतांचा नाश झाला. त्यांतून रामचंद्रपंत हा निभावला, आणि यानें मराठ्यांचें राज्य नष्ट होऊन मोगलांची सत्ता स्थापित होण्याच्या बिकट व आणिबाणीच्या प्रसंगीं प्रबल शत्रूशीं सामना करून मराठी राज्याची उत्तमोत्तम सेवा केली, त्यास संरक्षिलें व वाढविलें; आणि पुढें तो फार कालपर्यंत राज्याच्या उपयोगीं पडत राहिला.

याच्या तोडीचा व इतकीं वर्षे राष्ट्र-सेवेंत घालविलेला पुरुष इतिहासांत क्वचित् आढळतो. यानें शिवाजी, संभाजी, राजाराम, दुसरा शिवाजी व कोलापूरचा संभाजी इतक्या राजांच्या कारकीर्दींत काम केलें. राजारामाच्या कारकीर्दीच्या आरंभापासून शाहू साताऱ्यास येईपर्यंत यानें बहुतेक संपूर्ण मराठ्यांचें राज्य एकट्यानें चालविलें. संभाजीच्या वेळीं गेलेलें राज्य मिळविण्यांत व रक्षण करण्यांत यास मिळालेल्या यशाचा वांटेकरी राजा किंवा दुसरा कोणी नव्हता.

रामचंद्रपंताचे मराठी राज्यावरील उपकार त्या त्या वेळच्या राजांनीं अनेक ठिकाणीं तोंडी व लेखांनीं कबूल केले आहेत आणि त्यानंतरचे एक दोन पिढ्यांनीं तोंडींच नव्हे, लेखांनीं कबूल केल्याचे अनेक दाखले आहेत.

राजारामाच्या मरणानंतर ताराबाईनें आपल्या स्वभावगुणाचा प्रभाव राज्यकारभारांत पाडिला. शाहूस राज्य न मिळतां तें आपल्या पुत्रासच असावें अशी दायादी दुर्बुद्धि धारण केली. यामुळें पूर्वीं शाहू सुटून यावा अशी मराठ्यांची चाललेली खटपट बंद झाली.

यत्नावांचून शाहू सुटून आला, तेव्हां तिनें आपल्या कौटिल्यानें मुत्सद्दी व सैनिक यांजकडून आपल्या पुत्राचा पक्ष धरून राहण्याविषयीं शपथ घेवविली. पुढें ती शपथ सेनापतींनीं पाळिली नाहीं. तिच्यायोगानें प्रतिनिधि प्रतिबंधांत पडले. सचिवानें प्राणत्याग करून घेऊन तिजपासून मुक्त झाला. परंतु रामचंद्रपंतावर तिचा परिणाम सर्व आयुष्यभर राहिला. ताराबाईपेक्षां सात्विक गुणांची एखादी राजमाता असती व हें शपथेचें प्रकरण उत्पन्न न होतें, तर ज्याचा बुद्धिप्रभाव सर्वत्र हिंदूंचें राज्य करण्यासारखा होता आणि ज्यानें केलेंही असतें, त्या रामचंद्रपंतास निरुत्साहानें आपली शक्ति आपसांतील कलहांत खर्च करावी लागली. याचा परिणाम एवढाच झाला कीं, कोल्हापूरचें राज्य स्वतंत्र होण्याच्या मार्गास लागलें.

असो; याप्रमाणें रामचंद्रपंतानें आपलें सर्व आयुष्य राज्यकारभार करण्यांत घालविलें.

---

## भाग २ समाप्त.

# भाग ३.

## भगवंतराव ऊर्फ बाजीराव.

( इ० स० १७२० ते १७५० )

भगवंतराव इ० स० १७२० या वर्षीं आपल्या वडिलाच्या मृत्यू-नंतर कोल्हापूर राज्याचे अमात्यपदाधिकारी झाले. यांच्या वडिलास बराच कालपर्यंत संतति झाली नव्हती. त्यामुळें यांच्या जन्मानें आईबापांस व राजकुटुंबास फार संतोष झाला. इ० स० १७०४ या वर्षीं महाराजांकडून यांस दूध-भाताकरितां शेळोली हा गांव इनाम मिळाला. यावरून यांचा जन्म इ० स० १७०० च्या सुमारास झाला असावा.

महाराजांनीं यास प्रथम ताराबाईसाहेबांच्या जवळ असण्याची कामगिरी सांगितली.

इ० स० १७२३ त उदाजीराव चव्हाण यांस महाराजांची आज्ञ झाली कीं, " स्वामीकार्याविषयीं तुह्मी आणि भगवंतराव एकविचारें वागावें."

याच सालीं भगवंतराव यांस कोल्हापूरच्या दक्षिणेकडील मोहिमी-वर जाण्याची राजाज्ञा झाली; आणि त्यांच्या मदतीस सेनापति, उदाजीराव चव्हाण, सुलतानजी व आप्पाजीराव शितोळे यांनीं आपा-पल्या लोकांसह जावें, असे हुकूम झाले.

इ० स० १७२४ च्या पौषमासीं महाराजांनीं भगवंतरावांस दुसऱ्यानें कोल्हापूरच्या दक्षिणेकडील मोहिमेवर पाठविलें, आणि आप्पा-

जीराव पंडित, रामराव बाबाजी, बाबाजी शिंगाडे वगैरेनीं आपापल्या लोकांसह यांस मिळून यांच्या आज्ञेंत वर्तावें, असे हुकूम दिले. या वरील दोन्ही मोहिमींची अधिक माहिती मिळत नाहीं.

इ० स० १७२८ त संभाजीराजे निजामास मिळून निजाम व पेशवे यांमध्यें झालेल्या लढाईंत हे आपल्या फौजेसह संभाजीबरोबर असून लढाईनंतर पन्हाळ्यास परत आले.

ताराबाई पन्हाळा येथें प्रतिबंधांत असून अमात्यांस तिच्या व्यवस्थेस नेमिलें होतें. हें पूर्वीं आलेंच आहे. तिचीं रामराजाच्या वतीनें संभाजीच्या विरुद्ध कारस्थानें सुरू होतीं. अमात्य रामराजास गुप्तपणें बाळगण्यांत मुख्य होते. त्यांस संभाजी, ताराबाई व रामराजे हे सारखेच धनी असल्यामुळें, ताराबाईच्या मसलती उघड करितां येत नव्हत्या, व संभाजीच्या विरुद्धही वागतां येत नव्हतें; परंतु अशा यांच्या वागण्यानें, दिवसानुदिवस "हे ताराबाईच्या मसलतींत आहेत" असा यांजविषयींचा संभाजीचा संशय वाढत होता. यावेळीं दुसरी अशी एक गोष्ट घडली कीं, राणोजी घोरपडे व आप्पाजी शितोळे या उभयतांमध्यें मोठा कज्जा लागून त्यापासून प्रांतास व संभाजीस फार उपद्रव पोंचला. या भांडणांत चिकोडी मुक्कामीं अमात्यांवरही मोठें संकट गुदरलें होतें; तथापि अमात्य याही भांडणांत सामील आहेत असेंच संभाजीस वाटत होतें. याचा परिणाम असा झाला कीं, संभाजीनें अमात्यांचें ठाणें साळवण व त्या खालचे गांव जबरीनें घेऊन जप्त केले. तसेंच अमात्यांच्या इतर हक्काचें उत्पन्नही जप्त केलें.

यावेळीं संभाजीराजे २।३ वर्षें प्रांतांत स्वारीवर फिरते होते. अमात्य यांजकडून त्यांजकडे "आमचें चालत आल्याप्रमाणें चालवावें" अशीं

विनंतीपत्रें वारंवार जात असत. तसेंच आईसाहेब, राणीसाहेब यांसही पत्रें जात असत. सर्वांकडून, तुमचें चालत आल्याप्रमाणें चालवूं अशीं आज्ञापत्रें येत असत. मात्र त्याप्रमाणें अम्मल होत नव्हता. संभाजीकडून अमात्यांस समक्ष भेटीस येण्याविषयीं वारंवार लिहून येत असे. अमात्य आपलें ह्मणणें व मागणें संभाजीस कळविण्याकरितां लोक पाठवीत असत, त्यांस प्रतिबंध होऊं लागला. अमात्यांस, संभाजीचे आपल्याविषयींच्या वागणुकीचा, संशय वाटत होता. यामुळें ते त्याचे समक्ष भेटीस जात नव्हते.

पुढें अर्जोनीं आपलें साळवण ठाणें व गांव सुटत नाहींत असें पाहून, अमात्यांनीं ठाणें व गांव जबरीनें आपल्या ताब्यांत घेतले. या लढाईत अमात्यांकडील बऱ्याच लोकांचा नाश झाला. पिराजी नाईक पावले, विठोजी सुरवशी इत्यादि पुष्कळ चांगले लोक जखमी झाले.

यानंतर जिजाबाईसाहेबांनीं हिम्मतबहाद्दर, नाना वैद्य, शिवाजीपंत यांस भगवंतरावाकडे पाठवून त्यांस पन्हाळा येथें समक्ष आपल्या भेटीस बोलावून आणिलें; आणि तुमचें चालत आल्याप्रमाणें चालवूं असें आज्ञापत्र देऊन व समाधान करून परत पाठविलें.

इतकें झालें असतांही महाराजांनीं, "तुह्मीं समक्ष भेटीस आलेनंतर तुमचें चालविलें जाईल" हा मंत्र सोडिला नाहीं. त्यावरून अमात्य त्रासून आईसाहेबांकडे जाऊन त्यांजपाशीं हें राज्य सोडून जाण्याविषयीं आज्ञा मागूं लागले. हें वर्तमान संभाजीस समजतांच त्यांजकडून यांस आज्ञापत्र आलें कीं,— तारीख १७ अपरील इ० स० १७२८ "तुह्मीं चित्तांत एक प्रकार आणून तेथें मातोश्रीसाहेबापाशीं आज्ञा मागतां ह्मणोन समजलें. त्यास तुह्मीं पुरातन सेवक, तुमची निष्ठा स्वामीचे ठायीं व स्वामीची ममता तुमच्या ठायीं असें असतां कोणी सांगणारांनीं

काय सांगोन तुमच्या चित्ताचा विपर्यास केला हें कळत नाहीं. राजेश्री पंतीं या राज्यांत श्रम, साहस करून कीर्ति संपादिली. त्यांचे पुत्र तुह्मीं आहां. पंतांचे घराविषयीं स्वामीचा द्वैतविचार नाहीं. ही निशा असो देणें. याउपरी संशय मानाल तरी तुह्मास पंताची, श्रीरामचंद्राची व स्वामीच्या पायांची शपथ असे. समाधान असो देणें. साहेबाचा मुक्काम गडमुडशिंगी येथें आहे. जमावानिशीं दर्शनासी येणें. चित्ताचा सर्व खुलासा होईल."

याच वर्षीं इ० स० १७२८ त भगवंतराव शाहूची भेट घेण्याकरितां साताऱ्यास गेले. जातांना संभाजी महाराजांकडे विनंतीपत्र पाठविलें कीं, पायाजवळ मोरेश्वरराव आहेत त्यांजकडे जिल्हा मामला सांगून सेवा घ्यावी. त्यावरून मोरेश्वरराव हे कोल्हापूर राज्याचें अमात्यपद चालवूं लागले. पुढें थोड्याच दिवसांत कान्होजी आंग्र्यांनीं अमात्यांच्या प्रदेशावर व रत्नागिरीच्या किल्ल्यावर हल्ला केला, किल्ला बरेच दिवस लढत होता. दारूगोळा व धान्यसामग्री यांची तूट पडत चालल्यानें किल्ला जेरीस येऊं लागला. हें वर्तमान मोरेश्वररावास समजतांच, ते लष्करसह किल्ल्याच्या मदतीस गेले. त्यांनीं आंग्र्यांच्या लोकांचा पराभव करून त्यांस हांकलून लाविलें आणि किल्ल्यावर दारूगोळा व धान्य यांची बेगमी करून, तो प्रसंगीं लढण्यास जय्यत तयार करून ठेविला.

इ० स० १७२९ त भगवंतराव साताऱ्याहून परत आले. त्यांचा अधिकार त्यांनीं परत आपल्या हातीं घेतला.

या वेळीं रत्नागिरीच्या किल्ल्यावर अमात्यांचा सरदार गोपाळ रामराव नांवाचा होता. तेथील बंदरांत अमात्यांच्या व महाराजांच्या लोकांमध्यें कांहीं तंटा झाला. महाराजांच्या लोकांनीं अमात्यांचे लोक

व सिबाडा धरून ठेविल्या, आणि किल्ला आपल्या ताब्यांत घेतला. अमात्यांनीं या सर्वांची मोकळीक होण्याविषयीं महाराजांकडे विनंति केली. महाराजांकडून उत्तर आलें कीं, गोपाळ रामराव याच्या अमर्यादेमुळें किल्ला सरकारांत घेतला. प्रस्तुत तें ठिकाण तुमच्या हुकमतीबाहेर झालें आहे. या गोष्टीचा विचार होऊन लिहून आल्यावर लोक व सिबाडा यांस मोकळीक होईल. रत्नागिरी तुमच्या सत्तेंत पाहिजे तर ती करून देऊं. त्यावरून अमात्यांनीं गोपाळ रामरावास क्षमा व्हावी अशा विनंतीपत्रासह महाराजांकडे पाठवून दिलें. महाराजांनीं गोपाळरावाची भेट घेऊन त्यास क्षमा करून परत पाठविलें. लोक व सिबाडास मोकळीक दिली. मात्र जंजिऱ्याची मोकळीक अमात्यांची समक्ष भेट झाल्यानंतर होईल असें ठरविलें.

इ० स० १७३१ त—शाहू व संभाजी यांमध्यें तह होण्याचें ठरून उभयतां राजे सातारा येथें एकत्र झाले. अमात्य कोल्हापूरच्या राज्यकारभारांत नव्हते यामुळें या तहांत यांचें अंग मुळींच नव्हतें. या तहापासून आपल्या उत्पन्नाचें नुकसान होऊं नये आणि शाहूच्या सांगण्यानें व समक्षतेनें आपण व संभाजी यांमध्यें असलेला संशय जाऊन एकमेकांचीं मनें शुद्ध व्हावीं, या इच्छेनें या प्रसंगीं अमात्य साताऱ्यास जाऊं इच्छित होते; परंतु संभाजीविषयीं त्यांच्या मनांत इतका संशय होता कीं, आपण सातारा येथें असतांही संभाजी आपणास प्रतिबंध करील किंवा करवील. याकरितां अमात्यांनीं सातारा येथें असणारे ताराबाईसाहेबांस लिहिलें कीं, आपण साताऱ्यास यावें किंवा न यावें? त्यावरून ताराबाईनें लिहिलें कीं, “ तुह्मांस आणण्यास भवानीशंकर यांस पाठविलें आहे. आज्ञावचनें सांगतील. कोणेविषयीं संशय मनांत न आणितां निघून यावें. तुमच्या मनोगताप्रमाणें विवेक करून दिला जाईल. कदाचित् बनाव न बसे तरी याल तसें तुमच्या

स्थळास पोंचवून दिलें जाईल ". यानंतर भगवंतराव सातान्यास गेले; परंतु तेथें त्यांचीं दोनही कामें साध्य झालीं नाहींत. तहांत त्यांचा रत्नागिरी जिल्हा शाहूकडे गेला. त्या मोबदला अमात्यांस कांहीं मिळालें नाहीं आणि शाहूस यांचे कामीं मध्यस्थी करण्यासही बनलें नाहीं.

या तहानंतर संभाजीनें आपले अष्टप्रधान केले. त्यांत अमात्यपद भगवंतराव यांस कायम केलें आणि जहागिरी नेमून दिली.

यानंतर भगवंतरावांनीं फत्तेसिंगराव भोसले यास पत्र पाठविलें कीं, सातारा येथें उभयतां धनी असतां आमचें सौरष करून दिलें नाहीं. आमचा कांहीं दोष नसतां विनाकारण दुर्निमित्यें आपल्यावर आणिलीं आहेत. त्याचें निरसन करण्यास तयार असतां तसा योग येत नाहीं. यावरून भोसले यांनीं लिहिलें कीं, " तुमचे भेटीनंतर महाराजांनीं एक दोन वेळां आपलें स्मरण केलें होतें. आतां प्रसंगाचे वेळीं सौरष करून दिलें जाईल. "

अमात्यांचे प्रदेशाचे नैऋत्य व पश्चिम या बाजूस सांवत व आंग्रे यांचे प्रदेश असून त्यांजकडून अमात्यांच्या प्रदेशास वारंवार उपद्रव पोंचत असे. कोल्हापूर राज्याचे सदरचे सीमेवर अमात्यांचा प्रदेश असल्यानें, त्या उभयतांकडून कोल्हापूर प्रांतावर मोहिम व्हावयाची झाल्यास अमात्यांच्या प्रदेशास प्रथम उपद्रव होत असे. त्या उभयतांच्या मनांत असें होतें कीं, घाटमाथ्याचा एकादा तरी किल्ला आपले ताब्यांत असावा किंवा तसें न साधल्यास एकादा नवा बांधून तो आपले ताब्यांत ठेवावा. त्याप्रमाणें किल्ले मिळविण्याची त्याची खटपट साधत नाहीं असें पाहून ते किल्ला बांधण्यासारखी जागा ताब्यांत घेण्याच्या यत्नास लागले.

इ० स० १७३२ त फोंड सांवतांनीं आपली फौज ओलवणची व त्यानजीकची टेंकडी घेण्याकरितां पाठविली. अमात्यांस ही बातमी

समजतांच त्यांनीं गोपाळ रामरावास फौजेसह तिकडे पाठविलें. गोपाळरावांनीं फार त्वरेनें तेथें जाऊन डोंगर आपल्या ताब्यांत घेतले. तेव्हां सांवतांची फौज डोंगराखालीं तळ देऊन राहिली आणि तिनें तेथून टेंकड्या घेण्याचा प्रयत्न चालविला. प्रत्येक हल्लयाचे वेळीं गोपाळरावांनीं त्यास मागें परतविलें. हें चाललें असतां गोपाळरावास अमात्यांकडून लोक व दारूगोळी यांची मदत आली. मदत येतांच गोपाळरावांनीं डोंगराखालीं जाऊन सांवताच्या लोकांचा पराभव करून त्यांस पळवून लाविलें. या लढाईंत दादजी पालांडे यानें मोठ्या शौर्यानें चांगली कामगिरी केली.

अमात्यांनीं सांवताचे लोक डोंगर घेण्याकरितां आल्याचें व त्याचे अगोदर डोंगर आपल्या ताब्यांत घेतल्याचें वर्तमान महाराजांकडे कळविलें. तिकडून आज्ञापत्र आलें कीं, " तुह्मीं त्वरेनें डोंगर धरिले फार चांगलें केलें. तुमच्या मदतीस भूधरगड, रांगणा व बाळाजी देसाई याजकडील लोक यांस जाण्याविषयीं लिहिलें आहे. सांवताकडील जमाव नामोहोरम झाल्यावर धरिलेल्या डोंगरांबद्दल मागाहून विचार होईल. तुह्मीं जलद इकडे निघून यावें. कितिएक विचारमनसुबा व्हावा लागतो. तुह्मीं सन्निद्ध असावें. "

इ० स० १७३२ त अमात्यांनीं ओलवणच्या टेंकडीवर किल्ला बांधून त्यास सदानंदगड ऊर्फ शिवगड असें नांव दिलें. महाराजांनीं या किल्ल्याच्या बेगमीस चार गांव आणि सौंदळ व खारेपाटण या महालांत गांवगन्ना नक्तीची नेमणूक करून दिली.

यानंतर कांहीं कालानें भगवंतरावांनीं साळशी महालांतील चिंदर गांवीं एक किल्ला बांधून त्यास भगवंतगड असें आपलें नांव दिलें.

इ० स० १७३४ च्या सुमारास आंग्र्यांनीं फौज पाठवून मौंदे गांवानजीकची सह्याद्रीची टेंकडी आपल्या ताब्यांत घेऊन तेथें किल्ला बांधण्यास सुरुवात केली आणि लष्करची छावणीही तेथेंच ठेविली. हें वर्तमान अमात्यांस समजतांच त्यांनीं तानाजीराव व कृष्णराव खानवीलकर यांजबरोबर फौज देऊन त्यांस लढाईवर पाठविलें. खानवीलकरांनीं आंग्र्याच्या लष्करावर रात्रीचा छापा घालून त्याचा फार नाश केला. दुसरे दिवशीं सकाळीं शत्रूच्या लोकांनीं घाटाखालीं जाऊन तळ दिला. खानवीलकर यांनीं त्या ठिकाणींही त्यांजवर हल्ला केला. फार वेळ लढाई चालून आंग्र्याच्या लोकांचा पराभव झाला. ते लोक पळून जात असतां खानवीलकरांनीं आपल्या हद्दीपर्यंत त्यांचा पाठलाग केला. या लढाईकरितां विशाळगड प्रतिनिधि यांनीं आपले कांहीं लोक अमात्यांच्या लोकांच्या मदतीस पाठविले होते.

या लढाईंत कृष्णराव राणे यांनीं चांगली कामगिरी केल्यावरून अमात्यांनीं त्यांस वाभवें हा गांव इनाम दिला.

सदरचें ठिकाण घेतल्यानंतर त्या ठिकाणीं झालेल्या किल्ल्याचें काम पाडून टाकिलें. हें ठिकाण मुंड्याच्या आकाराचें आहे, ह्मणून यास आंग्र्यांनीं मुडेगड असें नांव दिलें होतें. अद्यापि त्या ठिकाणास तेंच नांव चालू असून बांधकामापैकीं कांहीं अवशेष शिल्लक आहे.

यानंतर अमात्य व आंग्रे यांजमध्यें साळशी महालांत व इतर ठिकाणीं सुमारें दोन वर्षें लहान लहान लढाया चालू होत्या. शेवटीं इ० स० १७३५।३६ या वर्षीं संभाजी आंग्रे यांनीं अमात्यांस पत्र पाठविलें कीं, आपला आमचा हर्षामर्ष वाढला आहे. आपली आमची गोडी होऊन पूर्व स्नेहाप्रमाणें आपण व आह्मीं वर्तावें. स्नेहाची वृद्धि व्हावी व तो चालावा, असें आपल्या मनांत असल्यास लिहून यावें. हें पत्र

आल्यानंतर उभयतांमध्यें आणखी पत्रव्यवहार होऊन व उभयतांच्या समक्ष भेटी होऊन सख्य झालें.

कांहीं दिवसांनीं अमात्यांनीं कांहींएक मसलत योजून ती आंग्र्याच्या मदतीनें शेवटास न्यावी असा विचार ठरवून या कामीं आंग्र्याची सम्मति मिळविण्यास त्याजकडे बाबाजी करवडा व विठोजी पाटणकर यांस पाठविलें. ही मसलत काय होती हें आढळत नाहीं, तरी इतर माहितीवरून ती पेशव्यांच्या विरुद्ध असावी असें वाटतें.

यावर आंग्रे याजकडून उत्तर आलें कीं, " आपला आमचा निश्चयात्मक बेत झाला असतां वरकडाचा गुमान काय आहे? त्यांचा पराभव करावयास अशक्य काय आहे? इतरांस मध्यें न शिरूं देतां येईल. आपली आमची पुरती चित्तापासून एकात्मता असावी. आह्मांस एक दोघांनीं बेलभाकर देऊन इमानास खत्ता केली. तसा विपर्यास न व्हावा. याकरितां इकडून मनुष्यें पाठविलीं आहेत. यांजबरोबर आपलेकडील विश्वासू भला माणूस पाठवावा. त्यांजबरोबर श्रीरघुवीराचा बेल व भाकर पाठवावीं ह्मणजे आह्मींही श्रीकानोबाचा बेल व भाकर देऊन विश्वासू भला मनुष्य पाठवूं. आपला आमचा स्नेह आज–कालचा नाहीं. उभयतांचे वडील एकमेकांच्या कसे उपयोगीं पडले हें तुह्मीं आह्मीं जाणत आहों. "

याप्रमाणें अमात्यांची आंग्र्यांशी मसलत चालू असता अमात्यांच्या सांवताशीं लहान लहान लढाया चालू होत्या. अमात्यांच्या लोकांनीं कुडाळ प्रांतावर स्वारी करून आचऱ्याचा कोट घेतला.

यानंतर अमात्य व सांवत यांजमध्यें बोलणें होऊन शिवगड मुक्कामीं नागसांवत अमात्यांच्या भेटीस आले. तेथें सांवतांनीं अमात्यांस इ० स०

१७३८ अपरील तारीख ५ चे प्रांत कुडाळ यांतील देहहाय कर्यातीदेखील देशकुलकर्णाचें वतनपत्र करून दिलें. आचऱ्याचा कोट अमात्यांकडे रहावा आणि एकमेकांनीं एकमेकांस मदत करावी व सलोख्यानें असावें, असे उभयतांमध्यें ठराव झाले. पुढें हा कोट आईसाहेब महाराजांनीं अमात्यांकडे मागितल्यावरून तो त्यांचे स्वाधीन करून त्यांनीं तेथील आपला ठाणेदार अण्णाजी तुबाजी यास काढून आणिला. तेथें आईसाहेबांनीं आपला हिर सांवत नांवाचा ठाणेदार नेमिला.

यानंतर कांहीं दिवसांनीं आचऱ्याच्या कोटावर तुळाजी आंग्र्यांनीं हल्ला करून कोट आपल्या ताब्यांत घेतला. असा महाराजांच्या अमलास उपद्रव सुरू झाला. तेव्हां अमात्यांस आंग्र्याचा बंदोबस्त करणें अवश्य झालें. अमात्यांनीं ही हकीगत व आंग्र्याच्या विरुद्ध योजलेले उपाय महाराजांस कळविले. महाराजांचें आज्ञापत्र आलें कीं, "तुह्मीं योजिलेला मनसुबा सिद्धीस पावविणें".

इ० स० १७३८–३९ च्या सुमारास भगवंतराव साताऱ्यास जाऊन शाहूस भेटले. तेथें ताराबाईसाहेबांनीं अमात्यांच्या एकनिष्ठेविषयीं आणि संभाजीराजे अमात्यांचें चालत आल्याप्रमाणें चालवीत नाहींत याविषयीं शाहूस सांगितलें. त्यावरून शाहूनें भगवंतरावांस सातारा येथें ठेवून घेतलें. पुढें संभाजीराजे शाहूच्या भेटीस सातारा येथें आले असतां, शाहूनें त्याजकडून भगवंतरावांचें चालत असल्याप्रमाणें चालविण्याविषयीं शपथ घेवविली; आणि इ० स० १७४० त संभाजीबरोबर अमात्यांस कोल्हापुरास पाठविलें.

इ० स० १७४४ दिजंबर तारीख १९ रोजीं गगनगड मुक्कामीं अमात्यांनीं त्रिंबकराव यादव, विरूपाक्ष अण्णाजी व गोविंद निराजी यांजकडून इमानपत्र लिहून घेतलें; आणि किल्ले राजहंसगड त्यांच्या स्वाधीन कर-

ण्याचें ठरविलें. पत्रांतील तात्पर्यः—" किल्ल्याची बेगमी करून जागा जतन करूं. कैलासवासी पंतांचे नांवें मुलखांत शिक्का रोखा चालवूं. निशाणें जतन करूं. यत्नानें नवे किल्लेकोट स्वाधीन होतील ते स्वामींचे. आह्मीं सेवक दहा सालें काम करून स्वामींची जागा स्वामींचे स्वाधीन करूं. दरसाल १००१ होन देत जाऊं." इत्यादि प्रकारचे करार यांत आहेत.

शाहू व संभाजी या उभयतांस संतति नव्हती. याकरितां शाहूच्या मनांत खानवट घराण्यांतील एखादा मुलगा दत्तक ध्यावा असें येऊन, ती गोष्ट त्यानें ताराबाईजवळ सांगितली. ताराबाईनें इतक्यांत घाई नको, परमेश्वर तुह्मांस पुत्र देईल, असें त्यांचें शांतवन केलें. यानंतर कांहीं कालानें शाहूचा दत्तक घेण्याविषयींचा निश्चय झाला. तेव्हां ताराबाईनें आपला नातू गुप्तपणें पानगांवीं ठेविला असल्याचें त्यांस कळविलें. त्यावरून इ० स० १७४४--४५ त शाहूनें भगवंतरावास सातान्यास आणविलें आणि अभय देऊन त्यांस रामराजाची हकीकत विचारिली. त्यांनीं सर्व हकीकत शाहूस कळविली. शाहूनें आणखी विश्वासू मनुष्यांकडून या गोष्टीची सत्यता ठरवून घेतली.

रामराजे मूल असतां बावडा येथें ठेविलें होतें, हें पूर्वीं लिहिलें आहे. बावडा येथें असतां शिवरामरावाची स्त्री दुर्गाबाई यांनीं त्यांचें संगोपन उत्तम प्रकारें केलें. पुढें भगवंतरावांनीं यांस पानगांवीं दर्याबाई निंबाळकर यांचे स्वाधीन करून गुप्त राखण्याविषयींची तजवीज केली.

शाहूनें रामराजास दत्तक घेतल्यास ताराबाईचें वर्चस्व होईल, ही गोष्ट शाहूच्या स्त्रीस इष्ट नव्हती ह्मणून तिनें यावेळीं दत्तकाच्या विरुद्ध शाहूचें मन वळविण्याची खटपट चालविली. यामुळें हें दत्तकाचें काम लांबणीवर पडलें.

पूर्वीं भगवंतरावांच्या वडिलांनीं अलौकिक पराक्रम करून कीर्ति संपादिली होती. आपण तशी कीर्ति मिळविण्याची इच्छा भगवंतरावाचेठायीं रात्रंदिवस घोळत होती. परंतु रामराजास गुप्त ठेवण्याच्या कामीं अमात्य असल्याच्यायोगानें संभाजीराजे प्रथमपासूनच यास पुढें सरण्याची संधि देईनात. कोल्हापूरच्या घाटाखालच्या प्रदेशाच्या संरक्षणार्थ लढाया चालवूनही संभाजीचें मनोधारण होईना. शाहूनें संभाजीकडून शपथ घेववून यांस विश्वासांत आणण्याचा यत्न केला, तरीही संभाजीचें यांच्याविषयींचें वर्तन बदलेना. यावेळीं रामराजाच्या दत्तकाचें प्रकरण मागें पडलें. यांना केव्हां केव्हां सांवत व आंग्रे यांच्याशीं कांहीं प्रसंग पडले. त्याशिवाय आपली बुद्धि व तरवार यांचा उपयोग करण्याचा प्रसंग कोठेंही व कांहीं केल्या येईना. तेव्हां हे अतिशय त्रास व खेद पावून मराठी राज्यांत उत्कर्षाची संधि मिळविण्याविषयीं निराश झाले. तेव्हां यांनीं दिल्लीच्या राज्यांत शिरण्याची मसलत केली आणि त्याकरितां प्रथम निजामाची मदत मिळविण्याचा यत्न आरंभिला. यांनीं निजामाच्या नांवाची थैली तयार करून ती गंगाजी संकपाळ, हुसेनखान वगैरे लोकांबरोबर निजामाकडे पाठविली.

संकपाळ इ० स० १७४७।४८त औरंगाबादेस गेले. तेथें त्यास नारो महादेव—ज्यांनीं पूर्वीं रामचंद्र नीलकंठ हे रेडीचा किल्ला घेत असतां गदग-लक्ष्मेश्वरचे देसायातर्फे ३०० स्वार व ३००० बरकंदाज यांसह मदत केली ते गृहस्थ—भेटले. ते व संकपाळ यांनीं नजरबेगखा बक्षी याच्यामार्फत नबाबाकडे थैली गुदरली. नबाबांनीं मुनशी यांस इजायतनामा तयार करण्यास हुकूम केला. थोड्याच दिवसांत नबाब बऱ्हाणपुरास गेले. तेथें इजायतनामा पुरा करून बक्षी याच्या स्वाधीन करतेवेळीं त्यास सांगितलें, तुह्मीं राव यांस लिहावें कीं, पंच-

वीस हजार स्वार व पन्नास हजार बरकंदाजासह जलदीनें इकडे निघून यावें, त्यास खर्चास सरंजाम दिला जाईल व त्यांच्या ह्मणण्याचा विचार मुद्देमाफीक केला जाईल.

याप्रमाणें चालत असतां संकपाळ व नारो महादेव हे जी जी हकीकत घडे ती ती भगवंतरावांस लिहीत असत. त्यांत त्यांजकडून फौज तयार ठेवण्याविषयीं सूचना होत असे. भगवंतरावांकडून तिकडे पत्रें जात. त्यांतील एका पत्रांत त्यांनीं नारोपंतास लिहिलें कीं, तिकडे फौज तयार करितां येईल किंवा कसें? त्याचें उत्तर नारोपंताकडून आलें कीं, पूर्वींच्या पत्रीं येथें पांच हजार स्वारांची भरती केली आहे असें लिहिलें आहे. आतां पुढील इसमांच्या नांवें कौल यावे. हकीम बेग जमातदार राऊत ५००, शिदोजी पाटील जळगांवकर राऊत ९००, खोजे रहिमदुल्ला जमातदार राऊत ५००, खानदेशचे जमातदार बच्चूमिया, चांदखान, अल्लीसाहेब फरोदी असे राऊत १५००. याप्रमाणें कौल येऊन तिकडून सरंजाम लवकर रवाना व्हावा. नबाबाचें पेशव्याशीं चित्त शुद्ध दिसत नाहीं. चातुर्मासानंतर युद्धप्रसंग होईल असें दिसतें. फौज पाठविण्याची सवड तूर्त होत नसल्यास राजेश्री शिवरामराव यांजबरोबर एक हजार स्वार व खर्चास देऊन पाठवावें. येथें जमात करवूं. नंतर कृष्णरावास बोलावूं. येथें राव येत आहेत हें सर्वतोमुखीं झालें आहे. पेशव्यासही समजलें आहे कीं, राव व नबाब एकचित्त झाले आहेत. नबाब वारंवार विचारितात कीं, राव केव्हां येतात. इतर सरदारही असेंच विचारतात. याकरितां जलदीनें तजवीज व्हावी.

असें चालत असतां नबाब असफजा मृत्यु पावले. त्यांचे पुत्र नासिरजंग नबाब झाले. नारोपंतानें अमात्यांस लिहिलें कीं, असफजा

यांनीं दिलेला इजायतनामा नासिरजंगास माहीत आहे व त्यास मान्य आहे. आपण येणेंचें करावें. येथील व्यवस्था झाल्यानंतर दिल्लीस वकील पाठवून आपल्या योग्यतेप्रमाणें बंदोबस्त करून घेऊं. हल्लीं दिल्लीचे बादशहा मृत्यु पावले असून, त्यांचे पुत्र अहमदशहा तक्तावर आहेत. इकडील काम झाल्यानंतर तिकडील काम सोपें पडेल.

इकडे शाहू आजारी पडला. त्यानें रामराजास दत्तक घेण्याचें ठरविलें आणि भगवंतरावास साताऱ्यास बोलावून नेलें. या दत्तकास व ताराबाईस शाहूची स्त्री प्रतिकूल असून तिच्या पक्षास प्रतिनिधि होते. यासाठीं शाहूनें ताराबाईजवळ भगवंतराव व चिटणीस यांजकडील लोक ठेविले; आणि मुलास आणविण्याची योजना केली. इतक्यांत शाहूचा आजार वाढला. त्यानें पेशव्यास रामराजास गादीवर बसविण्यास सांगितलें आणि आपण मृत्यु पावला. पुढें पेशव्यांनीं रामराजास आणून गादीवर बसविलें.

रामराजा गादीवर बसल्यानंतर थोड्याच कालांत त्यानें भगवंतरावास सातारचें अमात्यपद दिलें. यावेळीं अमात्यांस दिलेल्या आज्ञापत्रांतील सारांशः—

"खुद्द तुम्हांस अमात्यपद व जातीची नेमणूक १२०००.
शिवराम पंडित यांस छंदोग्य अमात्यपद व नेमणूक ६०००.
बाबूराव शिवराम पंडित यांस फडणिशी व नेमणूक ५०००.
नारायण शिवराम पंडित यास दप्तरदारी व नेमणूक २०००.

याप्रमाणें हुद्दे व जातीच्या नेमणुका करून दिल्या. पूर्वींचे जिल्हे, मामले, वतनें, कुरणें, वगैरे चालत आल्याप्रमाणें करार करून दिले. पदाचे हुद्यास लागतील ते मदतनीस ठेवावे. त्याचा खर्च अलाहिदा

ठरविला जाईल. आबासाहेबीं इमानपत्र दिल्याप्रमाणें तैनात, सरंजाम इनामें, वतनें हीं चालविलीं जातील"

भगवंतरावांनीं आपणास सातार्‍याचें अमात्यपद मिळाल्यानंतर संभाजीकडून कोल्हापूरचें अमात्यपद आपले पुत्र कृष्णराव यास (इ० स० १७५० त) देवविलें; व आपण सातारा येथें राहूं लागले.

भगवंतराव सातारा–अमात्य झाले व राजा त्यांच्या पक्षाचा होता; परंतु या वेळीं सातार्‍याची बहुतेक राजसत्ता पेशव्यांच्या हातीं गेली होती.

शाहू व संभाजी यांचे तहाचेवेळीं अमात्यांचा रत्नागिरीसुभा व कांहीं उत्पन्नें शाहूकडे गेलीं. तीं त्यानें पेशव्यांकडे दिलीं. गेलेला सुभा व उत्पन्नें परत मिळविण्याकरितां भगवंतराव पुण्यास गेले. तेथें पेशवे व अमात्य यांमध्यें या विषयासंबंधीं बोलणें चाललें. ही बाब मुलूख सोडण्याची असल्यानें ठराव लवकर होईना व पेशव्यास "नाहीं" ह्मणण्यासही योग्य सबब मिळेना. यामुळें पेशवे यांनीं याचा निकाल लांबणीवर टाकिला. भगवंतराव पुणें येथें असतां या सुभ्याऐवजीं कांहीं नक्त रक्कम पेशव्याकडून यांस मिळत असे आणि खर्चाची नेमणूक स्वतंत्र मिळत होती. यावेळीं अमात्य पुणें व सातारा येथें येऊन जाऊन रहात होते.

अमात्यांनीं विजापूरप्रांतीं असलेले आईसाहेब महाराजाचे हक्काच्या वहिवाटीच्या सनदा नरसिंगराव जाधव यांस देऊन त्यांस तिकडे पाठविलें. जाधव यांजकडून काम न होतां त्यांनीं कर्जमात्र केलें, आणि त्या कर्जाकरितां अमात्यांकडे रकमेचें मागणें केलें. अमात्यांनीं त्यांजकडून हिशेब घेऊन, त्या प्रांतीं आपले हक्क आहेत ते महाराजांकडून मिळतांच

त्यांतून या पैशाची फेड केली जाईल असें जाधवास इ० स० १७१४ त पत्र करून दिलें.

याप्रमाणें चाललें असतां हे इ० स० १७५५ त पुणें येथें मृत्यु पावले. यांस दोन स्त्रिया होत्या. थोरली व्यंकूबाई ही निळोपंत प्रधानाची मुलगी असून, या बाईस साडीचोळीकरितां सांगरूळ हा गांव इ० स० १७२१ त इनाम मिळाला होता. भगवंतरावास दोन पुत्र होते.. यांपैकीं धाकटा अल्पवयीं मृत्यु पावला. वडील पुत्र कृष्णराव हे पुढें पदाधिकारी झाले. भगवंतरावांनीं कोल्हापूरचें अमात्यपद ३० वर्षें आणि सातारचें ५ पांच वर्षें चालविलें. हे राजघराण्यांतील एका गादीच्या हक्कदार राजपुत्राच्या जिवाच्या रक्षणार्थ विश्वासानें वागले यामुळें त्यावेळीं गादीवर असणाऱ्या कोल्हापूरचे संभाजीच्या रोषास व संशयास कारण झाले. त्यापासून यांची पुष्कळ हानि झाली.

यांचा पुष्कळ प्रदेश गेला, राज्यकारभारांत पुढें येतां आलें नाहीं, व आपली कर्तबगारी दाखवितां आली नाहीं. यांनीं आंग्रे, वाडीचे सांवत यांच्या स्वाऱ्यांपासून आपला व कोल्हापूरचा घाटाखालील प्रदेश संरक्षण करण्यांत दक्षता ठेवून व लढून त्या दोघांसही दाबांत ठेविलें. यामुळें कोल्हापूरच्या घाटाखालच्या प्रदेशाचें संरक्षण झालें आणि कोल्हापूरकरांस घाटाकडील बाजूनें उपद्रव पोंचला नाहीं.

यांनीं आपल्या कारकीर्दींत लोकांस पुष्कळ देणग्या दिल्या. नंतर पुणें सातारा इकडे असतां, पूर्वीं उपयोगी पडलेल्या लोकांस कृष्णराव यांजकडूनही कांहीं देणग्या देवविल्या. हे प्रेमळ स्वभावाचे होते.

# कृष्णराव भगवंत.

(इ० स० १७५० ते १७६१.)

यांचे वडील भगवंतराव यांस रामराजे यांजकडून सातारा अमात्यपदाचीं वस्त्रें मिळतांच, त्यांनीं आपली कोल्हापूर अमात्यपदाचीं वस्त्रें संभाजी राजे यांजकडून इ० स० १७५० त कृष्णराव यांस देवविलीं.

कृष्णराव प्रथमपासून फार अशक्त व रोगग्रस्त होते. ह्मणून यांस वस्त्रें मिळाल्यापासून संस्थानच्या कारभाराचें काम यांची माता व्यंकूबाई हिचे देखरेखीखालीं चालत होतें.

हे दिवसेंदिवस अधिकाधिक अशक्त व आजारी होत चालले होते. थोड्याच दिवसांत यांची प्रकृति अशा दुर्बल स्थितींत आली कीं, यांच्या आईबापांसदेखील या आजारांतून हे बरे होतील व यांस संतति होईल अशी आशा राहिली नाहीं.

इ० स० १७५४ त यांचे धाकटे चुलते शिवरामराव यांनीं यांस आपला मुलगा दत्तक द्यावा असें योजून भगवंतरावांस त्याविषयींची संमति विचारिली; परंतु त्यांनीं ही गोष्ट कबूल केली नाहीं.

या वेळपर्यंत शिवरामराव हे बावडा येथें सहकुटुंब राहत असत. यापुढें ते साताऱ्यास राहूं लागले; आणि भगवंतराव यांच्या मरणापासून सातारा अमात्याचा अधिकार चालवूं लागले.

इ० स० १७५५ त पंतप्रधान यांनीं आंग्र्यावर स्वारी केली. यावेळीं अमात्यांच्या फौजेनें कोल्हापूरच्या राजाच्या वतीनें किल्ले यशवंतगडीं युद्धप्रसंग केला. गडावर हल्ला करून किल्ला घेतला. त्यांत अमात्यांकडील कित्येक लोक ठार व जखमी झाले. या लढाईंत

केदारजी पानकर सरनोबत किल्ले शिवगड हा सरदार ठार झाला, व विठोजी पालांडा यास जबर जखम झाली.

याचवेळीं आंग्र्याच्या लोकांनीं अमात्यांच्या नाधवडे येथील मेळ्यांतील फौजेवर हल्ला केला. परंतु त्यांत ते पराभव व नाश पावून परत गेले.

इ० स० १७५६ त अमात्यांनीं सदर पानकर याच्या कुटुंबास धोणसरी हा गांव इनाम दिला; आणि या गांवांत महाराजांचे असलेले हक्क पानकर यास द्यावे व इतर पडलेल्या लोकांच्या कुटुंबांचें चालविण्याविषयींची तजवीज व्हावी, असें विनंतीपत्र महाराजांकडे पाठविलें.

याच वर्षीं व्यंकूबाईनीं मोरेश्वरराव ऊर्फ अप्पाराव यांस बावडा दौलतीचा कारभार करण्यास नेमिलें.

आईसाहेब महाराजांचें अमात्यांस आज्ञापत्र कीं, (सन दिलेला नाहीं) " किल्ले महिमतगड येथें यमाजी शिवदेव यानें लोक पाठवून उपद्रव सुरू केला आहे. तुह्मीं पुरातन सेवक असून स्वामीच्या किल्ल्यास अपाय होत असतां मदत केली नाहीं ह्मणून समजलें. आतां किल्ल्यास दारूगोळी व पायचे लोक पाठवून आलेल्या लोकांचें पारपत्य करावें आणि हरएकविशीं किल्ल्यास मदत करावी. छ २१ रविलावल मकरसंक्रमणाचे तीळ शर्करायुक्त पाठविले आहेत. "

अमात्यांनीं आचऱ्याचा कोट जिंकून मिळविला होता. पुढें तो महाराजांनीं मागितल्यावरून त्यांजकडे दिला. आंग्र्यानें तो महाराजांकडून जबरीनें घेऊन पाडून टाकिला. कोटाकडे अमात्यांकडून कांहीं नेमणूक होती. कोट महाराजांकडे असेपर्यंत ती चालू होती. पुढें अमात्यांनीं ती बंद ठेविली. त्या नेमणुकीकरितां सिंधूदुर्ग येथून अमात्यांच्या प्रदेशीं रोखे होऊन जुलूम होऊं लागला. अमात्यांनीं तो बंद होण्याविषयीं महाराजांकडे विनंति केली.

यावेळीं भूत उठवून घातल्याबद्दल सरकारांतून शिक्षा होत असत, व त्यापासून ज्याचें नुकसान झालें असेल त्यास सरकारांतून कांहीं मिळत असे. याविषयीं इ० स० १७५७ त मोसम गांवचे तावडे व नरसू सरवण याजबद्दल सरकारांतून चौकशी होऊन तावडे यास जमीन इनाम मिळाली आहे.

इ० स० १७५९ सालीं अमात्यांनीं साळशी महालांतील नाद गांवीं पागा बांधून तेथें कांहीं स्वार ठेविले.

भगवंतराव सातारा येथें असतां त्यांनीं पूर्वीं संस्थानच्या उपयोगी पडलेल्या लोकांस इनामें देण्याविषयींचीं पत्रें कृष्णराव यांजकडे पाठविलीं. त्यावरून कृष्णराव यांनीं त्या त्या लोकांस इनामें दिलीं.

या इनामपत्रांतील पिराजी पावले, सोनजी शिरसाठ, विठोजी खुरवशी, यांच्या सनदांवरून असें दिसतें कीं, इ० स० १७४० ते १७५० चे दरम्यान अमात्य व महाराज यांजमध्यें साळवण येथें एक लढाई झाली आहे; परंतु या लढाईचें कारण व वेळ याचा निश्चय होण्याचें साधन अद्याप मिळालें नाहीं.

कृष्णराव स० १७६१ च्या नवंबर महिन्यांत मृत्यु पावले. यांचा बहुतेक काल आजारांत गेला. मरणापूर्वीं दोन वर्षें हे आसन्नमरण स्थितींत होते.

यांच्या कारकीर्दींत यांच्या प्रांतास आंग्रे व हबशी यांजपासून फार उपद्रव होत होता.

यांची माता व्यंकूबाई ही सावध व हुषार होती. तिनें यांच्या कारकीर्दींत संस्थानचा कारभार फार चांगल्या प्रकारें चालविला होता.

कृष्णरावास आपला मुलगा रामराव हा दत्तक द्यावा असा शिवरामराव यांचा पुष्कळ दिवसांचा हेतु असून त्याकरितां त्यांनीं मुलास बावडा येथें आणून ठेविला होता; परंतु व्यंकूबाईस तो बेत पसंत नव्हता. तिनें मोरेश्वरराव यांचा पुत्र सुबराव यांस दत्तक पसंत केलें.

---

## सुबराव कृष्ण.

( इ० स० १७६१-१८१० )

इ० स० १७६१ च्या नवंबर महिन्यांत व्यंकूबाईनें मोरेश्वररावाचे धाकटे पुत्र सुबराव यास कृष्णरावाच्या स्त्रीच्या ओट्यांत घालून त्यांच्या नांवानें अधिकाराचीं वस्त्रें मिळण्याकरितां कोल्हापूर दरबारांत थैली पाठविली.

यावेळीं कोल्हापूरचें राज्य जिजाबाईसाहेब चालवित होत्या. त्यांनीं सुबरावास दत्तक घेतल्याचें मंजूर करून त्याच्या नांवें अमात्यपदाचीं वस्त्रें पाठविलीं. यावेळीं भगवंतपंत आप्पा हेरलेकर ऊर्फ बेडकीहाळकर हे जिजाबाईसाहेबांच्या मर्जींतील होते. यांनीं आपल्या मुलीचें लग्न सुबरावाशीं व्हावें, असें व्यंकूबाईकडून आश्वासन घेऊन वस्त्रें मिळविण्याच्या कामांत बरीच मदत केली.

सुबराव यांचें जन्म इ० स० १७५३ त झालें. दत्तकाच्यावेळीं यांचें वय ८ वर्षांचें असून मुंज झालेली होती. दत्तकानंतर थोड्या दिवसांनीं सदर हेरलेकर यांची कन्या मैनाबाई इशीं याचा विवाह झाला.

याच्या अल्पवयांत याची आजी व्यंकूबाई ही संस्थानचा सर्व कारभार पहात होती.

या संस्थानास आपला मुलगा दत्तक व्हावा अशी शिवरामरावाची फार दिवसांची खटपट असतां दुसराच दत्तक होऊन तो कोल्हापूर दरबारानें कबूल केला, यामुळें त्यांनीं याविषयींची खटपट पेशवे दरबारांत करण्याकरितां आपला धाकटा पुत्र आबाजीराव यास पुण्यास पाठविलें.

आबाजीरावानें राघोबादादा पेशव्याची भेट घेऊन त्यास समजाविलें कीं, पूर्वीं भगवंतरावांनीं आपला बंधू रामराव यास जन्मतांच दत्तक घेतला असून, नंतर सातार्‍यास आणून त्यांनींच त्याची मुंजही केली. असें असतां हल्लीं कृष्णरावाच्या स्त्रीनें मुंज झालेला दुसरा मुलगा दत्तक घेतला आहे, सबब तो दत्तक रद्द होऊन रामरावास गादीची मालकी मिळावी.

यावरून राघोबादादानें व्यंकूबाईच्या नांवें एक व कृष्णाजी त्रिमळ, महादाजी साबाजी, सातो साबाजी, भास्कर नारायण, विसाजी शंकर, नारो हणमंत इत्यादि बावडादरबारच्या प्रमुखांच्या नांवें एक अशीं दोन पत्रें पाठवून कळविलें कीं, भगवंतरावांनीं रामराव दत्तक घेतला असतां दुसरा मुंज झालेला मुलगा गादीवर आणिला ही गोष्ट शास्त्रसंमत नाहीं. रामरावच खरे धनी आहेत. याकरितां आणिलेला मुलगा परत पाठवावा आणि तुह्मीं रामरावाच्या आज्ञेंत वागावें. बखेडा केल्यास परिछिन्न कामास येणार नाहीं.

याप्रमाणें पत्रें येतांच व्यंकूबाईनें त्यांच्या नकला करून विनंतीपत्रासोबत जिजाबाई–साहेब यांजकडे पाठविल्या; आणि राघोबादादास लिहिलें कीं, आपणास ही माहिती खोटी मिळालेली आहे. पूर्वीं

दुसरा दत्तक घेतलेला नाहीं. जिजाबाईसाहेबांनींही राघोबादादास यथायोग्य अज्ञापत्र पाठविलें. त्यावरून राघोबादादानें या दत्तकास आपली मान्यता असल्याचें तारीख ८ जुलई सन १७६२ चें पत्र व्यंकूबाईकडे पाठविलें.

इ० स० १७६५ त जंजीरे सिंधुदुर्ग येथें इंग्रजाकडील टामस मास्टीन ( मोडी लिपींत असें आहे. वास्तविक उच्चार आस्टीन असेल. ) हे आले असतां अमात्यांकडील बाळाजीपंत या नांवाचे कामगार " संस्थान व इंग्रज या उभय सरकारांत दोस्ती चालावी " याविषयींचें बोलणें करण्याकरितां त्याजकडे पाठविण्यांत आले होते.

इ० स० १७६६ च्या जुलई महिन्यांत व्यंकूबाई मृत्यु पावली. तिनें कृष्णराव व सुबराव या दोन कारकीर्दींत मिळून १६ वर्षे संस्थानचा कारभार चालविला असून तो चांगला चालविला होता.

भगवंतराव व शिवरामराव यांनीं सातारा अमात्यपद मिळवितेवेळीं खर्चाकरितां कर्ज काढिलें होतें. त्या कर्जाची मागणी सुबराव यांजकडे झाली. सुबराव यांची तक्रार अशी होती कीं, हें कर्ज सातारा अमात्यपदाकरितां असून तें पद बाबूराव शिवराम यांजकडे आहे. याकरितां त्या कर्जास आपण जबाबदार होत नाहीं. पुढें ही तक्रार पेशवे दरबारांत जाऊन इ० स० १७६९ त पेशव्यांनीं ठरविलें कीं, या कर्जाचा संबंध बावडा दौलतीशीं नाहीं, सबब हें सर्व कर्ज बाबूराव यांनीं द्यावें. तूर्त त्यांस सवड होत नसेल तर ते त्यांनीं सोईसोईनें फेडावें.

इ० स० १७७३ त बावडा येथील कारभारी महादाजी साबाजी सुकठाणेकर मृत्यु पावले. हे प्रथम भगवंतराव यांच्या आश्रयास राहून वाढत वाढत कारभारी--मंडळांत प्रमुख झाले होते.

येथें कोल्हापूरच्या राज्यव्यवस्थेसंबंधीं थोडी हकीकत दिली असतां पुढील वर्णनास सुलभता येईल. ती अशी कीं, इ० स० १७६२ त जिजाबाईनें शिवाजीस दत्तक घेऊन त्याचे अज्ञानपणांत आपण राज्य चालविलें असून तें चालविण्याचे कामीं आपले माहेरचे लेकवळे येसाजी शिंदे यांस कारभारी नेमिलें होतें. तिचे कारकीर्दींत तिजकडून किंवा शिंदे याजकडून कारभाराचें काम चांगलें चाललें नाहीं, हें प्रसिद्ध आहे. जिजाबाई इ० स० १७७२ त मृत्यु पावली. यावेळीं शिवाजीचें वय १५ पंधरा वर्षांचें होतें. यापुढें शिंदे याजवर जिजाबाईचा असलेला थोडा दाबही नाहींसा होऊन ते पूर्ण स्वतंत्र्यानें राज्य चालवूं लागले. शिंदे हे हलक्या कुळांतील होते. ते राज्यकारभारांत प्रतिनिधि, अमात्य इत्यादि जुने प्रधान किंवा इतर जुने मुत्सद्दी यांची मसलत बिलकुल घेत नसत. यामुळें हें सर्व जुनें मंडळ शिंद्याच्या विरुद्ध होतें. शिंदे सुभेदार इतरांप्रमाणें अमात्यांचा द्वेष करीत किंवा त्यांजाविरुद्ध असत.

सिताराम हवालदार ह्मणून कोणी शिंदे सुभेदार यांचा द्वेष करणारा होता. त्यानें मारेकऱ्यांकडून सुभेदाराचा नाश करण्याचें ठरवून पन्हाळा येथें देवघरांतून महाराजांकडे जाण्याच्या वाटेवर मारेकरी उभे केले. सुभेदार मारेकऱ्यांस पाहून सावध झाले; आणि त्यांस पकडून आणवून त्यांच्या जबान्या घेतल्या. त्यांनीं नांवें सांगितल्यावरून चौकशी करून हवालदार, नेरलीकर वगैरे इसमांस शिंदे सुभेदारांनीं शिक्षा दिली. या कटाची माहिती पंडित अमात्य व पंडित प्रतिनिधि यांस होती असें जबान्यांवरून दिसल्यावरून सुभेदार करवीरीं येऊन उभयता पंतांस वाड्यांत बोलावून आणून त्यांनीं त्यांस जबान्या वाचून दाखविल्या. त्यांवर उभयतांनीं उत्तरें दिलीं नाहींत. यावरून सुभेदार यांस अत्यंत क्रोध येऊन त्यांनीं उभयतांचे जाण्यास अटकाव करून सरंजाम जप्त

करण्याचें ठरविलें. तेव्हां गुजाजीराव गाईकवाड व खंडेराव गोविंद पारसनीस या उभयतांनीं रदबदली करून उभयता पंतांकडून महाराज-सरकारांत " अनुचित कर्मास प्रवृत्त न होतां राज्याच्या कल्याणाकरितां मनोभावें झटूं वगैरे प्रकारचीं " इमानपत्रें लिहून घेऊन सुभेदाराकडून उभयतांस जाण्याची मोकळीक घेतली व सरंजाम जप्त न व्हावा असें ठरविलें. उभयता पंत आपल्या स्थळास जातांना वाटेंत अपाय न व्हावा ह्मणून पारसनीस हे अणस्कुरा घाटापर्यंत बरोबर आले.

इ० स० १७७५ त येसाजी शिंदे सुभेदार यांनीं महाराजांस बरोबर घेऊन अमात्यांच्या साळवण ठाण्यावर स्वारी केली. शिंदे यांच्या हातीं ठाणें न जातां त्यांस परत जावें लागलें. ठाण्याभोंवतालचे कित्येक गांवमात्र शिंदे यांच्या ताब्यांत गेले. पुढें थोड्याच दिवसांत या गांवच्या सुटके--संबंधानें महाराज व अमात्य यांजमध्यें कलमबंदीच्या यादी झाल्या.

या स्वारीचें कारण, ( इ० स० १७७४ मे तारीख १५ ) शिंदे सुभेदारांनीं कोल्हापूर राज्यांतील सर्व किल्ल्यांच्या सरसुभ्याच्या सनदा आपल्या नांवें करून घेतल्या असून त्यांत अमात्यांचे गगनगड व शिवगड यांचा समावेश झाला. ही गोष्ट अमात्यांस पसंत नव्हती; आणि शिंदे यांचें अमात्यांशीं पूर्वीपासून नीटही नव्हतें हें होय.

इ० स० १७७७ त महादजी शिंदे यांनीं कोल्हापुरास वेढा घातला. पुष्कळ दिवस झाले तरी वेढा उठविणें किंवा तह होणें घडलें नाहीं. यावेळीं अमात्य बावडा येथें होते. त्यांस बाजी महादेव सुकठाणेकर यांनीं सुचविलें कीं, आपण व प्रतिनिधि यांनीं मध्यस्ती करून तह करावा. यावरून अमात्यांनीं सुकठाणेकर यांस शिंद्यांच्या लष्करांत पाठविलें. त्यांनीं बाळोबातात्या व जिवबातात्या यांच्यामार्फत

शिंद्यांची भेट घेऊन कळविलें कीं, उभयता पंत तह करूं इच्छितात. तेव्हां शिंदे यांनीं सांगितलें कीं, उभयता पंतांस घेऊन येऊन तहाविषयीं बोलणें करावें. यानंतर सुकठाणेकर शिंद्याकडील हरकारे बरोबर घेऊन येसाजी शिंदे सुभेदार यांची भेट घेण्याकरितां कोटांत आले. तेथें व्यंकटराव सबनीसामार्फत सुभेदाराची भेट घेतली आणि झालेली हकीकत त्यांस कळविली. सुभेदारांनीं बेलभंडार घेऊन शफत केली आणि सांगितलें कीं, उभयतां पंतांस बिनदिक्कत येथें आणावें व तहाचें बोलणें करावें. त्यांस आमचेकडून बिल्कुल उपद्रव होणार नाहीं. वेढा उठवावा व राज्य रक्षावें.

यानंतर उभयता पंत कोल्हापुरास आले. तहाविषयीं बोलणें होऊन तह ठरला. त्यांत उभय पंतांनीं पांच लक्ष रुपयांची जामीनकी शिंद्याकडे दिली. शिंदे यांजकडे पंतांनीं करार लिहून दिला त्याचें तात्पर्य:— इ० स० १७७७ तारीख १२ मे वैशाख शुद्ध ६ श्रीमन्महाराज व पंतप्रधान यांचा तह आपल्या ( महादजी शिंदे ) विद्यमानें झाला. त्यांत यशवंतराव शिंदे सरसुभेदार यांनीं पांच लक्ष रुपये आह्मांकडून आपणांस देवविले. त्याचा तपशील:— राजमंडळचीं ठाणीं आपल्याकडे आहेत तीं कराराप्रमाणें आपण आमच्या स्वाधीन कराल त्या तारखेपासून चार महिन्यांच्या मुदतीनें दोन लक्ष रुपये देऊं व त्याच मुदतीपासून सहा महिन्यांनीं एक लक्ष रुपये देऊं. बाकीच्या दोन लक्ष रुपयांबद्दल आपण महाराजांच्या मुलखांचा वसूल घेतला आहे त्याची रुजवात होऊन एकमेकाकडे फिरेल त्याप्रमाणें द्यावें व घ्यावें. याप्रमाणें पांच लक्ष रुपयांच्या ऐवजास महाराजांनीं दोन लक्षांचीं ठाणीं व मुलुख हीं आमच्या स्वाधीन केलीं आहेत. कराराप्रमाणें ऐवजाची पुरवणी न झाल्यास ठाणीं व मुलुख आपल्या स्वाधीन करूं.

या तहानंतर शिंदे वेढा उठवून निघून गेले. हा तह उभयतांच्या मध्यस्थीनें झाला; आणि जामीनगतीमुळें राज्यांतील कांहीं भागाच्या

उत्पन्नाच्या दखलगिरीचें व देखरेखीचें काम साहजिक उभयतांकडे आलें. यापासून सर्व राज्यांतील उत्पन्नाच्या व खर्चाच्या वाटाघाटीचेंही काम उभयतांस करणें अवश्य झालें. त्याप्रमाणें या वाटाघाटीच्या मसलती पंतांकडे सुरू झाल्याचें सुभेदार यांस समजलें. पहिल्यापासून सुभेदारांच्या मनांत राज्यकारभारांत पंतांचें अंग नसावें, उलट त्यांच्या ताब्यांतील किल्ले आपल्याकडे घेऊन त्यांस पाहिजे तेव्हां पेचांत धरून जहागिरी काढून घ्याव्या असें असतां, आतां त्यांचेंच वजन आपल्यावर बसलें. याचें त्यांस वाईट वाटून उभयतां पंतांस प्रतिबंध करण्याची मसलत करून अप्पाजी शामजी चिकोडीकर यास उभयतां पंतांकडे पाठवून त्यांस कांहीं कामानिमित्त सरकारवाड्यांत बोलावून आणविलें. त्यांच्या बरोबरच्या जुजबी लोकांस वाड्यांत घेऊन बाकीच्यांस हाकून लावून वाड्याभोंवतीं तोफा रोखून ठेविल्या; आणि पंतांस वाड्यांत प्रतिबंध केला.

सुकठाणेकर सुभेदाराकडे जाऊन त्यांस ह्मणाले कीं, आपण आण-भाक दिली असतां हा विचार काय? यावर सुभेदार बोलले कीं, जेथें दुःख तेथेंच डाग देईन, तुह्मीं जावें. सायंकाळपर्यंत कोणाचें स्नान, भोजन वगैरेही झालें नाहीं. तेव्हां सुभेदारांचे गुरु श्रीबाबामहाराज यांनीं मध्यस्थी करून उभयतां पंतांनीं कोटाबाहेर श्रीच्या मठांतून भोजन करून परत यावें व परत आणण्यास बरोबर हुजरे द्यावे अशी सुभेदाराची परवानगी घेतली. बाकीचे सुकठाणेकर, अप्पाजी शामजी, वीरभद्रगिरी, अप्पाजी भगवंत, मोरोपंत ढवळे वगैरे मंडळींचें स्नान, भोजन वगैरे वाड्यांतच झालें.

उभयतां पंत मठांत जाऊन स्नान, भोजन करीतोंपर्यंत रात्र झाली. पंतांनीं कोटाचे दरवाजे बंद होऊन कुलुपें लागल्याचा बातमा आणवून

हुजरे यांस मठांत सोडून, ते रातोरात निघून बावड्यास आले. प्रतिनिधि १५ दिवस बावडा येथें राहून घाटाखालून विशाळगडास गेले. सुभेदारांनीं पंतांची सरकारवाड्यांत असलेली मंडळी पन्हाळा येथें नेऊन निरनिराळ्या ठिकाणीं कैदेंत ठेविली.

अमात्य बावडा येथें आल्यानंतर सुकठाणेकर हे आपल्यास प्रतिबंध होण्यास मिलाफी आहेत असें समजून, त्यांच्या कुटुंबांतील बाजी महादेव यांच्या तर्फेचीं माणसें प्रतिबंधादाखल बावडा येथें ठेवून बाकी सर्व बावड्यांतून घालवून दिलीं. त्यांजकडे असलेला कोनोली गांव सरकारांत घेतला, व सुकठाणेकरास कारभारांतून काढून गोपाळ गंगाधर यास कारभारी नेमिलें.

इ० स० १७७८।७९ त गोपाळजी आंगरे यांनीं साळशी महालांतील अमात्यांच्या प्रदेशावर स्वारी केली. त्याच्या बंदोबस्तास अमात्यांनीं रामाजी कृष्ण व बाळाजी गणेश यांस फौज देऊन पाठविलें. उभयपक्षांत कुंभवडें भिरंवडें या ठिकाणीं लढाई होऊन आंगरे नामोहरम झाले. या लढाईत अमात्यांकडील नार सांवत हे मोठा पराक्रम करून मृत्यु पावले.

इ० स० १७७९ त शिंदे सुभेदारांनीं बाजी महादेव व चिटको महादेव सुकठाणेकर यांजकडून रक्कम ११५०० रुपये मखलाशी घेऊन त्यांस कैदेंतून सोडून दिलें.

यानंतर सुकठाणेकरांनीं पूर्वीप्रमाणें बावडा दौलतीचा कारभार आपणाकडे मिळविण्याची अतिशय खटपट केली, तथापि ती साध्य झाली नाहीं व त्याचा गांवही परत मिळाला नाहीं. तेव्हां सुकठाणेकरांनीं महाराजांकडे यत्न करून तिकडून आपला कार्यभाग साधण्याची खटपट सुरू केली.

येथें सुकठाणेकराविषयीं थोडें लिहिणें अवश्य आहे कीं, त्यांचें कुटुंब मोठें असून त्यांतील ३।४ पुरुष कारभारांत वहिवाटत होते. या कुटुंबाचे आप्तेष्ट फार असून ते संस्थानच्या निरनिराळ्या खात्यांत मुख्यत्वानें असत. या सर्वांचा पक्ष मालकांच्या पक्षापेक्षां बळकट असे. याचा परिणाम पुढें मालकांविरुद्ध बंडापर्यंत होऊन मालकांस अत्यंत जाचक झाला. हें पुढें क्रमानें येईल.

इ० स० १७८० त कृष्णराव भगवंत यांचीं स्त्री मृत्यु पावली.

पंतप्रधान व कोल्हापूरचे महाराज यांजमध्यें झालेल्या तहांत इ० स० १७७७ त महादजी शिंद्यांनीं अमात्य व प्रतिनिधि यांजकडून घेतलेले जामिनकीचे कतबे परत द्यावे असें कबूल झालें.

इ० स० १७८१ ता० ७ जूनचें भास्करराव नंदगांवकर यांचें गगनगडचे हवालदार दादजी काटे यांस पत्र कीं:--इकडील सविस्तर वृत्त राघोपंतास लिहिलें आहे. हल्लीं कालचर्या प्रकारांतर आहे. जाग्याची बंदोबस्ती राखून सावध असावें. येतेवेळीं तुह्मांस सांगितलेंच आहे. प्रस्तूत चिरंजीव तेथें आहेत. त्यांच्या विचारें वर्तोन स्थळाचा बंदोबस्त राखणें. बरकड मजकूर बाळाजीपंतास लिहिला आहे. ही सूचना शिंदे सुभेदारांनीं किल्ला आपल्या ताब्यांत घेण्याच्या चालविलेल्या खटपटीकरितां झालेली होती असें दिसतें.

इ० स० १७८१ त महाराज व सांवत यांजमध्यें रांगणा येथें युद्ध सुरू झालें. महाराजांनीं आपल्या लोकांच्या मदतीस अमात्यांस पाठविलें. अमात्य आपल्या लोकांसह आश्विन-मासीं तेथें जाऊन पोंहोचले. पुढें ही लढाई तीन महिने चालून महाराजांस जय प्राप्त झाला. यांत अमात्यांनीं आपल्यावरील कामगिरी चांगल्या प्रकारें बजाविली. अमात्य या लढाईतून मोकळे होतांच बावडा येथें आले.

महाराजांनीं अमात्यांस कांहीं कामगिरीकरितां पन्हाळा येथें स्वारींत बोलावून नेलें. कामगिरी झाली तथापि परत जाण्यास निरोप होईना. अमात्यांनीं रामनवमीचा उत्साह करून परत येतों असें महाराजांपाशीं सांगून निरोप घेतला. यावेळीं महाराजांच्या सांगण्यावरून अमात्यांनीं बाजी महादेव सुकठाणेकर यांजवर कृपा करून त्यास आपल्या बरोबर घेतलें. हें सुकठाणेकराचें थोडें कार्य साध्य झालें. यापेक्षां अधिक कार्य साध्य होण्याकरितां अमात्यांचा मुक्काम महाराजांजवळ आणखी पाहिजे होता. तो घडविण्याची सुकठाणेकरांची खटपट सुरू होती. यानंतर उत्साह होऊन फार दिवस झाले असतांही अमात्य पन्हाळ्यास आले नाहींत. तेव्हां महाराजांकडून अमात्यांस बोलावण्याकरितां ह्मणून नारो दत्तात्रेय व चिटको महादेव सुकठाणेकर बावड्यास आले. ते आले असतां अमात्य घांटाखालीं आचरें येथें देवदर्शनास गेले. तेथें त्यांचा बरेच दिवस मुक्काम झाला. बोलावण्याकरितां आलेले सुकठाणेकर बावडा येथें राहिले असतां नारो दत्तात्रेय यांजकडे महाराजांकडील लोक वरचेवर येत होते. ही बातमी धोंडजी पेडे यानें अमात्यांस कळवून सूचना केली कीं, किल्ला हुजूर जाणार. ही बातमी समजतांच अमात्य बरोबर ८०० लोक घेऊन नारो दत्तात्रेयाच्या पारिपत्याकरितां निघाले. हें वर्तमान नारो दत्तात्रेय यास समजतांच तो आपल्या लोकांसह अमात्य बावडा येथें येण्यापूर्वींच पन्हाळ्यास निघून गेला, व चिटको महादेव बावडा येथेंच राहिले.

अमात्यांनीं बावड्यास येतांच सुकठाणेकरांच्या घरीं चौक्या बसविल्या; आणि पुढें सुमारें अडीच महिन्यांनीं अपराध लागू होत नाहींसें पाहून त्या उठविल्या.

याप्रमाणें अमात्यांस पन्हाळ्यास नेऊन महाराजांकडून सांगवून सुकठाणेकराचे घरांत कारभाराचें काम यावें अशी चाललेली खटपट साध्य झाली नाहीं. उलट त्यांचा अमात्यांस आलेला संशय दृढ झाला.

याप्रमाणें चाललें असतां सुकठाणेकर व त्यांचे कटांतील लोक ज्यांस कारभारीमंडळ असें ह्मणत असत, त्यांनीं सुबराव अमात्यांस पदच्युत करून व प्रतिबंधांत ठेऊन सातान्याहून शिवरामरावाचा नातू आणून त्यांस वस्त्रें देवविण्याची मसलत योजिली. बहुतेक लष्कर व शिवगड किल्ला व गडकरी या कटांत सामील झालेल्या लोकांच्या ताब्यांत होते. फक्त गगनगडकरी मात्र या कटांत सामील नव्हते. तेही पुढें दिलेल्या कारणानें यांत सामील झाले.

सुबराव अमात्यांस पुत्र होऊन तो आठ दिवसांचा असतां मृत्यु पावला ही गोष्ट देवतांच्या क्षोभामुळें झाली असें वाटून अमात्यांनीं त्यांच्या शांतवनार्थ गगनगडचे हवलदार दादजी काटे यास देवसकी करण्यास सांगितलें. काटे शंभर लोकांसह रामेश्वराच्या देवालयांत एक महिना देवसकी करीत होते. एके रात्रीं काटे देवळाबाहेर लघवीस बसले असतां कोणी मारेकऱ्यानें त्याचे डोकीवर वार केला. त्या वारानें डोकीचें पागोटें तुटून डोकीस थोडी जखम झाली. गलबल होतांच देवळांतून लोक बाहेर आले. त्यांस घेऊन काटे यांनीं मारेकऱ्यांचा पाठलाग केला. मारेकरी काटकुपांत पेडे याचे घराकडे गेले. हें पाहून काटे परत आले आणि सकाळीं देवसकी ( देवपण ) सोडून देऊन लोकांसहीत किल्ल्यावर गेले. पेडे सुबरावांच्या वतीचा असें समजलें जात होतें. मारेकरी त्याचे घराकडे गेले. यामुळें मारेकरी घालण्यांत पेडे याचें ह्मणजे अमात्यांचें अंग असावें, अशी हवालदार

यांची समजूत होऊन त्यांनीं वरील देवपण सोडिलें आणि कारभारी-मंडळांच्या कटांत सामील झाले.

यामुळें कारभारीमंडळास गगनगडकरी यांस पुढें करून त्यांजकडून अमात्यांविरुद्ध महाराजांकडे तक्रारी करविण्यास साधन झालें; आणि कटांतील लोकांस सर्व जबाबदारी त्यांच्या नांवावर घालतां आली.

याप्रमाणें हा कट पूर्णतेस आला. सुबराव अमात्य यांस या कटाची व त्याच्या पूर्णत्वाची माहिती लागली, व ते प्रतिकाराच्या तजविजीस लागले. आपली मसलत अमात्यांस समजली असें पाहून कटांतील लोकांनीं अमात्यांस प्रतिबंध करण्याची वेळ जवळ आणून मुक्रर केली. ही वेळ अमात्यांकडील लोकांस समजतांच त्यांतील देवबा शिंगरा या नांवाच्या गडकऱ्यानें सुबराव अमात्य बसले असतां त्यांच्या पाठीवर एक थापट मारिली. हें या गडकऱ्याचें चमत्कारिक वर्तन घडतांच सुबराव आपल्या वतीच्या जुजबी नौकरांसह तत्काळ किल्ल्याखालीं उतरून पेठेंत मुक्कामास राहिले. शिंगरा यानें मारलेली थापट ही खूण होती, असें पुढील वर्तनावरून दिसतें. सुबराव पुन्हां संस्थानीं आल्यावर त्यांची शिंगरा याजवर मोठी मेहरबानी झाली. ते त्यास विनोदानें ह्मणत कीं, देवबा, केवढ्या मोठ्यानें थापट मारलीस? तेणेंकरून अद्याप माझी पाठ दुखत आहे.

हें कृत्य होण्यापूर्वीं बाह्यतः अमात्य व गगनगडकरी यांची एकी होण्याचें बोलणें चाललें होतें.

अमात्य किल्ला सोडून खालीं आल्यानंतर बावड्यापासून दोन कोसांवर डुकरवण्याच्या डोंगरपाठावर दोन महिने मुक्कामास होते. या मुक्कामांत त्यांनीं बावड्याकडील रस्त्यांत डोंगरावर एक झरी बांधिली आहे ती अद्याप तेथें आहे.

यानंतर बरेच दिवसांनीं कारभारीमंडळानें साताऱ्याहून शिवरामरावाचा नातू रघुनाथराव यांस गादीचा मालक करण्याकरितां बावडा येथें आणविलें.

हें बंडाचें वर्तमान महाराजांस समजल्यानंतर त्यांजकडून सुबराव यांजकडे आज्ञापत्र आलें कीं, प्रस्तुत किल्ले गगनगडकरी यांजकडून कांहीं विपर्यास पडला आहे, ह्मणून परस्परें निवेदनांत आलें. तुमचेकडून कांहीं लिहून आलें नाहीं. ऐसीयास चोंहीकडील प्रकार कोणे रीतीचा हें तुह्मीं जाणतच अहां. तेथील प्रकार कोणे रीतीचा घडला हें सविस्तर कळविणें. नरोजी माने हुजरे यासी पाठविलें आहे. (ता० २१ अकटंबर १७८४.)

यानंतर सुबराव अमात्य यांनीं झालेल्या हकीकतीचें विनंतिपत्र महाराजांकडे पाठविलें.

कोल्हापूर-इतिहास उत्तरार्ध भाग १ यांतील पुढील उत्तारा असा कीं, "इ० स० १७८४ त बावड्यावरील गडकऱ्यांच्या हक्कांत बावडेकर पंत यांनीं कांहीं धांदल केल्यावरून गडकरी बेदील झाले, व त्यांनीं बंड केलें. महादाजी शंकर व बाबाजी महादेव व चिटको महादेव शेणवी व महादाजी बल्लाळ देसाई जात कऱ्हाडे यांनीं गडकऱ्यांस अनुकूल करून घेऊन सुबराव कृष्ण अमात्य यांस किल्ल्याखालीं घालवून बदलून बसले. ही बातमी हुजूर येतांच गुजाजी गाईकवाड सरखवास यास फौज देऊन बावड्यास रवाना केलें. खवास पावले असतां बोलणें वगैरे कांहींच आलें नाहीं. तेव्हां पंधरा दिवस वाट पाहून खासा स्वारी फौजेसह बावड्यास निघाली. तिसरे दिवशीं किल्ले मजकुरानजीक पोंचून किल्ल्यालगत रुपणीच्या ओढ्यावर फौजेस राहण्यास आज्ञा झाली; व सडी स्वारी पेठेंत विठलाईच्या देवळाजवळ गेली. जातांच किल्ल्यावरून गडकऱ्यांनीं तोफा सुरू केल्या, तेव्हां सायंकाळपर्यंत स्वारी राहून

परत मुक्कामास आली. दुसरे दिवशीं साळवणास येऊन मल्हारपेठेंत पंधरा दिवस मुक्काम केला; तत्राप बोलणें कांहींच आलें नाहीं. सबब कूच होऊन स्वारी पुनः बावडाकिल्ल्यास गेली. त्यासमयीं किल्ल्या-वरून पुन्हा तोफा सोडिल्या. त्या वेळेस राघोजी भोंसले हवलदार दिम्मत देवघर यास विठलाईच्या देवळानजीक गोळी लागून ठार झाले. त्या दिवशीं महाराज सरकारचा मुक्काम त्याच स्थळीं झाला. दुसरे दिवशीं स्वारी मल्हारपेठेस गेली. नंतर कामगार शेणवाई वगैरे यांस अभयपत्रें देऊन आणविलें, आणि समेट करून परत बावडा किल्ल्यास पाठविलें. पेशजी येसाजी शिंदे सुभेदार यांनीं राशिवडें हा गांव जप्त करून सरकारांत घेतला होता. त्या गांवची सोडचिठ्ठी पंडित अमात्य यांस देऊन त्यांस राशिवड्यास जाऊन राहण्यास आज्ञा दिली आणि स्वारी परत करविरीं आली.

याप्रमाणें महाराजांनीं या प्रकरणाचा तूर्तातूर्त निकाल लावून स्थिर-स्थावर केली. कारण बंडवाल्यांच्या ताब्यांत दोन किल्ले व लष्कर असून त्यांचा बंदोबस्त करण्यांत मनस्वी खर्च व वेळ मोडावा लागला असता. तें वांचविण्यासाठीं सोईसोईनें या प्रकरणाची व्यवस्था लावण्याचें महाराजांनीं मनांत योजिलें असावें.

या बंडाच्यापूर्वी व नंतर चाललेल्या तक्रारी व पत्रव्यवहार हीं कारभारी व त्यांचे अनुयायी गडकऱ्यांचें नांव पुढें करून चालवीत होते. तथापि सुबरावांच्या कारकीर्दीपासून या मंडळीचाच मुख्यत्वें तोटा झाला होता व होणार होता. यामुळें या बंडास कांहीं तरी सबबीनें गडक-ऱ्यांचें नांव पुढें करून हीं मंडळी खरी उत्पादक व चालक झाली होती. यांत बहुतेक शेणवी असून तेच प्रमुख होते. यामुळें या बंडास शेणव्यांचें बंड असें नांव मिळालेलें असून तेंच आजवर चालू आहे.

हें बंड इ० स० १७८४ ते १७९१ पर्यंत चाललें होतें. या मुदतींतील बंडवाल्यांकडील कारस्थानाचे कागद मिळत नाहींत. ते नाश पावले असावेत. तथापि त्यांतून चुकून राहिलेले व सुबराव अमात्य यांनीं पकडलेले कांहीं कागद मिळाले आहेत त्यांतील तात्पर्य पुढें दिलें आहे.

यापुढें कारभारीमंडळानें रघुनाथराव यांस वस्त्रें मिळविण्याची खटपट सुरू केली. त्यांनीं गुजाजीराव गाईकवाड यांस अनुकूल करून घेतलें. गायकवाड यांचें वजन महाराजांजवळ फार होतें. *

गाइकवाड यांनीं गडकऱ्यांस पाठविलेल्या पत्रांतील सारांश पुढीलप्रमाणें आहे.

१. [ तारीख ८ दिजंबर सन १७८४ च्या पत्रांतील ]:—तुह्मीं ह्मणतां कीं, माझ्या मनांत तुमच्याविषयीं संशय आहे. मीं अंगानिराळें टाकिलें आहे. अमात्यांकडे मल्हारजी हुजरे आहेत व लोक जातात येतात, ऐक्य आहे. दिवसेंदिवस भयप्रदर्शन करून तुह्मांस बुजवावें हा माझा हेतू दिसतो. मीं अंगाबाहेर टाकिलें किंवा साहेबीं अव्हेर केला, हें कळवावें. सेवकास परिणाम पाहणें प्रास आहे. चौकीचे लोक आज्ञापत्रें पाठवून धरून नेले. त्यांस तुह्मीं धनीसाहेबांच्या पायाशीं निष्ठेनें वागत असतां आह्मांकडून दुसरा विचार कसा होईल? संशय धरावासा काय आहे. तुह्मीं सेवेसीं तत्पर. तदन्वयें आह्मीं अर्ज करीत आलों. अव्हेर केला कीं, आमच्या अर्जावरून तुमच्या वर्तणुकीची हा वेळपर्यंत क्षमा झाली, हें तुह्मीं जाणतच आहां. हुजूर येणाऱ्या लोकांकडे हुजरे असण्याची दरबारची रीत आहे.

---

* टीपः—हें बंड होण्यापूर्वी थोडे दिवस "रघुनाथराव पेशव्यांची पदच्युति व सवाई माधवरावांस वस्त्रें" ही गोष्ट घडली असून कारस्थानी मंडळीच्या नजरेसमोर होती. याचीच आवृत्ति बावड्यास काढण्याचा मंडळीचा बेत झालासा दिसतो.

ऐक्य आहे हा दोष बोलण्यांत कां? बुजविणारे बुजवितील, तें चित्तीं न धरितां स्वामीचें लक्ष खंबीर असें चित्तीं आणून वर्तल्यास तुमची निष्ठा तुह्मांस पार पाडील. आजवर ज्यांनीं परिणाम पाहिले त्यांच्या गती कोणेरीतीच्या झाल्या, हें तुह्मीं जाणतच आहां. तुह्मीं आज्ञेप्रमाणें वर्तत असतां चौकीचे लोक धरून नेण्याची आज्ञा होईल न होईल हें चित्तीं आणून आज्ञापत्र आलें न आलें याचा तपास करा.

२. तारीख २७ दिजंबर १७८४ चे पत्रांतील सारांश:—तुह्मीं रामचंद्रपंतासमागमें पत्र पाठविलें, तें पोचलें. निष्ठेचा मजकूर धनीसाहेबांच्या सेवेशीं निवेदन केला. नारायणभट ह्याजबरोबर खूण पाठविली, ती पाहून रामचंद्रपंताबरोबर परत पाठविली आहे. तुह्मीं धनीसाहेबांच्या सेवेशीं बे वसवसा येणें. हुजूरून आज्ञापत्र सादर आहे.

३. तारीख ६ जानेवारी १७८५ च्या पत्रांतील सारांश:—तुमचें पत्र पोंचलें. स्वामीस मजकूर निवेदन केला. तुह्मांस आज्ञापत्र सादर झालें आहे. त्यास निशाणाविषयीं दिक्कत न घेतां किल्ल्यावर घेऊन हुजूर विनंतीपत्र पाठविणें. इकडून पांच असामी पाठविले आहेत. सर्वत्रांस तुमच्या तर्फे सांगावें. नच घडे तरी मालजी निकम यांच्या-समागमें पाठवून द्यावें. संशय वाढवावया प्रयोजन नाहीं. चिरंजीव राजेश्री हैबतराव गाइकवाड व हत्ती व लोक असे मशारनिल्हेसमागमें पाठवून देणें.

४. तारीख २५ फेब्रुवारी १७८५ च्या पत्रांतील सारांश:—नारायण-भट व गुजाजी गाइकवाड यांजमार्फत विनंती केल्यावरून चिटको महादेव, रामचंद्र कृष्ण व गडकरी यांस हुजूर येण्याची व आज्ञेप्रमाणें कृपा संपादून घेण्याची हुजूरची आज्ञा झाली आहे.

याप्रमाणें बंडवाल्यांचें आपल्यावरील दोष नाहींसा करण्याचें काम चालू असतां सुबराव यांनीं पुढें काय होतें याची वाट पाहण्यांत कांहीं दिवस राशिवडें येथें घालविल्यानंतर बरोबर कांहीं फौज घेऊन इ० स० १७८५ त साळवण ठाण्यावर हल्ला करून ठाणें व त्या खालचे गांव ताब्यांत घेतले, आणि कारभारीतर्फेचे लोक हांकवून लाविले.

इ० स० १७८६ त सुबराव अमात्य पांच सहाशें लोक बरोबर घेऊन फोंडा घाटानें कोंकणांत उतरले; आणि गगनगडचे घेऱ्यांतील गांवगन्नाचे कामविसदार व पाटील कुलकर्णी यांस आपल्याकडे आणवून गांवांची लावणी केली. तेव्हां अमात्य व बंडवाले यांकडील लोकांत गांवगन्ना कटकटी होऊन लोक जाया होऊं लागले. बंडवाल्यांनीं अमात्यांस अनुकूल असलेल्या लोकांचीं घरें व गांवें जाळणें व मारेकरी घालून लोक मारणें सुरू केलें.

यावेळीं घांटावरील साळवण व राशिवडें हीं ठाणीं अमात्यांच्या ताब्यांत असून कोंकणांतील गांवीं त्यांचा अम्मल बसूं लागला. बंडवाल्यांस त्यांजवर चालून जाण्याचें सामर्थ्य नव्हतें. त्यांच्या ताब्यांत दोन किल्ले असून ते मजबूत होते. यामुळें त्यांस स्वसंरक्षणाची काळजी नव्हती. तथापि दिवसेंदिवस त्यांस कोंडलेली स्थिति प्राप्त होत होती. गडबडीमुळें वसूल नीटपणें येईनासा झाला होता. रघुनाथरावांस वस्त्रें मिळणें लांबणीवर पडलें. त्यास साताऱ्यास परत पाठविण्याविषयीं त्यांच्या वडिलाकडून वारंवार पत्रें येऊं लागलीं. शेवटीं मुलाची आई त्यास नेण्याकरितां बावड्यास येऊन तगाद्यास बसली.

यावेळीं विजयदुर्ग सुभ्यास गंगाधरपंत तात्या भानू या नांवाचे नाना फडणवीस यांचे पुतणे सुभेदार होते. बंडवाल्यांनीं त्यांस वश करून आपल्या कामांत पेशव्यांस गुंतविण्याचा विचार केला; आणि आपल्यां-

तील राघो केशव यास भानूकडे बोलणें करण्याकरितां पाठविलें. राघोपंतानें भानूशीं आग्रहपूर्वक असें बोलणें चालविलें कीं, त्यांनीं अमात्यांवर स्वारी करावी. तसें नच घडेल तर अमात्यांचा मुक्काम कोंकणांतून हालून वर घांटीं जाईल असें तरी करावें.*

भानू यांनीं अमात्यांस लिहिलें कीं, कारभारी यांजकडून बोलणें आलें आहे. त्याचा विचार होईतोंपर्यंत आपणांकडून त्यांस उपद्रव होऊं नये. त्यावरून अमात्यांनीं कोंकिसरें गांवीं तळ देऊन मुक्काम केला.

भानू यांजकडे बोलणें चाललें असतां कारभारीमंडळाचीं राघोपंताकडे जाणारीं पत्रें अमात्यांनीं मध्यें पकडून त्यासोबत आपलें पत्र देऊन तीं परभारें भानू यांजकडे पाठविलीं. त्यांतील तात्पर्यें खालीं दिलीं आहेत.

राघो केशव याच्या नांवें बाजी महादेव याचें पत्रः—

"शिवगडाहून बाबूराव याचें आणविलेलें पत्र सोबत आहे. तसेंच लक्ष्मणराव राणे याचें पत्रही सोबत आहे. हीं पत्रें तात्यांस (भानूस) दाखवावीं. (पेशव्यांच्या प्रदेशास उपद्रव देणारे) आमच्या निसबतीचे लोक सांपडले ह्मणतात. चौकशी करवावी, मध्यें तोतये उठतील. येथील साभिमान श्रीमंत नानांस आहे. त्यांच्या जागीं तात्या आहेत. तुह्मी गेल्यापासून शिवगड किंवा आह्माकडून स्वारी किंवा चोरी झाली नाहीं. आह्मास खष्ट करण्याचें किंवा कृपा करून रक्षिण्याचें यांतील आशय विचारून उत्तर लवकर यावें. तात्यांनीं या

---

* भानूस या कामांत हात घालितां यावा याकरितां बंडवाल्यांनीं स्वतः पेशव्यांच्या प्रदेशास उपद्रव देऊन त्याचें कर्तृत्व अमात्यांवर घालविण्याची तजवीज चालविली होती.

स्थलावर उपकार केल्यास व्यर्थ जाणार नाहींत यजमानास वर लावून द्यावें. कोकिसऱ्यांतील झाडून लोक काढवावे, पारपत्यें करवावीं. हें घडल्याशिवाय बखेडा मोडत नाहीं. तात्यांनीं आमच्यावर शब्द ठेविल्यास परिहाराचा उपाय काय आहे? परंतु ममतेच्यायोगें विनंति करण्यास हरकत नाहीं."

दुसरे पत्रांतील आशयः—

"यजमानांची स्थिति तात्याच्या लक्षांत आली असेल. प्रस्तुत त्यांस प्रांतांतून काढून कोकिसरें येथें लावून दिल्यानें आपल्यावरील निमित्त चुकविलें असें समजून स्वस्थ राहतील तर त्यांस एकांतीं समजून द्यावें कीं, आंग्र्याचें व यजमानांचें पाहिल्यापासून एकसूत आहे. त्यांकडील चोरट्यांस आयता सांठ होईल. साळशी महालचे सरदार यजमानांस मिळतील. कोकिसरें येथील मोर टेंकावर मेढा घालणार आहेत. लोक ठेवीत आहेत. तात्या आमच्यावरच पेंच आहे असें ह्मणतील. त्यास आमचीं खेडीं उजाड झालींच आहेत. तात्यांस समजून द्यावें कीं, अनावर होतील आणि पुढें त्यांसच [ तात्यांस ] जड जाईल. महाराजांनीं कृपा केली असतां त्यांच्या प्रांतास उपद्रव दिला. त्यांस संकट पडलें आहे कीं, स्वारी करावी तर लाख रुपयांच्या खर्चाखालीं यावें, असें आहे. याकरितां कोंवळें आहे तोंच मोडून काढावें".

या पत्रांसोबत सुबराव अमात्य यांनीं भानूंस लिहिलेल्या पत्रांतील तात्पर्यः—"मौजे नादगांवीं इकडील धोंडोपाध्ये गुर्जर यांनीं आपलीं मुलेंमाणसें सदाशिवपंताच्या घरीं ठेवून आपण आमचेकडे आले. या द्वेषानें शिवगडाहून शमनखान याजबरोबर लोक देऊन उभयतांचीं घरें लुटून नेलीं. त्या ठिकाणीं आपला ( भानूचा ) वरातदार होता. त्यानें आपली ( भानूची ) दुराई दिली असतां त्यास ठार मारिला.

हरूलांत रावराण्यांनी मुलेंमाणसें ठेविलीं. त्याजवर गेले असतां रावांनीं पिटाळून लाविले. त्यापूर्वी तरलेत-बंडवाल्यांचे लोक आढळले असतां आपल्याकडून कांहीं (स्वारी किंवा चोरी) झाली नसल्याचें शिवगडाहून चिठी लिहून आणवून ती राघोपंताकडे पाठविली आहे. याची चौकशी खातरदास्त व्हावी.

खालीं स्वारी झाली ह्मणून घेऱ्यांतील गांवगन्नाचे लोक भेटीस आले. त्यांस कौल देऊन गांवांची लावणी केली. या द्वेषानें मांगवली, तिथवली, कुसुरवाडी, नापणें, नाधवडें, कोकिसरें, मठ वगैरे गांवांतील रयतेचीं, चाकरमाणसें यांचीं घरें जाळिलीं. हें वृत्त परस्परें कळलें असेल, असें असतां गांवें उजाड कोणीं केलीं? शेणवी यांनीं राजमंडळांत नारबा भोये [ भोपे ] मध्यस्त केले. मुळचें सत्कर्म यांत वचन निर्धार—वाईट कर्म व वचनाचा खोटा-यामुळें बंदींत पडला. शेणव्याचे विश्वासाबद्दल--[ अविश्वासाबद्दल ] धनी यांची खातरी झाल्यामुळें नारबास [ शेणव्यांपैकीं एक ] मुलांमाणसांसहित बंदींत घातलें. असें असतां तुमचें चित्त वळविण्याकरितां मन मानेल तशी धन्याकडील हकीगत लिहिली आहे. परंतु जाणत्याजवळ असलें गारूड चालावयाचें नाहीं. धन्याचीं आज्ञापत्रें कशीं येतात, त्यांची आज्ञांवर कशी ममता आहे, हें राघोपंतासदेखील माहित आहे. आपण याविषयीं चांगला तपास करावा.

लक्ष्मणराव राणे पुरातन पदरचे वतनदार असतां आणि एक कोसावर मुक्काम असतां त्यांस भेट, निरोप किंवा पत्र यांपैकीं कांहीं अनुकूल पडलें नाहीं. शेणवी याजकडे ममता विशेष. सामोपचारानें बोलावून आणिलें. सेवेची निखालसता दाखवून निवून गेले. काडीमात्र उपद्रव नसतां बाडबिछाईत घेऊन वाघेरींत जाऊन राहिले; आणि बात्रड्यास

पत्र कोणे रीतीचें लिहिलें आहे तें पाहून भले लोकांची रीति समजण्यांत यावी.

आह्मांकडील सदाशिव लक्ष्मण कारकून यांनीं पुण्याहून पत्रें पाठविलेलीं राघोपंतानें पाहिलीं आहेत. तसेंच इकडील पुण्याचे वकील भास्करपंत यांचीं पत्रें आपल्यास आलीं आहेत त्यावरून इकडील कार्यसिद्धीचें यश श्री आपणास देईल. हें समजून शेणव्यांनीं आपल्या पत्रांत स्वतःच्या साधनसंपत्तीचा प्रकार लिहिला आहे. कोणाच्या भिडेनें कागद येतो. त्याची नक्कल, आफद, पाहिजे तशा सोईच्या पद्धतीनें रुढवावयास जाणते आहेत, कर्णीकनीतिनिपुण आहेत. समजणेंत यावें.

तेथें आलेला कारकून राघोपंत त्या सांप्रदायांतील आहे. मनस्वी बोलेल. त्याची पैरवी होऊन नंतर उत्तरें व्हावीं. कल्पीत साधनें तयार केलीं आहेत. परभारें तपासाअंतीं खात्री होईल. तीन पिढ्या अन्न भक्षिलें. त्या धन्याशीं बेमान झाल्यानें परमेश्वर शासन करीतच आहे.

अमात्य कोंकणांत असतां कारभाऱ्यांनीं रघुनाथरावास वस्त्रें मिळून मालक करण्याबद्दल आपल्या ह्मणण्याची एक यादी महाराजांकडे गुदरली. ती महाराजांनीं मंजूर केलेली दिसते. त्यांतील कलमें पुढीलप्रमाणें आहेत.—

तारीख २२ जुलई सन १७८६.

१ साळवणचा वेढा उठवून लोक घेऊन जावे.

१ नजर, दुस्त, दरबारखर्च वीस हजार राजश्री नाईक याच्या विद्यमानें घ्यावे.

१ राजश्री सुबराव पंडित यांनीं हुजूर रहावें. पंडित मशारनिल्हे याजकडून गगनगडतर्फेत व तनख्यांत उपद्रव न व्हावा येविशींचा बंदोबस्त व्हावा.

१ राजश्री सुबराव पंडिस यांनीं हुजूर रहावें. त्यांस खर्चास सालिना पांच हजार द्यावे. त्यांचा सरंजाम राशिवडेंविरहित गांव नेमून देऊन ऐवज पुरवणी करून द्यावा.

१ चिटको महादेव याचीं मुलेंमाणसें रवाना करून द्यावीं.

१ राजश्री रघुनाथराव यांचा बहुमान पद्धतीप्रमाणें व्हावा.

१ अर्जोजीराव राणे व सुर्वे वगैरे चोर प्रांतांत घातले त्यांचा बंदोबस्त हुजुरोन व्हावा.

१ राजश्री नाईक व सरखवास, अप्पा व जोशीराव यांनीं बावड्यास येऊन रघुनाथराव यास घेऊन जावें आणि वस्त्रें हुजुरोन देऊन सन्मानानें माघारे स्थळास रवानगी व्हावी व सुबराव पंडित यांच्या ओटींत घालून अमात्यपदाचीं वस्त्रें होऊन किल्लारवानगी व्हावी.

१ श्रीमन्महाराजा मातोश्री आईसाहेब कैलासवासी यांच्या कारकीर्दीस बाबती व खेडीं, वतनें वगैरे अम्मल चालत होता त्याप्रमाणें चालवावा.

१ गांवगन्नांची यादी दिली आहे त्याप्रमाणें ताकिदी मिळाव्या.

१ सेवकाच्या चित्तांत कल्पना आली यास्तव हुजुरून भयनिवारणार्थ आज्ञा करून पाठवावे. ते—

१ सरखवास याचे पुत्र. १ हिंमतबहादराचे पुत्र.
१ सर्जाराव घाटगे. १ नारायणराव पाटणकर.

याप्रमाणें यादी मंजूर असून तींतील ठरावांचा अम्मल झाला नाहीं. पुढें कांहीं कालानें रघुनाथराव मृत्यु पावला.

नंतर पुढें कारभारीमंडळानें रघुनाथरावाचा धाकटा बंधू पुरुषोत्तमराव यास गादीकरितां तयार केला; परंतु कारभाऱ्यांच्या अमात्यांविरुद्ध असलेल्या तक्रारी खोडसाळपणाच्या व महत्वाकांक्षेमुळें उत्पन्न झालेल्या आहेत अशी महाराजांची दिवसेंदिवस खात्री होत चालल्यामुळें, पुरुषोत्तमरावास वस्त्रें मिळण्याचें काम साध्य होईनासें झालें. हा पुरुषोत्तमरावही नंतर ३।४ वर्षांनीं मृत्यु पावला.

अमात्यांनीं संस्थान सोडिल्यापासून त्यांस अनुकूल असणारे व अनुकूल होतील असें वाटणारे कित्येक लोक कारभारीमंडळीनें अधिकारावरून काढून टाकिले.

त्यांत इ० स० १७८६ जुलई तारीख २१ ला शिवगडचे जुने हवालदार यांस काढून त्याच्या जागीं हणमंतराव पडवळ यांस हवलदार केलें. तसेंच अमात्यांस अनुकूल असणाऱ्या लोकांवर मारेकरी व लुटारू यांच्या टोळ्या नेमिल्या. त्यांनीं अर्जोजीराव राणे यांस ठार मारिलें. जामदार याच्या कुटुंबाच्या मंडळींचा नाश तिरवड्याच्या खिंडींत केला. याप्रमाणें पुष्कळ लोकांचे जीव निरनिराळ्या ठिकाणीं व वेळीं अपघातानें घेतले. कित्येकांचीं घरें लुटलीं गेलीं व जाळलीं गेलीं; व सुबराव अमात्य यांस मारण्यास मारेकरी तयार केलेले असून ते मारण्याची संधि पहात होते.

सुबराव यांच्या संरक्षणाकरितां नाधवडें येथील सरदार व त्यांचे विश्वासू असे पंचवीस लोक नेहमीं सुबरावानजीक असत. तसेंच अनुकूल असणारे रावराणे यांपैकींही कांहीं लोक नेहमीं नजीक असत.

सुबराव यांच्याजवळ किल्ले घेण्यास पुरेसें लष्कर नव्हतें. तथापि प्रांताचा बंदोबस्त व बंडखोरांपासून बचाव होण्यास पुरें पडेल इतकें लष्कर तयार होतें व तें वाढविण्याची त्यांची तजवीज सुरू होती. इ० स० १७९०त पेशव्यांची मदत मिळवून, किल्ले घेऊन बंडवाल्यांचें पारिपत्य करण्याकरितां तीस हजार रुपये कर्ज काढिल्याचा दाखला आहे. याशिवाय पुरेशा लष्कराकरितां आणखी रक्कम जमा केली असावी असें इतर कागदांवरून दिसतें. असें चाललें असतां इ० स० १७९१ नवंबरांत महाराजांकडे गगनगडच्या कामगारांकडून बोलणें आलें कीं, आह्मीं बदलून अमात्यांस खालीं घालविलें, व आज सहा वर्षे मवास होऊन राहिलों; ही आमची चूक झाली. किल्ला सरकारांनीं घेऊन सेवक लोकांचा अपराध माफ करावा; कुटुंबांचें संरक्षण करावें; आणि सेवाचाकरी घ्यावी. नंतर गुजाजीराव गाईकवाड सरखवास यांच्या विद्यमानें बोलणें ठरविलें, आणि मशार-निल्हे सरखवास आणि नारायण-राव पाटणकर सरलष्कर या उभयतांस जामीन घेऊन सदरहूअन्वयें बोलण्याचा ठराव झाला, आणि महाराज सरकारची स्वारी बावडे किल्ल्यास जाऊन पोहोंचली. तेव्हां गडकरी आणि हवालदार यांनीं महाराजांस आणि प्रीतिराव चव्हाण व सरलष्कर व रत्नाकर पंडित राजाज्ञ यांस दिंडींतून किल्ल्यांत घेतलें व बाकीची मंडळी व फौज खालीं राहिली. महाराजांची स्वारी करविराहून निघाली तेव्हांच सुबराव पंडित अमात्य यांस सांडणीस्वाराबरोबर आज्ञापत्र पाठविलें होतें कीं, "बावडेकर कामदार यांचें बोलणें ठरल्यावरून स्वारी बावड्यास निघाली आहे. तरी तुह्मीं राशिवड्याहून निघून जलद बावड्यास यावें." याप्रमाणें पंत अमात्यही स्वारींत येऊन मिळाले. स्वारी गडावर जाऊन गडकरी व हवालदार यांची खात्री केल्यावर त्यांनीं किल्ला स्वाधीन केला, आणि किल्ल्याचा दरवाजा उघडून तोफा उडविल्या. तेव्हां सरदार

व फौज वर आली. त्याबरोबर अमात्यही वर आले. त्यांस पहातांच महाराजांची मर्जी सुप्रसन्न झाली आणि अमात्यांस आज्ञा केली कीं, आपला किल्ला आपल्या स्वाधीन करून घ्यावा. तुमच्या पेंचांतून श्री अंबाबाईनें आम्हांस काढिलें. याप्रमाणें किल्ला अमात्यांच्या स्वाधीन करून स्वारी खालीं पेठेंत आली. तेव्हां अमात्यांनीं येथें ताटें व्हावीं अशी विनंति केली; परंतु प्रस्तुतच्या प्रसंगीं येथें राहणें बरोबर नाहीं करितां ताटास रहावयाचें नाहीं, असें महाराजांनीं सांगितलें. यावेळीं रत्नाकरपंतांनीं अमात्यांस विचारिलें कीं, महाराजसरकारांनीं कृपाळू होऊन किल्ला आपल्या स्वाधीन केला, सबब महाराजांस आपण नजर काय केली हें समजलें नाहीं. त्याजवरून पंडित अमात्यांनीं उत्तर केलें कीं, किल्ला व सर्व दौलत महाराजांचीच आहे; मी सेवक आहें, त्यापेक्षां धन्यास मी काय द्यावें? तथापि आपण प्रश्न केला त्यास आपलेकडे पावनगड आहे. त्या तनख्यांत आमचा सालाबादचा ऐवज येणें तो आपणास माफ करून देतों, तो आपण घ्यावा. असें बोलून किल्ले मजकूरच्या तनख्यांतील बाबतीच्या ऐवजाचीं माफीपत्रें राजाज्ञाच्या नांवचीं करून दिलीं. त्याप्रमाणें पावनगड राजाज्ञ यांजकडे होता, तोंपर्यंत बाबतीचा ऐवज घेत होते. पुढें किल्ला महाराजांकडे गेल्यापासून तो महाराजांकडे जाऊं लागला. याचवेळीं देवघराकडील पिशवी गांवची बाबत अमात्यांनीं माफ केली.

या वेळीं महाराजांनीं अमात्यांस आज्ञापत्र दिलें कीं, तुमचा सरंजाम व किल्ले पूर्ववत् तुमच्या स्वाधीन केले आहेत. तुमच्याविषयीं कोणी गैरवांका समजावील तर तो मनास आणणार नाहीं.

या बंडांतील प्रमुख पुढारी सुकठाणेकर ऊर्फ बावडेकर हे किल्ला स्वाधीन करण्यापूर्वी महाराजांचे अभयवचन घेऊन त्यांच्या स्वारीबरोबर कुटुंबासह करविरीं गेले.

यानंतर अमात्यांनीं बंडांतील दुसरे पुढारी बंडवाले शेणवी फडणीस याचे डोळे काढून त्यास साळवण येथें प्रतिबंधांत ठेविलें. बाकीच्या बंडवाल्यांपैकीं कोणास कैद, कोणास हद्दपारी, कोणास नौकरींतून काढून टाकणें अशा निरनिराळ्या शिक्षा दिल्या. गगनगडचे हवलदार सुरवशी यास कमी करून महाराजांच्या मर्जीतील खोपडे यास हवालदार केलें. येसाजी व रघोजी शिरसाट यांनीं बंडवाल्यांकडून इ० स० १७९० त आखवणे गांवची खोती मिळविलेली रद्द केली. याप्रमाणें या बंडासंबंधीं सर्व बखेडा मोडून टाकिला.

इ० स० १७९१–९२ सालीं अमात्यांनीं मुरादपूर हा गांव बच्चाजी बल्लाळ माहुलगेकर यास इनाम दिला.

अमात्य इ० स० १७९२ त महाराजांच्या स्वारीबरोबर तुळजापुरास श्री भवानीच्या दर्शनास गेले होते.

याच सालीं अमात्यांच्या पूर्व घरचे बंधु भास्करराव यास महाराजांनीं कोल्हापूरचे सचीव केले; आणि तसें केल्याचें आज्ञापत्र अमात्यांकडे पाठविलें.

अमात्य दिवसेंदिवस महाराजांस प्रिय वाटूं लागले आणि त्याचें पूर्ण चिन्ह असें महाराज अमात्यांस " चिरंजीव " या मायन्यानें आज्ञापत्रें पाठवूं लागले.

अमात्यांचें आरमार मालवण बंदरीं असे. त्यावरील अम्मलदार व तेथील महाराजांचे आरमारी अम्मलदार यांजमध्यें वारंवार कटकटी होत असत. त्याच्या बंदोबस्ताकरितां अमात्यांनीं इ० स० १७९३ त महाराजांकडून मालवणच्या त्यांच्या आरमारास एक आज्ञापत्र घेतलें कीं, अमात्यांचें आरमार सर्जा कोटानजीक नस्तावर येऊन राहील त्यास

जागा द्यावी आणि स्वामिकार्याविषयीं तुह्मीं व ते एकविचारें चालावें. जंजिरेच्या आरमाराबरोबर अगर पृथक त्याचे आरमार स्वारीस जाईल, त्यास जाऊं द्यावें आणि तुमच्या बंदरीं माल उतरतील त्यास जकातीविषयीं व हरएकविषयीं अडथळा करूं नये.

याप्रमाणें अमात्यांनीं तंटा न होण्याचा बंदोबस्त करून आपल्या झुजत्या व सावकारी आरमारावर गोपाळ रामजी नाईक यास सरदार नेमिलें. नाईक यांनीं इंग्रज, पेशवे व आंग्रे यांच्या जहाजांस उपद्रव न देतां राजकोटच्या बंदरावर स्वारी करावी व बेकौली जहाजास पकडावें. आणि स्वारी करून जी प्राप्ति होईल त्यांतील चौथाई सरकारांत द्यावी. बाकीपैकीं खर्च वजा जातां शिल्लक राहील तीही सरकारांत द्यावी. ही सर्व व्यवस्था सरकारांतून कारकून हुजरे असतील त्यांच्या विद्यमानें करावी, इत्यादि नियम करून देऊन व्यवस्था लावून दिली.

याच सालच्या अकटंबरच्या २५ तारखेस महाराजांनीं अमात्यांस मोठ्या जरूरीनें बोलावून स्वारींत नेलें. कारण प्रसिद्ध नाहीं; तथापि पटवर्धन यांशीं पुढें थोड्या दिवसांत जी लढाई झाली, त्यासंबंधीं कांहीं काम असावें असें दिसतें.

पुढें दिजंबर तारीख १४।१५ चीं आज्ञापत्रें कीं, रामचंद्रराव पटवर्धन स्वारी करून कृष्णा उतरून उदगांवच्या सुमारास आले. तुह्मीं गगनगड, साळवण व तुमच्याबरोबरचे लोक आणि तत्काळ मिळणारे लोक यांसह ताबडतोब निघून यावें.

यावरून अमात्य आपल्या फौजेसह महाराजांस जाऊन मिळाले. पटवर्धन व महाराज यांजमध्यें अळतें मुक्कामीं लढाई झाली. या लढाईंत अमात्यांनीं आपली कामगिरी मोठ्या शौर्यानें बजाविली. या लढाई-

विषयीं एक पोवाडा झालेला असून त्यांत अमात्यांच्या शौर्याचें वर्णन कवीनें मोठ्या मार्मिक रीतीनें केलेलें आहे.

इ० स० १७९६ त महाराजांच्या कर्नाटकांत स्वाऱ्या झाल्या. त्यांत अमात्य आपल्या फौजेसह रत्नाकर पंडित राजाज्ञ यांच्याशीं मिळून मुलूख जिंकणें, खंडण्या घेणें वगैरे कामें करीत होते. यांच्या या सेवेनें महाराजांस संतोष होऊन अमात्यांकडे आज्ञापत्र आलें कीं, तुह्मीं एकनिष्ठपणें सेवा करून कृपेस पात्र झाला आहात. [ इ० स० १७९६ ].

इ० स० १७९७ नवंबरचें आज्ञापत्र कीं, यशवंतराव घाटगे सर्जाराव यास काजकामाची आज्ञा होऊन रवाना होऊन गेले आहेत. त्यास तुह्मीं फौजेसह जाऊन मिळावें, व एकविचारें सरकार काजकामें करावीं. चिकोडी तालुक्याच्या वगैरे बाबतीच्या सनदा दिल्या आहेत. त्याप्रमाणें ऐवज वसूल करून घ्यावा. तेरणीचें ठाणें घालून आपल्याकडे देणेंविषयीं सर्जाराव यास आज्ञापत्र सादर झालें आहे. येतेवेळीं ठाणें बसवून देतील. तेथें आपलें ठाणें घालावें.

अमात्यांनीं महाराजांकडे विनंतिपत्र पाठविल्याची अर्धीच नक्कल मिळाली आहे. ती अशी:--" स्वामींनीं कृपाळू होऊन आज्ञापत्र सादर जालें. तें मस्तकीं वंदून सनाथ झालों. तेथें आज्ञेनें राजश्री चतुरसिंगराव भोसले व आपण फौजेसुद्धां ठाणें बागेवाडीच्या सुमारें येणें ह्मणोन आज्ञा. अशास बोरगांवच्या मुक्कामाहून चतुरसिंगराव फौजेसुद्धां कुच करून देवरअष्ट्यावर गेले. इकडील फौजेसुद्धां कुच करून हल्लीं कसबा वडगांव येथें मुक्काम आहे. त्यास पुढील कर्तव्य आणि परिणाम लक्षांत येऊन आज्ञा व्हावी. त्याप्रमाणें सेवक वर्तणूक करील. पुण्यशील" (यापुढील नक्कल मिळाली नाहीं).

वरील पत्रांत सन दिलेला नाहीं तथापि मजकुरावरून इ० स० १७९७ ते १७९९ त प्रख्यात शूर जो चतराशिंगराव याचें पेशव्या

विरुद्ध बंड व त्यांच्या मदतीस कोल्हापूरच्या राजाकडून सुबराव अमात्य असून सदरचें पत्र इ० स० १७९८ तील असावें.

इ० स० १७९९ च्या नवंबरांत रामचंद्रराव पटवर्धनांनीं कोल्हापूर प्रांतावर स्वारी केली. यावेळीं अमात्य कोंकणांत आपल्या स्वतःच्या प्रदेशाचे संरक्षणार्थ लढत होते. याकरितां त्यांस स्वतः जातीनें महाराजांच्या मदतीस येतां आलें नाहीं; परंतु त्यांनीं आपली बहुतेक फौज मदतीकरितां पाठविली. त्या फोजेनें राजाज्ञांच्या हाताखालीं राहून या लढाईचें काम केलें.

इ० स० १७९९।१८०० विजयदुर्गचा सुभेदार आनंदराव धुळप यानीं अमात्यांच्या प्रदेशावर स्वारी करून गगनगडच्या घेऱ्यांतील गांवगन्नाच्या खंडण्या घेतल्या आणि गगनगड घेण्याकरितां फौज पाठविली. हें वर्तमान अमात्यांस समजतांच त्यांनीं आपल्या फौजेंतील कांहीं लोक निवडून त्यांच्या लहान लहान टोळ्या करून त्या घाटांतील झाडींत रस्त्याच्या दोहों बाजूंनें पसरून ठेविल्या.

या टोळ्यांनीं शत्रूचे लोक घाट चढत असतां त्यांजवर झाडींतून मारा केला. शत्रूस आपल्यावर होणारा हल्ला कोठून होतो, हें समजत नसे. याप्रमाणें कांहीं लोक जरी वरवर चढत गेले तरी त्यांजवरील मारा चुकेना. तेव्हां शत्रूचे लोक निरुपायानें मागें परतले आणि भुइबावडा गांवीं तळ देऊन राहिले. नंतर अमात्यांनीं भुइबावडा येथें शत्रूच्या लोकांवर हल्ला करून त्यांस तेथून हांकून लाविलें व कांहीं वेळ त्यांचा पाठलाग करवून आपण बावड्यास परत आले.

या लढाईंत आपल्याकडील पडलेले गुणाजी पाटेकर वगैरे लोकांच्या कुटुंबास इनामें दिलीं.

यापुढें अमात्य आपल्या लष्कराची चांगली तयारी करून धुळपाच्या पारिपत्याकरितां कोंकणांत उतरले. साळशी महालांतील गांवगन्नांचा व सरदेशमुखी वगैरेचा वसूल धुळपाचे लोक जबरीनें घेऊन तिकडे ते दंगा करीत होते. त्याच्या बंदोबस्तासाठीं अमात्यांनीं आपल्या फौजेची एक टोळी तिकडे पाठविली; आणि आपण विजयदुर्ग सुभ्यांतील गांवगन्नाच्या खंडण्या घेऊन खारेपाटणच्या गढीस वेढा दिला, व हल्ला करून गढी घेतली. तेथून राजापुरास जाऊन तेथील पेठ लुटली, आणि लढून तें ठाणें घेतलें. खारेपाटण व राजापूर येथें मिळालेल्या तोफा व जखिरा गगनगडास पाठवून दिल्या. राजापूरच्या लुटींत अमात्यांशीं स्नेहानें वागणारे सापळे आदीकरून कित्येक व्यापाऱ्यांची लूट झाली नाहीं.

याप्रमाणें अमात्यांनीं कोंकणांत पेशव्यांच्या प्रदेशास उपद्रव मांडिला असून त्यांचा सरदार धुळप याच्या हातून त्याचा बंदोबस्त होईना. ही बातमी पुण्यास पेशव्यांस समजतांच त्यांनीं त्याचा बंदोबस्त होण्यासाठीं कोल्हापूरच्या महाराजांकडे लिहिलें.

इ० स० १८०० ता० १४ दिजंबरचें महाराजांचें आज्ञापत्र अमात्यांस आलें कीं, तुह्मीं पेशव्यांच्या प्रांतास उपद्रव न देतां घांटमाथा हुजूर यावें. खारेपाटणची गढी तूर्त हैबतराव गाइकवाड विश्वासराव याच्या लोकांच्या स्वाधीन करावी. त्याजबद्दलचा विचार मागाहून होईल.

आज्ञापत्र येतांच अमात्य गाइकवाडाच्या लोकांच्या स्वाधीन गढी करून महाराजांच्या भेटीस करविरीं गेले.

गाईकवाडांनीं धुळपास लिहिलें कीं, पेशव्यांकडून महाराजांकडे बोलणें आल्यावरून सरकारच्या हुकमावरून गढी आमच्या स्वाधीन

झाली आहे. याकरितां तुमच्याकडून अमात्यांच्या प्रांतास सिलसिला न होतां पूर्वी चालत आल्याप्रमाणें सुधामत चालावें. आज्ञापत्र होतांच गढी आपल्या ताब्यांत करण्यांत येईल.

सदर बाबतींत अमात्य व धुळप यांमध्यें पुढें दिल्याप्रमाणें करार ठरून हें प्रकरण शेवटास गेलें.

१ एकमेकांचे लोक एकमेकांकडे अटकेंत असतील, त्यांस कोणतीही अट न लावितां परस्परांनीं सोडून द्यावें.

१ या लढाईसंबंधीं अपराधी सांपडतील, ते ज्याचे त्याजकडे पाठवावे. त्यांची चौकशी ज्याचे लोक त्यानें करावी.

१ एकमेकांनीं एकमेकांच्या प्रांतांतील घेतलेली खंडणी मागूं नये. खंडणीचे कतबे घेतलेले असतील ते परस्परांकडे द्यावे. त्याजबद्दल आतां कांहीं मागूं नये.

१ यापुढें एकमेकांच्या अपराध्यांस परस्परांकडे द्यावें. त्यांस आश्रय देऊं नये.

१ खारेपाटण व राजापूर येथील नेलेल्या तोफा व जखिरा अमात्यांनीं परत द्याव्या.

---

इ० स० १८०० त अमात्यांनीं घेतलेल्या कर्जाबद्दल लक्ष्मणराव व्यंकटेश यांस नापणें गांव खरेदी दिला.

इ० स० १८०१ त महाराजांनीं अमात्यांस करविरीं बोलावून नेलें होतें. कारण उपलब्ध नाहीं.

इ० स० १८०२ त महाराजांचें आज्ञापत्र कीं, बाजीराव पंडित प्रधान यांचे लोक कोंकणांतून करविराकडे येतील. त्यांस येऊं द्यावें.

इ० स० १८०२ दिजंबर तारीख १२ चें महाराजांचें आज्ञापत्र कीं:— राजेश्री चिटको महादेव यानें नादगांवीं येऊन तुम्हांकडील

इनाम गांव व इनामदार यांस उपद्रव देऊन खटला आरंभिला आहे, ह्मणोन लिहिलें. त्यावरून त्यास खटला न करण्याविषयीं व शिदरामराव भोंसले जंजीरे सिंधूदुर्ग यास व रामप्रभू ह्वालदार कसबा आचरें यास खटला पडूं न देतां लोक उठवून लावून देण्याविषयीं आज्ञापत्रें सादर झालीं आहेत. आपण तूर्त तिकडील बंदोबस्तास कोणी ठेवून खटला न वाढवितां सत्वर हुजूर यावें. सध्यां घाटाखालीं खटला करण्याचें कारण नाहीं. चिटको महादेव उठून न गेल्यास त्याविषयींचा बंदोबस्त हुजूरनें करविला जाईल. आज्ञेप्रमाणें महादाजी शेषाद्री सांगतील.

इ० स० १८०२ त गण सांवत भोसले, कृष्ण सांवत व त्यांचे वडील लखम सांवत असरूडकर यांस त्यांनीं निरनिराळ्या लढायांत उत्तम शौर्य दाखविल्याबद्दल अमात्यांनीं मोठमोठीं बक्षिसें देऊन संतुष्ट केलें. हें शेंदोनशें लोकांसह अमात्यांकडे नेहेमीं सेवेस असत.

इ० स० १८०३ त मथुरागिरी गोसावी हे पूर्वीं अमात्यांच्या उपयोगीं पडल्यामुळें अमात्यांनीं त्यांस मांढरें गांव इनाम दिला.

इ० स० १८०५ त वाडीकर सावंतांनीं अमात्यांच्या साळशी महालावर लोक पाठविले. तेथें त्यांची व अमात्यांच्या लोकांची लढाई झाली. अमात्यांच्या लोकांनीं त्यांचा पराभव करून त्यांस महालांतून हांकवून लाविलें. या लढाईत अमात्यांकडील महादाजी शेषाद्री कुलकर्णी, भिकाजी शिंगरा, बाळलिंग इलकर वगैरे पुष्कळ लोक पडले.

इ० स० १८०७ जानेवारी तारीख ७ चें आज्ञापत्र कीः— हुजूरची खासा स्वारी आजरोजीं प्रातःकाळीं पाटगांवाहून निघून

सायंकाळीं किल्ले भूधरगडास दाखल झाली. पलटणें चिकोडीच्या मार्गानें येडूर मांजरीकडे गेलीं.

इ० स० १८०७ जुलई तारीख ९:—निपाणीकर देसाई कोल्हापूर प्रांतास उपद्रव देत होते. त्याच्या बंदोबस्तासाठीं महाराजांचे निरनिराळे सरदार झटत होते. अमात्यांची फौज हैबतराव गायकवाड यांच्या हाताखालीं राहून वरील कामगिरी करीत होती.

इ० स० १८०८ त महाराज व निपाणीकर यांमध्यें सांवगांव येथें लढाई झाली. यांत अमात्य आपल्या फौजेसह महाराजांच्या वतीनें लढत होते. या लढाईत अमात्यांचे शूर सरदार राजसावंत यास भाल्याच्या व तरवारीच्या जबर जखमा झाल्या.

इ० स० १८०९ त अमात्यांनीं आपला रावजी दामोधर नांवाचा वकील पुण्याच्या दरबारीं पाठविला. त्यानें करावयाच्या कामाची यादी व तेथील मुत्सद्यांस पाठविलेल्या पत्रांतील मुद्यांचें तात्पर्य खालीं लिहिल्याप्रमाणें होतें.

राजमंडळसंबंधीं.

निपाणीकर यांनीं महाल व किल्ले घेतलेले आणि चीजवस्त नेलेली परत देवावी.

राजमंडळचा कारभार आमचे हातून चालावा. पुण्यांत आमच्या-शिवाय दुसऱ्यांशीं त्याविषयीं बोलणें होऊं नये.

सावंताचे वाडीसंबंधीं.

निपाणीकरांनीं ठाणीं घालून किल्ले घेतले आहेत. सावंताचें मूल ठार मारिलें आहे. हल्लीं बाई आणि तिजकडील कारभारी कैद केले आहेत. त्यास निपाणीकरांस ताकीद होऊन ठाणीं, किल्ले, बाई व

कारभारी यांस सोडून आमच्या स्वाधीन करावे, आणि निपाणीकरांनीं फौजेसुद्धां प्रांतांतून निघून जावें.

### कऱ्हाडकर प्रतिनिधिविषयीं.

प्रतिनिधि आपल्या कैदेंत आहेत त्यांस सोडून देण्याविषयीं बोलणें व्हावें.

---

याशिवाय दरबारखर्च, सावकारी कर्ज वगैरेविषयींचीं बोलणीं होतीं.

इ० स० १८९० त अमात्यांनीं कुर्लीच्या चौकीनजीक एक नवीं पेठ वसविली.

महाराजांनीं आपल्या शिद्दी शिपायांच्या पगाराची दहाहजार रुपयांची वरात अमात्यांवर दिली. ते रुपये आणण्याकरितां १०० शिद्दी शिपाई कोल्हापुराहून बावड्यास येण्यास निघाले. अमात्यांस वरातीची वगैरे कांहीं माहिती नव्हती. त्यांस वर्दी आली कीं, कोल्हापुराहून लष्कर बावड्यास निघालें. ही बातमी सायंकाळच्या प्रहर दिवसास अमात्यांस समजली. त्यांनीं तत्काळ ठाणें राशिवडें व साळवण येथें बंदोबस्ताबद्दल लिहून मंदतीस लोक पाठविले आणि तेथील कामगारांस लिहिलें कीं, हे लोक कां येतात. आणखी मागाहून लोक येणार आहेत काय? याची बातमी काढून हरघडी कळवावी.

दाखल ता० इ० स० १८१० मे ता० १८ सायंकाळ प्रहर दिवस.

इ० स० १८१० सप्टंबरांत पुण्याहून सदाशिव माणकेश्वर यांनीं विजयदुर्गचे सुभेदार नारोपंत आवटी याच्या लिहिण्यावरून अमात्यांस लिहून पाठविलें कीं, बाबाजी दुधवडेकर हा लोकसुद्धां गगनगडच्या माचीस राहून प्रांतांत लुटालूट करून मनस्वी उपद्रव देत आहे.

त्याचा बंदोबस्त करावा. बंड लहान आहे तोंच मोडिलें असतां पुढें जड जात नाहीं. दुधवडेकर आपल्या हुकमतींत आहे किंवा नाहीं, तें कळवावें.

बाबुराव आंग्रे सवाई सरखेल याजकडून अमात्यांस एक पत्र आलेलें आहे. त्यांत सन दिलेला नाहीं; व कोणती मसलत होती त्याचाही उल्लेख नाहीं. तथापि त्यावरून असें दिसतें कीं, महाराजांनीं कोंकणांत कांहीं उलाढाल करण्याचें मनांत आणून त्या कामीं अमात्यांस आंग्र्यांशीं बोलणें करण्याची आज्ञा केली होती. त्यावरून अमात्यांनीं सरखेल यांजकडे लिहून सरखेल याचें उत्तर आणविलेलें पुढीलप्रमाणें होतें :—"तुह्मीं लिहिलें कीं, इकडून हुजूरच्या आज्ञेवरून राजेश्री लक्ष्मण विठ्ठल व धोंडो बाबाजी यास कित्येक बोलणें समक्ष बोलून पाठविले आहेत. मशारनिल्हे बोलतील तें लक्षांत येऊन हुजूरच्या लक्षानुरूप कार्यभाग घडून यावा. परंपरागत तुमचा आमचा घरोबा, यांत विस्मरण न होतां पूर्व वहिवाटीप्रमाणें लक्ष्य कायम असावें. त्यास उभयतांनीं मजकूर सांगितला त्याचीं उत्तरें त्याजपाशीं समक्ष बोलण्यांत आलीं आहेत. मशारनिल्हे बोलतील त्याअन्वयें हुजूर विनंति करावी. त्याप्रमाणें घडोन यावें. छ २५ जिलकाद."

या अमात्यांनीं बावडा येथें नाणें पाडण्याची एक टांकसाळ स्थापन केली होती. तींतून दरसाल दोन तीन लक्ष रुपयांचें नाणें तयार होत असे. ही टांकसाळ १५।२० वर्षें चालू होती. पुढें महाराजांच्या हुकुमानें ती बंद झाली. यांत महाराजांच्या पन्हाळी नाण्याबरोबरीच्या वजनानें आणि आकारानें नाणें पडत असे.

सुबराव हे इ० स० १८१० सालीं मृत्यु पावले. यांनीं एकंदर ४८ वर्षें अमात्यपदाचा उपभोग घेतला. यांस झालेली संतति

अल्पवयी मृत्यु पावली. हा पुरुष निर्मळ अंतःकरणाचा शिपाई होता. यांची आकृति भव्य, हाडगांत मोठें व बळकट असें होतें.

यांनीं लष्कर फार बाळगिल्यामुळें यांस वारंवार खर्चाची फार अडचण पडत असे. यांच्या लष्करांत अरब, रजपूत, मावळे या लोकांचा भरणा फार होता. हे नेहमीं ह्मणत कीं, माझी संपत्ति काय ती गुणी माणसें होत. यांनीं महाराजांकडून आपणांस "चिरंजीव" हा मायना मिळविला. यांनीं गगनगडच्या तटाची दुरुस्ती केली. पाऊण लक्ष रुपये खर्चून गडावर एक पिराचा दर्गा बांधिला.

यांनीं आपल्या कामगारांस व्यवस्था ठेवण्याविषयीं यादी पाठविल्यांतील कलमें पुढें दिल्याप्रमाणें आहेत.

१ किल्लयाची चौकशी रोजच्या रोज करीत जावी.

१ किल्ला, शिवगड, ठाणें साळवण येथें दारूगोळी व धान्य यांचा संग्रह सतत असावा.

१ अमली माणूस गडकिल्लयावर, चौकीवर किंवा सन्निध बिलकुल ठेवूं नये.

१ आपल्या तनख्यांतील लोकांनीं परराज्यांतील सोईरगती करणें, देणें, आणणें याचा शोध होऊन सरकारआज्ञेनें व्हावें.

१ दाखल्याच्या जागीं किंवा सन्निध ठेवण्याचे लोक व सरदार हे ममतेचे विश्वासू, इमानी, नामांकित, जातिवंत, पिढीजादे असे पाहून ठेवावे.

१ किल्लयानजीकचें व पेठेनजीकचें रान तोडूं नये. तसेंच मार्गांवरील व खिंडींतील व त्या नजीकचें रान तोडूं नये. मार्गांवरील कळकी राखून ठिकठिकाणीं अधिक लावण करावी.

१ घांटाच्या पाजा पाडून ठिकठिकाणीं वाटा केल्या आहेत त्या मोडाव्या. गरज असेल तेथें राखून चौकी ठेवावी.

१ कारभारी मंडळाच्या लगतीचे कोण याची चौकशी ठेवावी. त्यांपैकीं अटकेंत घातले आहेत त्यांचा बंदोबस्त पक्का असावा. त्याच्या घराकडील बातमी घेत असावी. कोण कोणीकडे पाठवितात, कोण देवस्की करितात याचा तपास करून नेहमीं समजावित जावा.

१ पेठेंतील तटबंदीचे कोट पडले आहेत ते बांधावे आणि ठिकठिकाणीं आलगा बांधून लोक ठेवावे.

१ साळवण, किल्ला व जिल्हा यांकडील लोकांची हजेरी गैरहजेरी नेहमीं समजावित जावी.

---

याप्रमाणें मुख्य कलमें असून वसुलासंबंधें दुसरीं अनेक कलमें आहेत.

हे वयांत आल्यानंतर यांस आरंभीं शिंदे सुभेदार प्रतिकूल झाले. त्यानंतर स्वतःचें कारभारीमंडळ विरुद्ध झालें. त्यापासून यांस सात वर्षें संस्थान सोडून जावें लागलें. पुढें संस्थानीं आल्यावर त्या मंडळांतील कांहींस प्रतिबंध व बाकीच्यांस कामांतून दूर केलें. तरी त्या मंडळाच्या यांच्याविरुद्ध खटपटी शेवटपर्यंत चालू होत्या. परंतु पुढें त्यांचें कारस्थान मात्र यांस बाधक झालें नाहीं.

यांचे आजे रामराजास गुप्त ठेवून त्याच्या पक्षाचे असल्यानें, व यांचे वडील हे निरंतरच्या आजारानें, त्याचप्रमाणें हे विरुद्ध मंडळी व कारभाऱ्याच्या बंडामुळें कोल्हापूर राज्याच्या कारभाराच्या जागेस मुकले. तथापि क्रमाक्रमानें यांजवरील संकटें दूर होऊन हे वाढत्या प्रमाणानें कोल्हापूर राज्याच्या उपयोगीं पडले; परंतु हें होईपर्यंत फार काल निघून गेला. पुढें थोड्याच दिवसांत हे मृत्यु पावले. हे कोल्हापूर राज्याचे नामांकित पुरस्कर्ते होत चालले होते. यांस संतति नव्हती.

---

# रामचंद्र सुबराव.

## १८११ ते १८१३.

रामचंद्रराव यांस सुबराव यांनीं मरणसमयीं दत्तक घेतलें. हे नंदगांव घराण्यांतील लक्ष्मणराव पंडित यांचे पुत्र होते. यांस इ० स० १८११ च्या मे महिन्यांत कोल्हापूरचे राजे यांनीं नजराणा घेऊन अमात्य पदाचीं वस्त्रें दिलीं.

या दत्तकाच्या निवडीच्या व पसंतीच्या वेळापासून भास्करराव पंडित सचीव यांनीं आपला पुत्र निवडला जावा ह्मणून बावडा येथें व कोल्हापुरास महाराजांकडे फार खटपट केली; परंतु त्यांत त्यांस यश आलें नाहीं. हें पाहून ते पुण्यास गेले. तेथें त्यांनीं दरबारखर्च करून पेशवेदरबारांत रामचंद्रराव व त्यांचे जनक लक्ष्मणराव यांजविषयीं " मनस्वी भाषणें " ( अप्रमाण व अयोग्य निंदेचीं व अमर्याद ) केलीं, आणि दरबार आपल्यास अनुकूल करून घेतलें. त्यावरून या कामीं पेशव्यांकडून महाराजांकडे बोलणें आलें.

पूर्वीच्या कारकीर्दींत अमात्यांस कोंकणांतील आपल्या मुलुखाच्या संरक्षणासाठीं वाडीकर सांवत, आंग्रे, धुळप इत्यादिकांशीं निरनिराळ्या जागीं व वेळीं लहानसान चकमकी व लढाया कराव्या लागल्या होत्या. त्यांत अमात्यांच्या लोकांची नेहमीं सरशी असे. यामुळें त्या त्या प्रसंगीं, स्थळीं व वेळीं लोकांस अमात्यांच्या लष्कराचा उपद्रव होत असे. ही स्थिति कोठेंना कोठें नेहमीं चालू होती. यामुळें कोंकणपट्टींत अमात्यांच्या शिपायांचा अत्यंत वचक बसला होता. या कारणानें शांततेच्या वेळींदेखील लुटारू लोकांच्या हातून होणाऱ्या लुटींत व पडणाऱ्या दरवड्यांत अमात्यांच्या शिपायांचें अंग असावें असा लोक संशय घेत व खरेपणा मानीत असत.

यापासून पेशव्यांच्या कामगारांनीं आपल्या दरबारांत अमात्यांविरुद्ध कागाळ्या नेल्या. त्यावरून पुण्याहून गोखले याजकडून एक कारकून कोंकणांतील पेशव्यांच्या प्रदेशीं पडत असलेल्या दरवड्यांच्या जाबसाला-करितां बावड्यास आला. गोखले यांनीं या बाबतींत कोल्हापूरच्या महाराजांकडेही तक्रार कळविली.

इ० स० १८११ च्या नवंबर महिन्यांत कोल्हापूरच्या महाराजांनीं अमात्यांकडून कांहीं खर्च घेऊन वर दिलेले दत्तक व दरवडे या कामांतील पेशव्यांच्या तक्रारींचा जाबसाल करण्याचें काम आपण कबूल करून तसें पत्करल्याचें आज्ञापत्र अमात्यांकडे पाठविलें.

यापुढें याच वर्षीं अमात्यांस महाराजांचें आज्ञापत्र आलें कीं, "यावेळीं अमात्यांनीं जमातसुद्धां करविरीं असावें वगैरे".

यानंतर थोड्या दिवसांत इ० स० १८१२ जानेवारी तारीख ४ चें आज्ञापत्र कीं, "अमात्यांनीं कोल्हापुरास जलद निघून यावें" महाराजांनीं हें आज्ञापत्र देऊन राघो रामचंद्र यास बावड्यास पाठविलें.

अमात्यांस अशा लष्करी तयारीनें जलदीनें कोल्हापुरास नेण्याचें कारण उपलब्ध नाहीं.

महाराजांनीं मालवणसंबंधीं कांहीं मसलत सांगून खंडूजी नाईक भोंसले यांस अमात्यांकडे बावड्यास पाठविलें आणि त्याजबरोबर अमात्यांस आज्ञापत्र दिलें कीं, "भोसले सांगतील त्याप्रमाणें पोक्त जमाव सत्वर तयार करावा." "साळशी महालांत पन्नास लोकांची डांक ठेवून सिंधुदुर्गचें वर्तमान दररोज करविरीं हुजूर कळवित जावें." या आज्ञापत्राप्रमाणें या लष्करी तयारीचा

इ० स० १८१२ एप्रिल तारीख १२.

उपयोग झाल्याचें आढळत नाहीं. असें दिसतें कीं, ही तयारी व मसलत इंग्रजांच्या विरुद्ध होती. कारण यावेळीं मालवण व इतर ठिकाणच्या कोल्हापूरकरांच्या आरमाराच्या समुद्रांतील गडबडीविषयीं इंग्रजांची तक्रार होती.

यापुढें थोड्या दिवसांत महाराजांची प्रकृति बिघडली. अमात्य त्यांच्या समाचाराकरितां करविरीं गेले. या दुखण्यांत महाराजांचा अंत झाला व तहाच्यायोगानें मालवणचा किल्ला इंग्रजांच्या हातीं गेला.

रामचंद्रराव हे इ० स० १८१३ त मृत्यु पावले. यांस पुत्रसंतती नव्हती. फक्त एक मुलगी असून ती अर्जुनवाडकर यांच्या घराण्यांत दिली होती. तीस राजूबाई अक्का अर्जुनवाडकर असें ह्मणत असत. यांच्या पत्नीचें नांव आनंदीबाई असें होतें.

रामचंद्ररावांनीं अमात्यपदाधिकार सुमारें दोन वर्षें चालविला. यांनीं या अल्प मुदतींत आपल्या अधिकाराचें काम उत्तम चालविलें. पूर्व कारकीर्दींत संस्थानच्या उपयोगीं पडलेल्या लोकांस देखील नवीन इनामें करून दिलीं. हे हुषार व दयाळू होते. यांनीं राजा व प्रजा यांजकडून चांगलें ह्मणवून घेतलें.

---

## मोरेश्वर सुबराव.

### इसवीसन १८१३ पासून १८२६ पर्यंत.

---

रामचंद्ररावाचे मरणानंतर त्यांची स्त्री आनंदीबाई यांनीं नंदगांव घराण्यांतील मोरेश्वररावांचा मुलगा गोविंदराव यांस दत्तक पसंत केलें. परंतु मोरेश्वरराव यांनीं आपण अमात्य व्हावें असें मनांत आणून तशी खटपट केली. यांस, आनंदीबाई नात्यानें धाकटी भावजय होत

असल्यानें दत्तक होतां येईना, म्हणून सुबराव यांचें कुटुंब सुंदराबाई यांस हे दत्तक झाले. यावेळीं यांचें वय ३३ वर्षांचें असून सुंदराबाईचें वय १६ वर्षांचें होतें. यांस इ० स० १८१३ चे फेब्रुवारी महिन्यांत कोल्हापूरचे महाराजांनीं वस्त्रें दिलीं. मोरेश्वररावाच्या या करण्यापासून दोन तट झाले. आनंदीबाईची आपले नवऱ्याचें नांव चालण्याची इच्छा नष्ट झाली, व तिचा दत्तक घेण्याचा हक्क नाहींसा झाल्यामुळें अपमान झाला. यायोगानें मोरेश्वररावाविषयीं तिचे मनांत द्वेषबुद्धि उत्पन्न झाली. तसेंच मोरेश्वररावाचे बंधु भीमराव यांची आपला मुलगा दत्तक होण्याची खटपट असतां ती व्यर्थ गेली आणि मुख्यत्वें मोरेश्वररावांचा मुलगा दत्तक न होतां तेच स्वतः अधिकारी झाले. यामुळें भीमराव साहजिक आनंदीबाईचे पक्षास मिळाले; आणि संस्थानांतील प्रमुख लोक, ज्यांस मोरेश्वररावांचें करणें पसंत नव्हतें, व लहानसा दत्तक करून आपले हातीं कारभार रहावा अशीही ज्यांची इच्छा होती, ते सर्व आंतून आनंदीबाईस अनुकूल झाले व अज्ञान सुंदराबाईही त्यांत मिळाल्या. आधीं उभयतां बायांनीं आपली खर्चाची नेमणूक तोडून मिळणेबद्दल महाराजांकडे विनंति केली. क्रमाक्रमानें या मंडळींत, व्यंकाजी कृष्ण कुलकर्णी अथणीकर, खंडो भुजंग देशपांड्ये सांगरूळकर, बापू नरहर इंगळीकर, मथुरागिरी गोसावी, वगैरे लोक येऊन मिळाले, व एकंदरीनें या कटास भयंकर रूप आलें.

यावेळीं सदरहू मंडळी प्रसिद्ध खटपटी होती. अथणीकर हे पेशवे, निपाणीकर, कोल्हापूरचे राजे, यांजमध्यें लावालावी करणारे होते. गोसावी यास बावडे संस्थानांतून गांव मिळाला होता व त्यांचें महाराजांकडे दळणवळण होतें. देशपांडे, भाऊबंदी तंट्यांत विरुद्ध

पक्ष मोरेश्वररावांस मिळाल्यावरून या कटांत मिळाले. असे निरनिराळे लोक निरनिराळ्या कारणांनीं या कामांत शिरले होते.

आनंदीबाईनीं झालेले दत्तकाविषयीं महाराजांकडे तक्रार केली. त्यावरून महाराजांनीं मोरेश्वररावांचे जनक पिते भास्करराव पंडित यांस व भवानराव रामचंद्र बेडकीहाळकर, नरहर बापूजी देशपांडे, वगैरे मोरेश्वररावांचे वतीचे मंडळीस, इ० स० १८१३ चे एप्रिल महिन्यांत करविरीं बोलावून आणून त्यांस बायांची तक्रार मिटविण्याविषयीं सांगितलें.

याच महिन्यांत करवीर-सरकार व वाडीकर सावंत यांजमध्यें झालेले दस्तऐवजी कागद यादी वगैरे झाडेनिशी हुजूर पाठविण्याविषयीं आज्ञापत्र आल्यावरून, ते सर्व अमात्यांनीं महाराजांकडे पाठवून दिले.

पूर्वीं मानसिंगराव पाटणकर हे, सावंतांचे वाडीवर मोहिमेस जात असतां, त्यांनीं कलमठ ही पेढ लुटिली व तेथील व्यापारी निपाणीस नेऊन कैदेंत ठेवून, पुढें खंड घेऊन सोडिले होते. या मोहिमेपासून ती पेठ उध्वस्त झाली होती, ती अमात्यांनीं कौल देऊन वसविली व भरभराटीस आणिली.

मोरेश्वरराव अमात्य यांजकडून नंदगांवास कांहीं कामाकरितां पत्रें वगैरे नेणारांस भीमराव प्रतिबंधांत ठेवीत आणि दंड घेऊन सोडीत. प्रायः इ० स० १८१४ चे फेब्रुवारी महिन्याचे सुमारास हा प्रकार वारंवार घडत असे.

यापुढें आनंदीबाई व सुंदराबाई बावडा येथें आल्या. त्यांनीं साळवणखोरीस लोक जमा करविले व त्यांस खर्चास दिलें. या लोकांची मोरेश्वररावांचे फौजेशीं इ० स० १८१४ चे जून महिन्याचे आरंभीं

एक लहानशी लढाई झाली. तिचे वर्णनाचें बखरवजा एक पत्र मिळालें आहे, त्यांतील तात्पर्य खालीं दिलें आहे.

हें पत्र जून ( १८१४ ) च्या आठव्या तारखेस लिहिलें आहे. तथापि तें कोणी व कोणास लिहिलें याचा खुलासा या पत्रांत नाहीं. मोरेश्वररावांचे विरुद्ध कटांतील बावडा येथील लोकांचे चालकास हें पत्र आहे; आणि पाठविणाराही त्याच कटांतील प्रमुखापैकीं असावा.

"आह्मीं रासिवडेकर, परितेकर, लाटकर वगैरे नवे ठेविलेले, तसेच गडकरी व कोंकणचे ठेविलेले लोक असे निवडून त्यांची सामग्री व दारूगोळी यांची बेजमी करून किल्लयांत जाऊन देवास गाराणें दिलें. अवसर येऊन त्यानें सांगितलें कीं, दोन्ही खोऱ्यांत चौक्या ठेऊन स्वस्थ असावें. तुह्मीं होऊन चालून जाऊं नये. ते आले ह्मणजे बेलाशक लढाई करावी."

"त्यावरून पाउणशें लोक जरगी बावेलीचे खोरीस पाठविले; व चारशें लोक—भिकाजीराव, येसाजी शिरसाट, सुभानजी पाटील यांसह साळवणचे खोरीस पाठविले. त्यांनीं असळजेस जाऊन रहावें व फडणीसांनीं दुसरे दिवशीं जाऊन चौकीची जागा ठरवावी असें ठरलें. जुनी जागा अफाट माळावर असून समीप माहितगार शत्रू, यासाठीं बंदोबस्ताची जागा पाहिजे होती. तथापि दोन दिवस नदीमुळें फडणीसांस जातां येईना. याकरितां त्याकामीं चिरंजीव विठोबा यासच तिकडे पाठविलें. त्याची व फडणीस यांची गांठ अणदुरांत पडली. दोन दिवस तेथेंच मुक्काम होता. उपरांत शनिवारीं चौकीमागील टेकावर जाऊन रहावें, असें ठरवून भोजनोत्तर तेथें गेले. आलगा बांधिल्या व मेढा घालावा असेंही ठरलें. परंतु रविवारीं रात्रीं बावड्याचे रोखे ५०।६० फार मोठे तोफांचे आवाज झालेले ऐकिले.

यावरून रात्रींच फडणीस व शिरसाट ५०।६० लोक घेऊन बावड्याकडे निघाले ते रुपणीवर गेले इतक्यांत त्यांस बावड्यास कांहीं गडबड नाहीं असें समजलें. तेव्हां लोकसुद्धां शिरसाट परत आले आणि फडणीस बावड्यास गेले. देवाच्या सांगण्यावरून फडणीस यांनीं ठरविलें कीं, मेढा घातल्यास ती एक जागा होऊन तिचे संरक्षणाचें जोखीम मात्र वाढेल. याकरितां मेढे न घालितां शिरीं मात्र ओढावीं. त्याप्रमाणें शिरीं रोवून आंतून पेटी भरली. ही जागा पेठेनजीक तयार झाली. नंतर लोक पेठेंतून तेथें गेले. हें वर्तमान सदू घोंगडा यानें राशिवडें येथें जाऊन श्रीमंतांस कळविलें. श्रीमंतांनीं शंकराजी-पंतास बेडकीहाळास पाठवून हजार पंधराशें शिपायांसहित आपले मेहूणे यांस राशिवडें येथें आणविलें, आणि ते येईपर्यंत आपण कांहीं लोकांसहित चौकीकडे आले; आणि तेथील लोकांस कुमकेस लोक पाठवितों असें सांगून परत राशिवड्यास गेले."

"बेडकीहाळकर लोक घेऊन राशिवड्यास आल्यानंतर अमात्यांनीं एकंदर लष्करच्या दोन टोळ्या करून एकीवर बेडकीहाळकर यांनीं मुख्य होऊन साळवणनजीकचे मेढ्यावर व पेठेवर हल्ला करावा व आपण दुसरी टोळी घेऊन अणदूरचे टेकडीवर जमलेले लोकांवर हल्ला करावा असें ठरवून त्या त्या ठिकाणीं उभयतां दाखल झाले."

"बेडकीहाळकर बुधवारीं दोनप्रहर रात्रीं पेठेस आले. ही बातमी आमचेकडील लोकांस समजली. लोक सावध होते. लागलाच हल्ला होईल असें मात्र वाटलें नाहीं. सकाळीं चार घटका दिवसास जुने चौकीजवळून आपले लोकांस उत्तेजन देत बेडकीहाळकर मेढ्याचे कुंपाशीं येऊन भिडले. त्या तोंडावर हणमंत निळकंठ पारितेकर, राशिवडेकर, लाटकर असे होते. त्यांतून ५०।६० लोक बाहेर

पडून त्यांचे लोकांत शिरून हातघाईची लढाई सुरू झाली. पेठेंतून बदुक्यांनीं मारगिरी चालविली. तथापि, त्यांजकडील लोक फार व मर्दाने असून सरदार पाठीवर, यामुळें चांगले लढले. आमचे लोक बाहेर निभावणी लागेना ह्मणून मेढ्यांत आले. संताजी पारगांवकर लढाईंत ठार झाला. सुलताना कुडुतेकर व बालेखान लाटकर, यांच्या ढाल-- तरवारीचे तुकडे तुकडे झाले. अशी बाहेर एक- मेकाशीं हातीं धरून मोठ्या त्वेषानें लढाई झाली."

"बाहेर गेलेले लोक मेढयांत येतांच त्यांचे पाठोपाठ बेडकीहाळक- राचे लोक कुंपास येऊन बिलगले व आंत शिरण्याचा प्रयत्न करूं लागले. त्यांस आंतील बंदुक्यांनीं मारा चालवून पळवून लाविलें. या लढाईंत त्यांजकडील बरेच लोक जमीनदोस्त झाले."

"साळवणकरी यांनीं लबाडी करून, बावडयाहून शत्रूंस मदत येईल त्यांचे वाटेवर त्यांस रोंखून धरण्यास जातों, असें सांगून नीट- मार्गानें असंडोलीच्या खिंडीशीं जाऊन बसले".

"श्रीमंत आपल्या लोकांसहीत माग्र्यांचे वाडीवर आले. तेथें भाऊ माग्र्या यानें त्यांस कळविलें कीं, येथें पांचशें लोक आहेत व बावेलीकडे दुसरे तीनशें गेले आहेत. त्यास श्रीमंतांनीं सांगितलें कीं, ही बातमी खोटी आहे व आह्मांस खरें वर्तमान समजलें आहे. इतके लोक मुळींच असणार नाहींत."

"आह्मीं असंडोलीच्या खिंडीच्या पश्चिमेस बावडयाकडील मार्गाचे तोंडास आमचे चौकीचा दरवाजा राखिला होता. त्या नजीक श्रीमंतांचे लोक येऊन त्यांनीं तेथील टेंकडीवर चारही बाजूंस मोर्चेबंदी केली. पुढील तोंडास कवाडें व पिंजराचे लाटे आणून मोर्चे पुरे केले होते.

त्यांपैकीं दरवाजानजीकचा मोर्चा केदारी ठिकपुरल्या बावीस लोकांसहीत बांधीत होता, तो तेथेंच ठार झाला. झुंजाररावाच्या दोन्ही मांड्या मोडल्या व आणखी पांच सहा असामी जखमी झाले".

"याप्रमाणें चारही मोर्चे बांधीत असतां व बांधल्यानंतरही प्रत्येक ठिकाणीं लढाई सुरू होती. अस्तमानपर्यंत मोर्चे कायम होते. परंतु वरचेवर मुरदे जाऊं लागले असें पाहून श्रीमंत माग्यास ह्मणाले कीं तुझी बातमी खरी आहे, आह्मांस लबाड लोकांनीं खोटी बातमी देऊन फसविलें. खरी बातमी समजती तर अधिक तयारी केली असती, असें ह्मणून मोर्चे उठविण्यास परवानगी दिली, व त्याप्रमाणें त्यांचे लोक मोर्चे उठवून निघून गेले".

"सायंकाळपर्यंत मोर्चे कायम असल्याचें समजल्यावरून आह्मीं आमचे लोकांचे मदतीस खानविलकर यांस पाठविलें, आणि दारुगोळी यांचीही मदत पाठविली. परंतु खानविलकर तेथें पोचण्यापूर्वींच ते लोक मोर्चे उठवून गेले होते".

"याच ठिकाणीं आणखी एक लढाई द्यावी असें आमचे लोकांचें मनांतून होतें. त्याप्रमाणें ठरल्याचें व प्रस्तुत लढाईचें कच्चे वर्तमानाचें चिरंजीव याचें पत्र आलें. परंतु त्यानंतर चौकीवरच्या लोकांत कांहीं मसलत निघून आह्मीं सारे येथें गुंतून राहिल्यास मागें जाग्यास अपाय होईल असें वाटल्यामुळें अडीचप्रहर रात्रीं तेथून निघण्याचा त्यांचा विचार ठरला. कांहीं लोकांचें ह्मणणें ती जागा सोडून देऊं नये असें होतें. अखेर जागा सोडण्याचें ठरून तेथून सर्व लोक निघून उजेडण्याचे सुमारास येथें आले. श्रीनें यश दिलें. परंतु अल्प मतीचेयोगानें व्यर्थ गेलें."

"एक महिना घाटतां घाटतां ही मसलत या पल्लयांस आली. आपल्याकडून कांहीं पुरवणी झाली नाहीं. आईसाहेब यांजकडून एक हजार रुपये आले. त्यानंतर कांहीं रक्कम आली नाहीं. खर्चाची व्यवस्था कशी करावी हें चित्तीं आणावें. यापुढील विचार केला पाहिजे. नांदणी, इचलकरंजी, वगैरे ठिकाणचे नाईक येथें आले आहेत. लोक आणा ह्मटलें तर एक महिन्याचा पगार प्रथम पदरांत घालावा लागतो. लोकांची तर जरूर आहे, याकरितां त्यांस ठेवून घेतलें आहे. अकिवाट वगैरे कांहीं ठिकाणचे लोकांचे पदरीं रुपये घालून लोक आणण्यास परत पाठविले आहेत; ते पंधरा दिवसांत लोक घेऊन येतील. हा मजकूर लिहिण्याचें कारण नव्हतें; परंतु आमचीं मुलें-माणसें राजश्री नारबा यांचे घरीं होतीं, तीं किल्ल्यावर नेलीं. कोणे ठिकाणीं ठेविलीं किंवा त्यांची काय हकीकत आहे हें कळलें नाहीं. कळावें ह्मणून लिहिलें आहे."

"श्रीमंतांकडील बातमी अशी आहे कीं, त्यांनीं साळवणच्या मेढ्याची बळकटी करून ह्मासुरली येथें मेढा घालण्याचें ठरविलें आहे. त्यांस लोकांची व पैशाची मदत करण्याचें बेडकीहाळकर यांनीं पतकरलें आहे."

याप्रमाणें आनंदीबाईचे वतीचे लोक व मोरेश्वरराव यांचे पक्षाचे लोक यांजमध्यें सामान्य लढाया होत होत्या. त्यांत शेवटीं मोरेश्वरराव यांचे लोकांनीं जय मिळविला.

तथापि आनंदीबाई दत्तक मिळविण्याचे खटपटीसाठीं करवीरीं जाऊन राहिल्या होत्या. त्यांनीं करवीरदरबारचे कांहीं लोक अनुकूल करून घेऊन महाराज यांजकडून दत्तकाची परवानगी मिळविली; आणि इ० स० १८१४ चे आक्टोबरांत विधीपूर्वक समारंभानें मुलगा दत्तक

घेऊन त्याचें नांव सुबराव रामचंद्र असें ठेविलें. दत्तक सुबराव यांनीं हुजुरांतून लोकांची मदत मिळवून, बावडा येथें जाऊन संस्थान ताब्यांत घेण्याची खटपट चालविली.

याप्रमाणें चाललेल्या गोष्टी मोरेश्वरराव यांस समजत होत्या. त्यांनीं आपल्या वतीनें खटपटी चालविल्या होत्या. त्यांनीं आपला मुक्काम राशिवडें येथें ठेवून श्रीस्वामी जगद्गुरु व खानविलकर यांस आपले वतीनें महाराजांचें मन वळविण्यास तयार केलें होतें.

अखेरीस, सुबराव रामचंद्र यांस महाराजांकडून मदत मिळाली नाहीं, तेव्हां ते पुण्यास गेले व तेथें इंग्रजांचे असलेले वकिलास भेटले. वकिलांनीं त्यांस सांगितलें कीं, "महाराजांकडून सरफराज होऊन आज्ञा झाली असतां जे अवज्ञा करितात, त्यांस नस्यत करून आज्ञेप्रमाणें बंदोबस्त होईल." त्यावरून सुबराव यांनीं व्यंकाजी कृष्ण व मथुरागिरी यांजबरोबर विनंतीपत्र देऊन त्यांस महाराजांकडे पाठविलें. ही गोष्ट इ० स० १८१४।१८१५ या वर्षीं घडली.

सदरहू अथणीकर व गोसावी करविरीं येऊन महाराजांकडून सुबराव यांस मदत मिळविण्याची खटपट करीत होते, आणि स्वतः नवीन लोक चाकरीस ठेवीत होते. त्या वेळेचे सुमारास कांहीं संस्थानिकांचे दरबारांत गोसावी-पंथाचे लोकांचें वजन वाढलें होतें. हे लोक धर्मसंबंधानें मान्य असून सधन असत. त्यांनीं दरबारांत कर्ज दिलेलें असे. या कारणानें ( योगानें ) दरबारांत यांचें वजन पडून यांच्या ह्मणण्याप्रमाणेंच घडामोडी होत असत.

बावडे संस्थानचा मांढरें हा गांव प्रथम गोसावी याजकडे कर्जांत लावून दिला होता. नंतर इ. स. १८०३ या वर्षीं तो गांव गोसावी यास इनाम करून दिला होता. या ठिकाणीं गोसावी यानें किल्ल्याप्रमाणें मजबूत असा आपला वाडा बांधिला होता. हा गांव

तटबंदीचा व डोंगरावर वसला होता. यामुळें आतां यास डोंगरी किल्ल्याची स्थिति आली होती. गोसावी यानें ठिकठिकाणीं थोडेसे लढाऊ शिपाई ठेविले होते; आणि आतां सुबराव रामचंद्र यांस मदत करण्याकरितां नवीन ठेविलेले लोक याच ठिकाणीं जमले होते.

इ. स. १८१५ च्या फेब्रुआरी महिन्यांत मोरेश्वरराव परिवारासुद्धां श्रीकृष्णस्नानास जाण्याकरितां करवीरीं आले. बरोबर आनंदीबाई होत्या. मुक्काम श्रीस्वामीच्या मठांत होता. तेथें असतां आनंदीबाई यांनीं कृष्णाजी रामचंद्र जिल्हेदार यांस दिनकरपंत या नांवाचे गृहस्थाकडे पाठवून त्यांचेकडून विनंति करवून श्रीमन्मातृश्री महाराणी आईसाहेब यांची भेट होण्याकरितां त्यांजकडून आपणास बोलावणें व्हावें अशी तजवीज करविली; आणि बोलावणें आल्यानंतर वाड्यांत जाऊन त्यांनीं आईसाहेबांची भेट घेतली. या भेटींत काय बोलणें झालें हें प्रसिद्ध नाहीं. तथापि घेतलेले दत्तकासंबंधानें कांहीं बोलणें झालें असावें असें वाटतें.

आनंदीबाई करविरीं असतां सदर जिल्हेदार यास व्यंकाजी कृष्ण अथणीकर व गोसावी यांजकडे गुप्त रीतीनें पाठवून "तुमचेकडून उपराळा होत असल्यास करावा" असें कळविलें; आणि जिल्हेदार यास करविरीं ठेऊन आपण स्वारीबरोबर बावड्यास आल्या.

गोसाव्याचे ताब्यांतील मांढऱ्याचें ठाणें घेण्याचा बेत मोरेश्वरराव यांनीं केल्याचें महाराजांस समजतांच अमात्यांस आज्ञापत्र पाठविलें कीं, ठाणें हुजुरोन घेऊन स्वाधीन केलें जाईल. परंतु या आज्ञापत्रास दोन तीन महिने झाले, तथापि ठाणें घेण्याची तजवीज झाली नाहीं, याकरितां अमात्य यांनीं आपल्या कारकुनाबरोबर विनंतिपत्र देऊन त्यास महाराजांकडे पाठविलें. हें विनंतिपत्र पुढें दिलेल्या अर्थाचें होतें.

"१ सरकारांतून बाबतीचे गल्लयास अडथळा झाल्याची मोकळीक व्हावी. याचीं कारणें सालमजकुरीं संस्थानास कसाले फार पडले. श्रीचें देणें आहे. कार्यें दोन झालीं, शिबंदीचा खर्च वाढत चालला; या सालीं पर्जन्याचे आपत्तीमुळें पिकें आलीं नाहींत."

"२ येथील प्रकरणांत बैदे करणारे लोक करविरीं आहेत. त्यांचा बंदोबस्त होऊन ते इकडे मिळावेत."

"३ तपोनिधी यांस इकडून उपजीविका चालली असतां ते इकडील अनिष्ट चिंतून बैदे उपस्थित करीत आहेत. इकडून बंदोबस्त करीत असतां आज्ञा झाली कीं, आठ–पंधरा दिवसांत ठाणें पाडून स्वाधीन होईल; परंतु अद्यापि त्याप्रमाणें झालें नाहीं. आतां ठाणें पाडून स्वाधीन व्हावें."

"४ इकडून बोलणें करण्याकरितां आलेले लोकांस उपद्रव होऊं नये."

याप्रमाणें महाराजांकडे बोलणें चालविलें असतांही ठाणें हुजुरोन ताब्यांत देवविलें नाहीं. याकरितां अमात्यांनीं ठाणें घेण्यास आपले-कडील फौजेची एक टोळी नेमिली; आणि तिच्या मदतीकरितां राशिवडें ठाण्यांतील लोकांस हुकूम दिला.

नेमिलेले लोक बातमी फुटूं न देतां राशिवडें येथें येऊन राहिले, आणि ठाणें घेण्यास संकेताचा दिवस नेमिला. त्या दिवशीं मांढरें येथील अमात्यांचे वतीचे लोकांकडून धान्याचे मळणीसाठीं जनावरें बाहेर नेण्याकरितां ह्मणून रात्रीं वेशी उघडण्याची परवानगी गोसाव्याचे अंमलदारांकडून मिळविण्याची तजवीज केली. तसेंच त्या गांवच्या गोसाव्याचे वतीचे प्रमुख लोक राशिवडें येथें त्यांचे आप्तांकडून बोलावून आणून पाहुणचाराकरितां ह्मणून त्यांस तेथेंच ठेवून घेतलें.

याप्रमाणें व्यवस्था करून (इ० स० १८१५ या वर्षीं) नेमलेले रात्रीं जाऊन ठाण्यावर हल्ला केला व वाड्याचा दरवाजा फोडून आंत प्रवेश केला. तेव्हां उभयपक्षीं चकमक होऊन बऱ्याच लोकांचा नाश झाला व अखेरीस अमात्यांच्या लोकांनीं वाडा काबीज केला, तेव्हां गोसाव्याचे लोक पळून गेले. या ठाण्यांत दोन तोफा, कितीएक बंदुका, बरच्या, निमचे व दारूगोळया वगैरे युद्धोपयोगी सामान मिळालें. गोसाव्याची मालमत्ता जप्त करून बावड्यास पाठविली. वाडा पाडून जमीनदोस्त केला. या लढाईंत अमात्यांकडील येसाजी रुद्र देशपांडये, सुलताना सावत वगैरे लोक पडले.

यानंतर ता० ११ दिजंबर १८१५ इसवी रोजीं कृष्णाजी रामचंद्र जिल्हेदार यांस अभय देऊन विरुद्ध कटांतून फोडून अमात्यांनीं आपले पक्षाकडे घेतलें आणि विरुद्ध पक्षाचे चालू कारस्थानाची सर्व बातमी त्यांजकडून समजून घेतली.

या वेळीं व्यंकाजी कृष्ण, माणको कोन्हेर, भास्करपंत पेंढरकर, यांनीं कऱ्हाडप्रांतीं जाऊन लोक चाकरीस ठेविले. मथुरागिरी यांनीं त्यांस खर्चास दिलें व आपण गोकाकेस जाऊन आणखी लोक जमविले. नंतर व्यंकाजी कृष्ण यांनीं कऱ्हाड प्रांताहून कोगनोळी येथें येऊन तेथेंही कांहीं लोक जमविले, आणि राशिवडें ठाण्यावर हल्ला करण्याची तयारी केली. या मंडळीचा बेत होता कीं, अमात्यांबरोबर लढाई करून बावडा येथील गादीवर सुबराव रामचंद्र यांस कायम करावयाचें; परंतु अमात्य यांनीं यांतील बहुतेक लोकांचा चांगला बंदोबस्त केला. त्याचें वर्णन पुढें क्रमाक्रमानें येईल.

राशिवडें ठाण्यावर हल्ला होणार हें अमात्यांस समजतांच त्यांनीं ठाण्याचे बंदोबस्ताकरितां लोक पाठवून नारायणराव पाटणकर सरलष्कर

यांस मदतीकरितां कांहीं लोक पाठविणेबद्दल लिहून त्यांजकडील ठाण्यास कुमक आणविली.

मथुरागिरी यांजकडील मांदरें हें ठाणें अमात्यांनीं पूर्वींच घेतलें होतें. त्यानंतर महाराजांकडे त्याचेविरुद्ध अमात्यांचे वकील तक्रार करीत होते. शेवटीं इ. स. १८१६ या वर्षीं महाराजांनीं गोसावी यास हद्दपारीची शिक्षा दिली. यायोगानें विरुद्ध कटांतील मंडळीचा मोठा आश्रय नाहींसा झाला.

व्यंकाजी कृष्ण वगैरे मंडळी महाराजांकडून मदत मिळविण्याची खटपट करीत होती. शेवटीं त्यांस कांहींसें यश आलें. इ. स. १८१७ चे आक्टोबर महिन्यांत महाराजांनीं मुकुंद नाईक चवाण खासबारदार, सुभानजी नाईक बंदुकबारदार व लक्ष्मणराव पंडित, यांस आपापले लोकांसहित व्यंकाजी कृष्ण अथणीकर यांचे मदतीस जाण्याचे हुकूम झाले. तसेंच गगनगडकरी यांस आज्ञापत्र कीं "तुमचा पूर्वींचा संकल्प आहे त्याची आज्ञा व्यंकाजी कृष्ण यांस केली आहे. त्याप्रमाणें वर्तणूक करावी. संकेताप्रमाणें तुमचा मनोदय सिद्धीस नेला जाईल. असेंच गगनगडचे घेऱ्यांतील लोकांस आज्ञापत्र कीं अथणीकर यांजकडे वसूल देऊन त्यांचे आज्ञेंत वर्तावें."

व्यंकाजी कृष्ण यांनीं फोंड्याचे बाजूनें जाऊन शिवगड घ्यावा आणि कोंकणांतील प्रदेश घेऊन गगनगडचे पायथ्याशीं यावें, आणि खंडो भुजंग देशपांड्ये यांनीं वरघाटचा प्रदेश घ्यावा अशी मसलत ठरली होती.

इ० स० १८१७ या वर्षीं ता० ८ आक्टोबर रोजीं देशपांड्ये यांनीं आपले बरोबरचे लोकांसहीत ठाणें साळवण येथें हल्ला करून तें ताब्यांत घेतलें आणि पुढें बावेली खोरीकडे निघाले. हें वर्तमान अमात्यांस

समजतांच, त्यांनीं जिवाजीराव खानविलकर यांजबरोबर फौज देऊन त्यास देशपांड्ये यांचे बंदोबस्तास पाठविलें. खानविलकर यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं लढून शत्रूचे लोकांस पिटाळून लाविलें, आणि शेवटीं ठाणें साळवण येथें शत्रूचा पूर्ण पराभव करून ठाणें ताब्यांत घेतलें. देशपांड्ये यांचे लोकांचा दोन कोसपर्यंत पाठलाग करून त्यांची दाणादाण उडविली. या लढाईंत हणमंता बोरकर वगैरे अमात्यांचे पुष्कळ लोक पडले. खानविलकरांचें शौर्य या लढाईंत उत्तम दिसून आलें.

इ० स० १८१७ चे नवंबर महिन्यांत व्यंकाजी कृष्ण यांनीं आपले लोक व मदतीचे लोक यांसहीत शिवगडानजीक येऊन तळ दिला; व तेथून किल्ल्यावर हल्ला केला. शिवगडावर हल्ला होणार ही बातमी अमात्यांस यापूर्वींच समजली होती. ह्मणून त्यांनीं किल्ल्यावर धान्य, लोक व युद्धोपयोगी साहित्याची बेगमी केली होती व हल्ला येतांच कुमकेच्या लोकांची तयारी ठेविली होती. यामुळें या हल्ल्यांत अथणीकर यांस माघार खावी लागली. पुढें अथणीकर यांनीं आणखी दोन वेळ किल्ला घेण्याची खटपट केली; परंतु त्यांतही त्यांस यश न येतां मागें परतावें लागलें.

अथणीकर यांचे लोकांस जंगलची माहिती नव्हती. गडकरी व अमात्यांकडून आलेले मदतीचे लोक हे रात्रीं अथणीकरांचे लष्करावर जंगलांतून येऊन गोळ्या घालीत. यामुळें त्यांचे लोक फार मरूं लागले. तेव्हां कांहीं लोक त्यांस सोडून निघून गेले.

याप्रमाणें कांहीं लाभ न होतां सुमारें १००।१५० लोकांचा नाश झाला. तेव्हां अथणीकर परत फिरून कोल्हापुरास आले. तेथें त्यांजवर महाराजांची इतराजी होऊन त्यांस त्यांनीं प्रतिबंधांत ठेविलें व

कांहीं दिवसांनीं अमात्यांचे स्वाधीन केलें. नंतर अमात्यांनीं त्यांस बावडा येथें प्रतिबंधांत ठेविलें. ते मरेपर्यंत बावडा येथें नजरकैदेंत होते.

शिवगडच्या या लढाईंत अमात्यांकडील अर्जोजीराव राणे आचिर्णे-कर यांनीं मोठें शौर्य दाखविलें व मल्हारराव काटे वगैरे शूर पुरुष मरण पावले.

मोरेश्वरराव गादीवर बसल्यापासून या लढाईअखेर सुमारें पांच वर्षें या विरुद्ध मंडळीकडून त्यांस सारखा उपद्रव होत होता. या कटांतील गोसावी व अथणीकर या दोघां मुख्य उलाढाली चालविणारांचा बंदोबस्त झाल्यापासून अमात्यांस उपद्रव पोंचला नाहीं व स्वस्थता प्राप्त झाली.

इ० स० १८१८ या वर्षीं मालवणापैकीं दोन तोफा महाराजांकडून अमात्यांस मिळाल्या; थापुढें अमात्यांनीं सर्व ठाणीं व किल्ले यांत लोकांची भरती करून दारूगोळ्यांचा पुरवठा केला; आणि साळवणास जोतीराम यास मुख्य नेमिलें.

इ० स० १८१९ त घाटास चौक्या बसवून बंदोबस्त ठेवण्यास महाराजांचें अमात्यांस आज्ञापत्र आलें. नंतर त्याप्रमाणें अंमल करण्यांत आला.

बावडे संस्थानचा साळशी महालांत दीड तक्षिमेचा हक्क होता. साळशी महाल पेशव्यांचें राज्य इंग्रज सरकारनें घेतल्यापासून त्यांचे ताब्यांत आला. तेव्हांपासून इंग्रजानीं त्या हक्काची अमानी वहिवाट ठेविली. पुढें बावडे संस्थानाकडून त्या हक्काची व देवगड, घोणसरी, आशामठ आणि आचरें वगैरे ठिकाणांतील जकातीचे हिश्शाची आपली वहिवाट ठरवून घेण्यांत आली. त्यावरून इ० स० १७२० सालचे सप्टंबर महिन्याचे १६ वे तारखेपासून या सर्वांची वहिवाट अमात्यांचे कारकुनाचे ताब्यांत मिळाली.

इ० स० १८२१ यावर्षीं अमात्य एल्फिन्स्टन साहेबांचे भेटीस शिरोळ मुक्कामीं गेले होते.

इ० स० १८२१ यावर्षीं महाराजांकडून वरघाट गांवगन्नाची तपासणी करण्याकरितां लोक नेमिले होते. त्यांची व तिसंगी गांवच्या लोकांची मारामारी होऊन दोहोंकडचे थोडे लोक मेले व जखमी झाले. गांव सोडून गांवचे लोक पळून गेले. त्यावरून उभयदरबारांत काम चालून महाराजांचा हुकूम झाला कीं, जखमी लोकांची समजी होऊन तपासनीस यांस काम पुरें होईपर्यंत दहा लोकांसहित अमात्यांनीं आपले हद्दींत राहूं द्यावें. हा दंगा तपासणीदाराचे लोकांचा गांवास फार उपद्रव झाल्यामुळें झाला असावा किंवा अमात्यांचा हुकूम त्यांचे हद्दींत फिरण्याविषयीं तपासणीदार यांनीं घेतला नसावा.

याच सालीं अमात्य यांनीं व्यंकटेश बहिरो बोकील व कृष्णराव गोविंद भावे ह्या उभयतांस कारभारी नेमिलें, व त्यांचे इतल्ल्याशिवाय स्वतः आपण कोणतेंही काम करावयाचें नाहीं असा ठराव केला. यावेळीं संस्थानास फार कर्ज झालें होतें. त्याचे निवारणाकरितां अमात्यांस असा ठराव करावा लागला.

इ० स० १८२२ चे दिसेंबरांत अमात्य श्रीनरसिंहवाडीस देवदर्शनास गेले व मागें बावडा येथें आपले पुत्र गोविंदराव यांस ठेविलें.

इ० स० १८२३ चे मार्च महिन्यांत ताक्रीन साहेबांचे भेटीसाठीं अमात्यांस करविरास येण्याविषयीं महाराजांचें आज्ञापत्र आलें.

इ० स० १८२४ चे मे महिन्यांत गोविंदराव दादासाहेब यांचें लग्न वारुणतर्फेचे देशपांड्ये जिवाजी महादेव यांची कन्या बहिणाबाई यांजशीं झालें व त्यांचें नांव भवानीबाई असें ठेविलें.

इ० स० १८२४।१८२५ चे सुमारास महाराजांची स्वारी बेळगांवाकडे गेली. त्यावेळीं अमात्यांचे पुत्र गोविंदराव हे दोनशें लोकां-

सहित त्या स्वारीबरोबर होते. स्वारीचा मुक्काम चिकोडीस झाल्यानंतर तेथून महाराज, प्रतिनिधि व गोविंदराव असे सडे साहेबांच्या भेटीस गेले होते. या स्वारींत गोविंदराव यांचे हुषारीवरून महाराज बोलले कीं, गोविंदराव काम सोडून पुष्कळशी स्नानसंध्या करीत बसावयाचे नाहींत.

इ० स० १८२५ त फास्टर साहेब हे गगनगड पाहण्यास आले होते. त्याबरोबर महाराजांचें आज्ञापत्र आलें कीं, साहेबमजकूर यांस किल्ला पाहूं द्यावा व नकाशा काढूं द्यावा.

ता० ८ फेब्रुवारी सन १८२६ इसवी रोजीं बावडे संस्थानचे वरघांट गांवगन्नाची तपासणी करण्याकरितां महाराजांकडून माधवराव घाटगे यांची दुसऱ्यानें नेमणूक झाली.

मोरेश्वरराव हे इ० स० १८२६ च्या मे महिन्याचे १९ वे तारखेस अकस्मात् आजारी पडून मृत्यु पावले. यांस दोन स्त्रिया होत्या. पैकीं वडील सत्यभामाबाई यांस दोन पुत्र झाले. वडील पुत्र गोविंदराव हे अमात्य झाले. धाकटे पुत्र शंकरराव यांस शेळोली घराण्यांत दत्तक दिलें होतें. धाकटी स्त्री बापु विठ्ठल उत्पात यांची बहीण रमाबाई ऊर्फ ताईसाहेब या नांवाची होती; यांस एक कन्या होती ती राजगोळीकर यांचे घरीं दिली होती.

मोरेश्वरराव यांनीं या गादीचा सुमारें तेरा वर्षें उपभोग घेतला. यांनीं आपले पुत्रास दत्तक न देतां आपणा स्वतांस गादी मिळविली. यापासून त्यांस फार शत्रू उत्पन्न झाले व तेणेंकरून त्यांस अधिक त्रास पोंचला व पुष्कळ खर्च आला. यांस आमरणांत संस्थानचे कारभाराचे कामांत फारसें सौख्य लाभलें नाहीं.

---

# गोविंदराव मोरेश्वर.

## ( इ० स० १८२६ पासून १८३४ पर्यंत. )

हे आपले वडिलांचे मृत्यूनंतर लागलीच पदाधिकारी झाले नाहींत; पुढें सुमारें पांच महिन्यांनीं यांस वस्त्रें मिळालीं. त्याचीं कारणें देण्यापूर्वीं या वेळची कोल्हापूर–दरबारची थोडीशी हकीकत सांगितली पाहिजे.

कोल्हापूरचे गादीवर इ० स० १८२२ त शहाजी ऊर्फ बुवासाहेब हे बसले. यांची कारकीर्द संस्थानिक, जहागिरदार व रयत या सर्वांस मोठी भयप्रद झाली होती. प्रांतांतल्या प्रांतांत यांच्या वारंवार होणाऱ्या स्वाऱ्यांपासून आणि यांनीं ठेविलेल्या लुटारू लोकांच्या टोळ्यांपासून सर्वांस आपला बचाव करितां करितां पुरेवाट होत असे. संस्थानिकांस आपलें व आपल्या रयतेचें रक्षण कसें होईल याची निरंतर काळजी असे. बुवासाहेबांच्या कारकीर्दीची स्थिति दाखविणारीं जीं पत्रें आहेत, त्यांतः— 'कोणत्याही गोष्टीचें नेमोत्तर नाहीं.' 'केव्हां कोठें स्वारी होईल याचें प्रमाण नाहीं.' 'शिकारीचे निमित्तानें रांगोळीचें ठाणें घेतलें.' 'येथील विचार सर्व द्रव्यावर आहे.' 'कारभारी मंडळींत एकमेकांविषयीं चित्तशुद्धि नाहीं; एकाचे विचारें काम करूं ह्मटलें तर बाकीच्यांची इतराजी होते.' 'चोरांचे बैद्यामुळें ह्मणून प्रांतांतून स्वार व पायदळ हिंडत आहे.' 'सडी स्वारी बोलाविली आहे, पण दगा आहे; येऊं नये.' जाग्यास सावधगिरी असावी.' 'साळवणास व साशिवड्यास पागा नेमिल्या.' 'रात्रीं आरब आले आहेत; प्रांतांत दरवडे पडत आहेत.' 'अमक्याचें घर लुटलें.' अमक्याचे घरास खणित लाविलें.' अमक्याच्या घरास चौक्या बसविल्या.' 'अमक्याची इतक्या

रकमेवर मखलाशी झाली.' 'नेरलीकरांचीं सगळीं ठाणीं घेतलीं.' 'सरलष्करांचा हुद्दा काढून घेतला, आणि त्यांस सर्वस्वी नागविलें.' 'अमात्य राशिवड्यास आल्यास त्यांस दगा आहे, कसलाही भरंवसा नाहीं.' असे निरनिराळ्या प्रकारचे सर्व ठिकाणीं उल्लेख आहेत.

अशी स्थिति असतां गोविंदराव यांस वस्त्रें मिळावयाचीं होतीं. त्यांतूनही गोविंदराव आपले वडील दत्तक होण्यापूर्वीं पूर्वघराण्यांत असतां जन्म पावले होते. भीमराव ऊर्फ बापूसाहेब हे यांचे वडिलांपासून त्यांस व यांस प्रतिस्पर्धि होते. ( यांचें विशेष वर्णन मोरेश्वरराव यांचे वर्णनांत आलें आहे ). करवीर सरकारनें बावडें संस्थानाकडे गल्ल्याची बाकी काढिली होती, त्यासंबंधानें दोन्ही दरबारांत इ० स० १८२४ पासून तंटे चालले होते, त्याचे निर्गतीकरितां बावडे संस्थानचा बाबतींचा ऐवज करवीर सरकारनें जप्तींत ठेविला होता, संस्थानास अतिशय कर्ज झालेलें होतें, नजराणा व दरबारखर्च सोसणें भाग होतें, स्वभावतः महाराजांचें अंतःकरण अशाश्वत होतें, इत्यादि अनेक कारणांनीं गोविंदरावांस अमात्यपदाचीं वस्त्रें लवकर मिळालीं नाहींत.

तारीख ८ माहे सप्टंबर रोजीं खुद्द महाराजांनीं राशिवडें ठाण्यावर स्वारी करून ठाणें घेतलें, कितीएक लोकांचीं घरें लुटलीं, व सांपडलेली चीजवस्त करवीरास रवाना करून, विठोजी मोहिते व सोनाजी जाधव यांजबरोबर लोक देऊन त्यांस बावड्याकडे पाठविलें.

मोहित्यानें बावेली खोरीस येऊन, तेथील गांवें लुटून उध्वस्त केलीं आणि बावड्याकडे चाल केली. इतक्यांत त्यास बातमी समजली कीं, अमात्यांनीं बावडा येथें चांगला बंदोबस्त करून आपल्या पारिपत्याची तयारी चालविली आहे. तेव्हां मोहिते यानें बावड्याकडे जाण्याचा बेत रहित करून आपले कांहीं लोक करवीरास परत पाठविले, आणि आपण

बाकींच्या लोकांसह साळवणावर आला. तो साळवणास पोंचण्यापूर्वींच तेथील ठाण्याच्या बचावाचा बंदोबस्त झाला होता. ह्मणून मोहिते यानें ठाण्यावर हल्ला करण्याचा बेत सोडून देऊन आजूबाजूचे गांव मात्र लुटले.

साळवणकामगार गोविंद रघुनाथ वाघुर्डेकर याचीं मुलेंमाणसें वाघुर्डे गांवीं होतीं. त्यांस धरून आणण्यासाठीं मोहिते याचे लोक तिकडे गेले होते; परंतु तीं जंगलांत जाऊन राहिलीं होतीं, त्यामुळें त्यांस सांपडलीं नाहींत.

यावेळीं अमात्य फार आजारी होते, ह्मणून त्यांनीं मोहित्याच्या बंदोबस्ताची व्यवस्था बळवंतराव मामा राजगोळीकर यांजवर सोंपविली होती. राजगोळीकर यांनीं साळवणाजवळचे मेढ्यांत जास्त लोक पाठवून दारूगोळ्यांचा पुरवठा केला. त्याप्रमाणेंच शिवगड व बावडा येथेंही लढाई देण्याची तयारी राखिली. राजापुरास तेथील नामांकित जहाजाचे व्यापारी सांपळे यांजकडे लढाऊ अरब पाठविण्यास लिहिलें. *

साळवणकामगार वाघुर्डेकर यानें विचारल्यावरून अमात्यांनीं त्यास हुकूम दिला कीं, "हुजुराहून लोक आले असतां त्यांस ठाण्यांत घ्यावयाचे नाहींत. अगोदर तुह्मीं गोळी घालूं नका. त्यांजकडून आरंभ झाल्यास घालणें प्राप्तच आहे. हुजूरची स्वारी आल्यास निभावणी पाहून वर्तन ठेवा. तुह्मांकडे लोक पाठविले आहेत, व

---

* **टीप**—मराठी राज्य स्थापन होत असतां बंदरचे मोठमोठ्या व्यापाऱ्यांकडून सैन्याचे भरतीकरितां लोक, सैन्य व तोफा आणि दारूगोळा याची मदत होत असे. या वेळचे मोठे व्यापारी आपले संपत्तीचे, जहाजाचे आणि व्यापाराचे संरक्षणाकरितां लढाऊ लोक तोफा, बंदुका वगैरे हत्यारें आणि दारूगोळा वगैरे युद्धोपयोगी साहित्य बाळगीत असत; आणि परदेशांतून अशा प्रकारचें साहित्य व लोक आणवूनही देत असत. लढाई चालविण्यास कर्जरूपानें द्रव्याची मदत करीत असत

आणखीही पाठवीत आहों. हत्ती तेथेंच असूं द्यावा. कोल्हापुरास गोपाळ नारायण अगर लक्ष्मण गंगाधर यास पाठवून दररोज महाराजांकडील हालचालीचें वर्तमान आणवून इकडे कळवीत जावें, आणि ठाण्याचा बंदोबस्त राखून सावधपणानें असावें."

याप्रमाणें इकडे व्यवस्था राखण्याचें काम चालू असतां, कोल्हापुरास महाराजांकडे तेथील कारभारी-मंडळीचे मार्फत अमात्यांचे वकील वस्त्रें मिळणें, गल्ल्याची बाकी, प्रांतांत होत असलेला उपद्रव, यांजविषयींचें बोलणें बोलत होते.

इतक्यांत मोहिते साळवणाहून कोल्हापुरास आला. त्यानें महाराजांस कळविलें कीं, 'अमात्यांनीं लढाईची तयारी केली आहे.' तेव्हां वकिलांचें बोलणें तितकेंच रहात होतें. परंतु वकील यांनीं विनंति केली कीं, 'बावडा घेण्याची सरकारची इच्छा असल्यास अमात्य देण्यास तयार आहेत.' यावरून पुढें कांहीं दिवसांनीं महाराजांनीं वस्त्रें देण्याचा व घेतलेल्या ठाण्यांच्या सोडचिठ्या देण्याचा ठराव केला.

यावेळीं गोविंदराव यांची प्रकृति फार बिघडली होती. ह्मणून परवानगी झाली असतांही वस्त्रें घेण्यास दिरंगाई दिसूं लागली. ती पाहून अमात्यांच्या वकिलांस महाराजांनीं सांगितलें कीं, 'अमात्य नजराणा भरून वस्त्रें घेतात किंवा आह्मीं साळवण वगैरेकडे लोक रवाना करावे? याचा जबाब लवकर आणवून द्यावा.'

यापुढें थोड्याच दिवसांत गोविंदरावाची प्रकृति सुधारली, ह्मणून इ० स० १८२६ चे आक्टोबर महिन्यांत यांनीं पदाधिकाराचीं वस्त्रें घेतलीं. या वेळीं यांचें वय पंचवीस वर्षांचें होतें.

यापुढें आगष्ट महिन्यांत महाराजांनीं अमात्यांकडे तोफेचे गोळे पाठविण्याविषयीं आज्ञापत्र पाठविलें होतें. त्याप्रमाणें ते पाठविण्यांत आले.

गोविंदराव यांची सडी स्वारी राशिवडें गांवीं असतां, महाराजांचे एका लुटारू टोळीनें त्यांस धरून नेण्याचा प्रयत्न केला; परंतु हा त्यांचा यत्न अमात्यांचे केसकर हवालदाराचे शौर्यानें व हुषारीनें पूर्णपणें फसला. केसकराचे या सावधगिरीचे व शौर्याचे कामगिरीकरितां त्यास अमात्यांनीं अबदागिरी धारण करण्याची परवानगी देऊन खर्चाची नेमणूक करून दिली.

इ० स० १८२६ या सालीं महाराज व इंग्रज सरकार यांजमध्यें तह झाला. त्यांत दुसरे कलमांत महाराजांनीं कबूल केलें कीं, 'कागलकर, इचलकरंजीकर व दुसरे जहागिरदार यांस उपद्रव करणार नाहीं.' या तहाप्रमाणें महाराज वागले नाहींत ह्मणून इ० स० १८२७ व १८२९ या सालीं इंग्रजसरकारनें नवे तह करून घेतले; तेव्हांपासून इतर संस्थानिकांप्रमाणें अमात्यांसही महाराजांकडून उपद्रव पोहोंचला नाहीं.

इ० स० १८२७ चे सप्टंबरांत अमात्यांची प्रकृति बिघडली होती. याच सालीं माधवराव व त्यांचे वडील बापूसाहेब यांनीं बैदा करून नंदगांव हा गांव करवीर सरकारांत गुंतविला.

इ० स० १८२८ त सातारा अमात्य सर्वोत्तमराव यांचा दत्तक पुत्र जयवंतराव ऊर्फ बाजीराव हा मृत्यु पावला.

याच सालीं अजम निसपिटसाहेब हे महाराजांचे परवान्यानें सहकुटुंब गगनगड किल्ला पाहण्यास आले होते.

इ० स० १८२९ या सालीं नंदगांव घराण्यांतील कोल्हापूरचे सचीव यांजबद्दल धारवाड मुक्कामीं, सनदापत्रांवरून त्यांचे हक्क कोणत्या प्रकारचे ठरतात याचा एजंट साहेब तपास करीत होते.

अमात्य यांची कन्या मनुबाई यांचा विवाह पेशव्याचे सरदार त्र्यंबकराव राजेबहादूर यांशीं इ० स० १८२८ त झाला. त्र्यंबकरावांचे

वडील मृत्यु पावल्यापासून त्यांचे अज्ञानदशेंत त्यांच्या उभयतां माता जहागिरीचें काम पहात होत्या. पुढें त्या दोघींत तंटे उत्पन्न झाले व दौलतीस फार कर्ज झालें. तेव्हां गोविंदरावांनीं तेथील एजंट साहेबांस थैली लिहिली कीं, सरकारांतून कारभारी नेमून जहागिरीची व्यवस्था लागावी. त्यावरून एजंट साहेबांनीं चौकशी करून ठरविलें कीं, जहागीरदार यांचे खऱ्या अगत्याचे अमात्य हे आहेत. याकरितां अमात्य यांनींच ती व्यवस्था लावावी. त्यावरून अमात्यांनीं इ० स० १८२१ त कारभारी नेमून व्यवस्था केली; परंतु पुढें थोड्याच दिवसांनीं मनुबाई व नंतर त्यांस झालेला पुत्र अशीं उभयतांही मृत्यु पावलीं. ह्मणून त्यापुढें अमात्यांनीं तिकडील संबंध सोडून दिला.

याच सुमारास सातारा अमात्य सर्वोत्तम बाबूराव ऊर्फ तात्यासाहेब हे छत्रपतींचें व आपलें जमेना ह्मणून पुणें येथें जाऊन राहिले. हें वर्तमान गोविंदराव यांस समजतांच, त्यांनीं या कामीं आपण छत्रपति यांजकडे कारकून पाठवून तडजोड करावी असा बेत करून, तसें करण्याविषयीं सर्वोत्तमराव तात्यांची संमति विचारिली. तेव्हां त्यांजकडून उत्तर आलें कीं:—"तुह्मीं तेथून या गोष्टीची पैरवी करावी असा कांहीं प्रकार नाहीं. छत्रपतींचें व आमचें दुसऱ्यांनीं बोलून जमवावें हाही अर्थ नाहीं. पूर्वजांनीं संपादिलेल्या मुखत्याऱ्या व हुकमती गमावून कालावर नजर देऊन उपजीविका करावी असें आपल्या कोणीही वडिलांनीं केलें नाहीं; हल्लीं करावें अशीही आम्हीं गरज बाळगून नाहीं. नाहींपेक्षां छत्रपतींकडे आमचे आम्हीं गेल्यास दुसऱ्या कोणाची रदबदली किंवा भीड पाहिजे असें नाहीं. आम्हीं येथें त्याच उद्योगांत आहों."

हें पत्र येतांच गोविंदरावांनीं पुण्यांतील आपले कारकुनास आपले ह्मणण्याची सत्यता तात्यांस समजावून देऊन, त्यांचें मन वळविण्या-

विषयीं लिहून, तात्यांस लिहिलें कीं, "आपलें पत्र पोंचलें; आपण लिहिलें कीं आम्हीं येथें त्याच उद्योगांत आहों, त्यास जेथील तेथेंच उद्योग व्हावा हें प्रशस्त. तें व हें संस्थान एकच आहे. त्याअर्थी इकडून कारकून जाऊन पैरवी व्हावी असेंच आज्ञोत्तर यावें. हें कार्य दिवसगतीवर जाणें नीट नाहीं. वडिलांनीं अधिकार संपादिला व त्याप्रमाणें आजवर चालला. पुढेंही चालवावा हेंच लौकिकांत चांगलें. परंतु प्रस्तुत दिवस प्रकारांतराचे आहेत, आणि वर्तमानकालाप्रमाणें चालणें प्राप्त आहे. याकरितां तादृश आग्रह न धरितां, बखेडा पडल्याठिकाणींच प्रयत्न व्हावा. परभारें उद्योगानें शीघ्र बंदोबस्त होणार नाहीं. आग्रह धरून सर्वस्वाचा त्याग योग्य नाहीं. वडिलांनीं सुकृतयोगें संपादिल्याचें रक्षण होईल तितकें प्रयत्नानें करावें. आपलें रहाणें साताऱ्यास व्हावें आणि तेथेंच या गोष्टीचा बंदोबस्त व्हावा असा फार मानस आहे."

इ० स० १७३३ या सालीं गोविंदरावांस पुत्र झाला. तेव्हां त्याचें नांव रामचंद्रराव ठेवावें, असें महाराजांचें आज्ञापत्र आलें.

राजघराणें व अमात्यघराणें यांजमध्यें परस्परांशीं एककुटुंबीयत्वाचा व अंतःकरणपूर्वक पूज्यबुद्धीचा संबंध वंशपरंपरागत चालत आला असून तो केव्हां केव्हां शिथिल झालासा दिसे. तथापि थोड्याच वेळांत त्यास पूर्वीचें पूर्ण रूप प्राप्त होत असे. हें वरील उदाहरणावरून स्पष्ट दिसून येतें. गेल्या पांच सहा वर्षांपासून गोविंदरावांवर महाराजांचा विशेष लोभ जडत चालला होता. ते यांचे प्रकृतीविषयीं फार काळजी वाहत असत. असें त्यांचीं यांजबद्दलचीं आज्ञापत्रें व्यक्त करीत आहेत.

असें सांगतात कीं, महाराज हे अमात्य व कांहीं सरदार यांसह शिकारीस गेले असतांना एका हरणाचा पाठलाग सुरू झाला.

त्यांत महाराजांसह सर्व शिकारीमंडळी थकली. तेव्हां महाराजांची अमात्यांस आज्ञा झाली कीं, तुह्मीं शिकार मारा. त्यावरून अमात्यांनीं तसाच पाठलाग करून हरिण मारिला; आणि घोड्यावरून उतरतात तोंच घोडा श्रमामुळें तत्काळ जमिनीवर पडून मृत्यु पावला. ही बातमी महाराजांस पोहोंचतांच स्वारी स्वतः तेथें येऊन बोलली कीं:—"घोडा मेला, बेहेत्तर आहे; परंतु शिकार मारिली ही उत्तम गोष्ट झाली. गोविंदराव तुमची शाबास आहे." इत्यादि अनेक शब्दांनीं महाराजांनीं अमात्यांची प्रशंसा केली.

इ० स० १८३४त हुजूर निसबतीचे पथकांतील सातशें लोक बदमामला करून बावड्याकडे निघाले. महाराजांनीं त्यांस साळवणापुढें न सोडण्याविषयीं व आश्रय न देण्याविषयीं अमात्यांस लिहिलें. त्यावरून अमात्यांनीं त्या लोकांस साळवणानजीक प्रतिबंध करून ठेवून घेतलें. नंतर त्या लोकांची समजी करून त्यांस परत नेण्याकरितां आलेल्या हिंमतबहाद्दरांचे स्वाधीन केलें; आणि कृपाळूपणानें त्या लोकांचा अर्ज मनास आणणेंविषयीं महाराजांकडे विनंतिपत्र पाठविलें.

याच सालीं गोविंदराव फार आजारी पडले. आपण या आजारांतून बरे होऊं अशी त्यांस आशा राहिली नाहीं. ह्मणून यांनीं आपले पूर्वघरचे चुलत बंधू रघुनाथराव यांस दत्तक घेतलें; आणि नंतर प्रकृतीस आराम पडावा ह्मणून हे श्रीनरसिंहवाडीस जाऊन राहिले. तेथें आराम पडेना तेव्हां तेथून बेडकीहाळास जाऊन राहिले. तेथेंच आजार जास्त होऊन यांस मृत्यु आला. यांचें शव बेडकीहाळाहून बावड्यास आणून त्याचें सार्थक केलें.

यांनीं आपले मरणापूर्वीं डंबाळकर, पोतनीस, विठ्ठलपंत ढवळे, आणि अंताजी बाबूराव वायंगणकर यांस दत्तकाचे अल्पवयांत संस्थानची व्यवस्था करण्यास नेमिलें होतें.

यांची वडील स्त्री राधाबाई यांस एक कन्या व दुसरी भवानीबाई यांस दोन पुत्र अशीं तीन अपत्यें झालीं होतीं; परंतु तीं यांचे मरणापूर्वीं मृत्यु पावलीं होतीं.

हे मोठे भव्य होते. कोणाही शिपायास यांच्या तोंडाकडे पाहण्याचें धैर्य होत नसे. हे राज्यकारभारांत मोठे दक्ष होते. यांस यांचे वडिलांचे कारकीर्दींत कारभाराचे कामाचा चांगला अनुभव आला होता. यांस करवीर दरबारची उत्तम माहिती झाली होती. त्यायोगानें आपल्या कारभाराचें धोरण कसें असावें हें यांस उत्कृष्ट अवगत होतें. यांनीं फार सावधगिरीनें वागून बहुतेक कर्जाचा निकाल केला; महाराजांची मर्जी सुप्रसन्न राखिली. जागजागीं कोठ्या स्थापून धान्यसंग्रह केला, आणि त्याचा विनियोग आपत्काळीं रयतेचा बचाव करण्यांत केला. बावडा येथील कोठीस आपल्या स्त्रीचें भवानी हें नांव दिलें, तें अद्यापि चालू आहे. यांचें आपल्या प्रजेवर पुत्रवत् प्रेम होतें.

यांनीं महाराज व आपण यांमध्यें मतभेद होऊन विकोपास जाणारीं—गोसाव्याची जिनगी व याच प्रकारचीं कितीएक लहान मोठीं—प्रकरणें तजविजीनें व युक्तीनें मिटवून महाराजांची मर्जी प्रसन्न राखिली. गांवांनीं अथवा कुळांनीं आपणांवर जुलूम होतो ह्मणून सरकारावर रुसून पर अमलांत वसाहतीस जावें, आणि नंतर त्यांची सरकारनें समजी करून त्यांस परत आणावें, अशी फार दिवसांपासून चालत आलेली वहिवाट ( असे दाखले दप्तरांत आहेत ) यांचे कारकीर्दींत यांनीं जुलुमाची बंदी करून कमी केली. अशा अनेक गुणांनीं हे या कालचे लोकांत वर्णनीय असे होते.

———

# भाग ४ था.

## रघुनाथराव गोविंद.

### ( इ० स० १८३५ पासून १८४५ पर्यंत. )

रघुनाथराव यांस गोविंदराव दादासाहेब यांनीं आपल्या हयातींत दत्तक घेतलें होतें. यांस महाराजांकडून नजराणा घेऊन इ० स० १८३५ च्या जुलै महिन्यांत पदाधिकाराचीं वस्त्रें मिळालीं. यावेळीं यांचें वय सुमारें पांच वर्षांचें असून, हे शरीरप्रकृतीनें अशक्त होते. यामुळें कदाचित् थोड्याच दिवसांत ( रघुनाथराव यांचें वय दहा वर्षांचें होईपर्यंत) दुसरा दत्तक घेण्याचा प्रसंग आलाच तर पुनः नजराणा घेतला जाऊं नये असा ठराव झाला होता.

यांचे कारकीर्दींत प्रथम संस्थानचा कारभार, गोविंदराव दादासाहेब यांनीं नेमिलेली मंडळी चालवित होती. या मंडळींत वायंगणकर, डंबळकर, पोतनीस, नाईक वगैरे इसम होते.

असें असतां यांतील वायंगणकर हे कांहीं कामाकरितां घाटाखालीं आपले घरीं गेले असतां रघुनाथराव यांचे जनक भीमराव ऊर्फ बापूसाहेब हे बावडा येथें येऊन राहिले. बापूसाहेबांनीं बावड्यास येऊं नये असा ठराव पूर्वीं एका तंट्याचे कामीं कोल्हापूर दरबारांतून झाला होता. वायंगणकर यांस बापूसाहेब बावड्यास आल्याचें समजतांच, त्यांनीं डंबळकरप्रभृति आपल्या जोडीदारांस लिहिलें कीं, बापूसाहेब यांस बावडा येथून काढून लावावें. हें पत्र येतांच बाकीच्या कारभाऱ्यांस विचार पडला कीं, यजमानांचे जनकास येथें राहूं नका असें कोणीं व कसें ह्मणावें? शेवटीं ही वार्ता बापूसाहेबांस समजली, तेव्हां त्यांनीं डंबळकर आदि मंडळीस बोलावून आणून ठरविलें कीं, वायंगणकर

यांसच कारभारांतून काढून टाकावें आणि मुख्यत्वें डंबळकर यांनीं इतरांचे अनुमतानें कारभाराचें काम करावें. त्यावरून बापूसाहेबांचे अनुमतानें डंबळकर हे कारभाराचें काम चालवूं लागले.

हें वर्तमान वायंगणकर यांस समजतांच ते परभारें फोंडा घाटानें कोल्हापुरास गेले. तेथें त्यांस रामचंद्र गुंडो ढवळे हे सामील झाले. ढवळे हे संस्थानांतील प्रमुख गृहस्थांपैकीं असून, त्यांजवर गोविंदराव दादासाहेब यांची गैरमर्जी झाली होती. तेव्हांपासून ते करविरीं रहात होते. ढवळे यांचें करवीर-दरबारमंडळांत दळणवळण होतें. कांहीं दिवसांनीं डंबळकर हे राशिवडें येथें आपले घरीं गेल्याची बातमी राखून वायंगणकर व ढवळे यांनीं महाराजांकडून त्यांस धरवून करविरीं नेण्याचा यत्न केला. यावेळीं बळवंतराव लुगडे या नांवाचा आणखी एक बावडेसरकारावर रुसलेला इसम करविरीं रहात होता. त्यास डंबळकरास धरून आणण्याचा महाराजांचा हुकूम झाला. त्यावरून लुगडे आपले सांथीदारांसह राशिवड्यास येऊन त्यांनीं डंबळकरास धरून गांवापासून बऱ्याच दूरवर नेलें. इतक्यांत राशिवडें-पागेंतील स्वारांनीं त्यांस सोडवून आणून बावड्यास सुरक्षितपणें पोंचतें केलें. (इ० स० १८३६ भाद्रपद मास.)

पुढें वायंगणकर यांनीं नवे लष्करी लोक चाकरीस ठेऊन त्यांतील सहासातशें निवडक लोक बरोबर घेतले, आणि त्या लोकांसह अकस्मात् बावड्यास येऊन डंबळकर कारभारी यांस धरून शिवगड किल्ल्यावर प्रतिबंधांत ठेविलें. पोतनीस, नाईक वगैरे मंडळींकडून हजार, पांचशें असे रुपये गुन्हेगारीबद्दल दंड ह्मणून घेतले, आणि आपण व ढवळे असे कारभाराचें काम पाहूं लागले. (इ० स० १८३७ वैशाख.)

या उभयतांनीं कांहीं दिवस पूर्ण मुखत्यारीनें कारभाराचें काम केलें. त्या मुदतींत संस्थानास फार कर्ज झालें, यांनीं आपल्या इच्छेस येईल त्या इसमास व स्वतःस इनामाच्या सनदा करून दिल्या व घेतल्या. अशा ५९ सनदा यांच्या थोड्या मुदतीच्या कारभारांत झाल्या. कर्जास गांव लावून दिले. कर्ज फिटलें असतांही सावकारांकडे गांव तसेच चालू दिले. रयतेवर जुलूम होऊं लागला, व त्यांची दाद लागेनाशी झाली. संस्थानाशीं करवीर--कारभाऱ्यांतील रावजी वाकनीस यांनीं स्वतः व आपले निसबतीचे लोकांकडून कर्जाचा व्यापार चालू केला. त्यांत व्याज, मनोती, दरबारखर्च वगैरे रकमा धरून दस्त झाले. एकंदरींत या उभयतांचे कारभारापासून संस्थान व रयत या उभयतांसही उपद्रव पोंचला.

इ० स० १८४१ आगष्ट तारीख २३ चें महाराजांचें आज्ञापत्र कीं, 'मनोहरगडचे बंदोबस्तास आनंदराव पंडित मंत्री यांस पाठविले आहेत. आपलेकडून कामदार देऊन १०० लोक त्यांजकडे पाठवावे.

या आज्ञापत्राप्रमाणें लोक देऊन चिमणाजी लिंगो देसाई यांस तिकडे पाठविलें.

वर लिहिलेप्रमाणें कारभार चालत असतां बापूसाहेब यांनीं कर्नाटकचे एजंट कर्नल टौसन साहेबांकडे कारभाऱ्यांचे विरुद्ध तक्रारी केल्या. करवीरदरबारांत रयतेचे तक्रारीचे अर्जावर अर्ज झाले, त्यावरून करवीरदरबारांतून कारभाराचे चौकशीकरितां इ० सन १८४१ त दिनकरराव गाइकवाड बावड्यास आले. पुढील सालीं इ० स० १८४२ त अप्पाजी बल्लाळ हे आले. तसेंच याचसालीं एजंट साहेबांकडून काशीपंत अखबरनवीस व राघो गोविंद परांजपे असे तपासणीकरितां आले.

करवीर दरबारांतून व एजंटसाहेबांकडून चौकशीस आलेले कामगार यांनीं उभयतां कारभाऱ्यांकडे हिशेब देण्याविषयीं तगादा लावून, दिसलेल्या अव्यवस्थेचे रिपोर्ट केले. शेवटीं इ० स० १८४३ त सदरहू कारभारी हिशेब गुजरण्यास बेळगांवीं साहेब यांजकडे गेले. हिशेब घेत असतां ढवळे यांची कारभारांत तकशीर दिसल्यावरून त्यांस एजंट साहेबांनीं कारभारांतून काढून टाकिलें; आणि पुढें हिशेब घेण्याचें काम करविरास नवे नेमिलेले कारभारी दाजी कृष्ण पंडित यांजवर सोंपाविलें.

भीमराव बापूसाहेब इ० स० १८४२ त मृत्यु पावले. त्यानंतर त्यांचे कन्येनें एजंटसाहेबांस कळविलें कीं, अल्पवयी रघुनाथराव यांची व त्यांचे संस्थानचे कारभाराची व्यवस्था नीट रहात नाहीं, त्याचा बंदोबस्त व्हावा. त्यावरून एजंट साहेबांनीं रघुनाथरावांस बेळगांवीं आपणांकडे आणविलें, आणि पुढें कोल्हापुरास महाराजांबरोबर विद्याभ्यासास ठेवण्याचें ठरवून कोल्हापुरास पाठवून दिलें.

पंडित कारभारी हिशेब घेत असतां वायंगणकर यांजवरही ढवळ्याप्रमाणेंच दोष येऊन, त्यांनीं त्यांस कारभारांतून काढून करवीर दरबारांतून दिनकर रघुनाथ यांस कारभाराचे कामावर पाठविलें.

दिनकर रघुनाथ यांनीं मागील हिशेबाचें काम पुरें केलें आणि तें गुदरण्याकरितां करविरीं नेलें. तेथें हिशेब देत असतां बंड होऊन, त्यांत बंडवाल्यांनीं पंडित कारभारी यांस प्रतिबंध केला; त्यांजबरोबर बावडे-कारभाऱ्यांसही प्रतिबंध झाला. पुढें बंडाची शांतता झाल्यावर त्यांतून मुक्त होऊन व हिशेब गुदरून कारभारी बावड्यास आले.

हें बंड करवीर इलाख्यांत पसरलें असून, त्याचे बंदोबस्तास इंग्रजसरदार कर्नल औटराम हे इ० स० १८४४–४५ त आले. त्यांनीं गगनगडकरी व शिवगडकरी यांस लिहिलें कीं, "त्यांनीं बंडवाल्यांस आश्रय देऊं नये." त्याप्रमाणें दोन्ही गडांनीं बंडवाल्यांस आश्रय

दिला नाहीं. बाबाजी आयरेकर वगैरे बंडवाल्यांचा मुक्काम पाट्याचे डंगांत असतां व ते किल्ल्याचा आश्रय मिळविण्याचे खटपटींत असतां, गडकऱ्यांनीं त्यांजवर गोळ्या घालून त्यांस तेथून हांकून लाविलें. बंड-वाल्यांनीं गगनगडाचाही आश्रय मिळविण्याचा पराकाष्ठेचा यत्न केला होता; परंतु तोही सफल झाला नाहीं.

यानंतर कर्नल औटराम यांनीं गगनगडकरी यांस लिहिलें कीं, "कितीएक गड बदलल्यामुळें लोकांची फार खराबी झाली. यापुढें तसें होऊं नये ह्मणून बंडाचें शमन होईपर्यंत किल्ला सरकारचे स्वाधीन करण्याविषयींचें बोलणें करण्याकरितां तुमच्यापैकीं प्रमुख असामींनीं पन्हाळ्यानजीक लष्कर मुक्कामीं यावें." त्याप्रमाणें सरनोबत वगैरे लोक लष्करांत जाऊन तेथें किल्ला स्वाधीन करण्याचें बोलणें ठरवून, किल्ला घेणारे लष्करी लोकांसहित परत किल्ल्यास आले आणि त्यांनीं आलेले लोकांचे स्वाधीन किल्ला केला. पुढें करवीर इलाख्यांतील दरोबस्त किल्ले पाडण्याचें ठरल्यावरून, गगनगड व शिवगड हे इ० स० १८४६ त अंशतः पाडून टाकिले.

इ० स० १८४५ त ज्येष्ठ मासीं रघुनाथराव यांचें लग्न मुद्देहळ्ळीकर नाडगौडे यांचे कन्येशीं झालें. पुढें याच सालचे नवंबर महिन्यांत रघुनाथराव मृत्यु पावले. हे अल्पवयी होते. यामुळें संस्थानच्या कोणत्याही बऱ्या वाईट कृत्याशीं यांचा संबंध नव्हता. यांची बुद्धि-मत्तेविषयीं अल्पवयांत मोठी प्रसिद्धि होती. यांस संतति नव्हती.

यांचे कारकीर्दींत, जुनें कारभारी मंडळ असतां संस्थानची फार अव्यवस्था झाली. ती दिनकर रघुनाथ हे कारभारी झाल्यापासून कमी होत जाऊन संस्थानचीं कामें सुरळीत चालू लागलीं. कर्जाची व्यवस्था लागली. खर्चाचा ठराव झाला. साळवण व बावडा येथें अन्नसत्रें सुरू झालीं. सर्व कामें इंग्रजी राज्यपद्धतीप्रमाणें चालू लागलीं.

# जानकीबाईसाहेब व रामराव रघुनाथ.

इ० स० १८४७ पासून १८४९ पर्यंत.

रघुनाथरावांचे मरणानंतर त्यांची पत्नी जानकीबाईसाहेब यांनीं आपणास दत्तक मिळण्याविषयीं करवीर–कारभाऱ्यामार्फत मुंबईसरकारांत काम चालविलें.

रघुनाथरावांनीं मरणसमयीं गादीस मालक केला नव्हता, आणि त्यांस संततीही नव्हती, ह्मणून त्यांचे मरणानंतर इंग्रजसरकारांतून संस्थानचे तळघांट–मुलुखाची अमानी वहिवाट रत्नागिरी–कलेक्टर-मार्फत सुरू झाली.

इंग्रजसरकार व बावडे संस्थान यांमध्यें साळशी महालचे सुमारें १०० गांवांतील उत्पन्नाविषयीं – ज्यास संस्थानचे लोक "दीड तक्षिमेचा हक्क" असें ह्मणतात — फार दिवसांचा लढा होता. हा संस्थानचा हक्क असा कीं, त्या सर्व गांवचे उत्पन्नापैकी ३/१० बावडे संस्थान व ७/१० पेशवे किंवा इंग्रज सरकार असा विभाग होऊन तो ज्याचा त्यास मिळावयाचा. इंग्रजकामगारांची इच्छा, असा दुतर्फी अम्मल असूं नये, अशी होती. या हक्काचे मोबदला संस्थानास स्वतंत्र गांव नेमून देण्यास ते तयार होते; परंतु, पूर्वींपासूनचे संस्थानिकांचा हेतु, आपला मोठ्या प्रदेशावर असलेला अम्मल आकुंचित करण्याचा नव्हता: याप्रमाणें इंग्रजकामगार व संस्थानिक यांजमध्यें वादविषय असून, त्याजबद्दलचीं कामें एकमेकांमध्यें इ० स० १८१८ पासून चालू होतीं. अमात्यांस नाकबूल असलेली गोष्ट यावेळीं साधून घ्यावयाची असें इंग्रजकामगार यांनीं मनांत आणिलें; परंतु या गोष्टीस संस्थानची कबुली पाहिजे होती. ती मिळण्याकरितां मुंबईसरकारांतून बावडेकारभारी यांस लिहून आलें कीं, या अमलाबद्दल स्वतंत्र गांव

नेमून मिळावे अशी रघुनाथराव यांचे कुटुंबाची कबुली घेऊन पाठवावी. यावर कारभारी यांजकडून लिहून गेलें कीं, बाईसाहेब अज्ञान आहेत. त्यावर पुनः लिहून आलें कीं, या कामीं संस्थानच्या दरखदारांची कबुली घेऊन पाठवावी.

या वेळीं दरखदारांची स्थिति अशी होती कीं, त्यांनीं करवीर दरबारांतून नेमिलेल्या कारभाऱ्याचे हाताखालीं केवळ कारकुनासारखें काम करावें. याशिवाय या प्रसंगीं दत्तक न मिळतां संस्थान खालसा होण्याचीही भीति होती. अशा स्थितींत त्यांस कबुलीजबाब देण्यावांचून गत्यंतर नव्हतें. यामुळें तसा त्यांना कबुलीजबाब द्यावा लागला.

अशा रीतीनें कबुलीजबाब घेऊन, मुंबईसरकारानें, ज्याची जमाबंदी वाढावयाची नाहीं असे खोतीहक्काचे तेरा गांव निवडून ते या हक्काचे मोबदला देण्याचा ठराव केला. यामुळें वाढत्या जमाबंदीचे गांवावरचे हक्क जाऊन सदर प्रकारचे तेरा गांव मिळण्यांत संस्थानचा तोटा झाला. याशिवाय दीड तक्षिमेच्या गांवांची जमाबंदी धरतांना मोतर्फा व जकातीचें उत्पन्न हिशेबीं घेतलें नव्हतें, यामुळें आणि नाण्याच्या बटणावळीमुळें जमाबंदी कमी धरली गेली. यापासून तोटा झाला तो वेगळाच. या व्यवहारांत इंग्रज सरकारास वाढणारे जमाबंदीचा फायदा मिळून कमी जमाबंदी धरल्यापासूनचाही फायदा झाला.

याप्रमाणें नुकसानी सोसून व बावडा घाटाचे जकातीचा हक्क करवीरसरकारांत— "अर्थात् त्याचें उत्पन्न"— सोडून दिलें, तेव्हां दत्तक घेण्याची मंजुरी मिळाली.

ही मंजुरी आल्यानंतर जानकीबाईसाहेब यांनीं ता० १९ आक्टोबर सन १८४७ इसवी रोजीं माधवराव पंडित नंदगांवकर यांचे पुत्र दत्तक घेऊन त्यांचें नांव रामराव असें ठेविलें. यावेळीं रामराव यांचें वय २०

वर्षांचें असून, यापूर्वीच त्यांचें लग्न श्रीनिवासराव देशपांड्ये कापशीकर यांचे कन्येशीं झालें होतें. यांचें दत्तविधान होईपर्यंत संस्थानचें सर्व काम जानकीबाईसाहेब यांचे नांवें चालत होतें.

रामराव गादीवर असतां दिनकर रघुनाथ हे कारभाराचें काम पहात होते. यांचे वेळीं या संस्थानांत सार्वजनिक शाळा सुरू झाल्या.

गगनगडकरी यांनीं कारभारी यांजकडे जमावानें मागणें मागितलें. या जमावाचा परिणाम बंडापर्यंत होईल असें कारभारी यांस वाटून, त्यांनीं करवीर सरकारांतून इन्फंट्रीचे लोकांची एक कंपनी आणवून बावडा येथें ठेविली. पुढें कांहीं दिवसांनीं ती परत गेली; परंतु यामुळें त्या लोकांचे खर्चाकरितां ह्मणून ३४२० रुपये दरसाल कायमचे या संस्थानावर बसले.

रामराव हे ता० ६ माहे मे सन १८४९ इसवीं रोजीं मृत्यु पावले. यांनीं गादीचा उपभोग सुमारें दीड वर्ष घेतला. यांस कांहीं संतति नव्हती, यामुळें यांची स्त्री सीताबाई यांस दत्तक मिळावा अशी थैली मरणसमयीं गेली होती.

रामराव यांजकडे संस्थानचे कामाची मुखत्यारी नव्हती. यांच्या अल्प कारकीर्दींत विशेष गोष्टी कांहीं घडल्या नाहींत. या मुदतींत संस्थानचें काम करवीरदरबारचे देखरेखीखालीं पूर्वीं पाठविलेले कारभारी हेच चालवीत होते.

रामराव चांगले होतकरू होते. यामुळें त्यांजपासून आपणांस सुखप्राप्ति होईल अशी प्रजेस आशा होती.

# मोरेश्वरराव रामराव ऊर्फ बाबासाहेब अमात्य.

## इ० स० १८५० पासून इ० स० १८६७ पर्यंत.

पूर्वीचे कारकीर्दींत सांगितल्याप्रमाणें दत्तक मिळण्याचें काम चालून मंजुरी आल्यानंतर सीताबाईसाहेब यांनीं कारभारी यांचे अनुमतानें लक्ष्मणराव पंडित नंदगांवकर यांस दत्तक पसंत केलें; आणि त्यांस आणण्याकरितां सरंजाम पाठविला. परंतु, लक्ष्मणराव नंदगांवाहून येत असतां राशिवडें येथें त्यांची प्रकृति पिशाच्च-बाधेनें बिघडली; ह्मणून ते तेथेंच मुक्काम करून राहिले.

पुढें कारभारी यांनीं त्यांस मांत्रिकांकडून पुष्कळ उपचार करविले, तथापि गुण न येतां प्रकृति जास्तच बिघडत चालली. तेव्हां कारभारी व बाईसाहेब यांनीं त्यांची दत्तकाकरितां केलेली निवड रहित करून, शंकरराव पंडित यांचे पुत्र मोरेश्वरराव यांस दत्तक पसंत केलें. नंतर त्यांस बावडा येथें आणून, तारीख १३ माहे एप्रिल सन १८५० इ० रोजीं दत्तविधान करून गादीवर बसविलें; आणि त्यांचें नांव मोरेश्वरराव हेंच कायम केलें; यांस बाबासाहेब असें ह्मणत.

पुढें इ० स० १८५१ सालीं मोरेश्वरराव यांचा विवाह पेशव्यांचे सरदार वामनराव माधव रायरीकर यांचे कन्येशीं झाला. यांच्या विद्याभ्यासाची व्यवस्था पोलिटिकल ऑफिसर कोल्हापूर व सदर्न मराठा कंट्री यांनीं काळजीपूर्वक ठेविली होती.

इ० स० १८५२ त पूर्वीं ठरल्याप्रमाणें दीड तक्षिमेबद्दल विजयदुर्ग तालुक्यांतील तेरा गांव संस्थानाकडे आले; व तळघांट मुलुखाची अमानी वहिवाट बंद होऊन, तो प्रदेश पूर्ववत् संस्थानचे खास वहिवाटी-खालीं आला.

हे अमात्य चवथे शिवाजी महाराज यांचे लग्नसमारंभाकरितां इ० स० १८५४ त बडोदें येथें गेले होते. तेथें त्यांचे जनकपिते शंकरराव पंडित हे नवज्वराचे आजारानें मृत्यु पावले. या स्वारींत अमात्यांचे बरोबरचे नोकरांपैकीं पुष्कळ लोक महामारीचे आजारानें मृत्युमुखीं पडले.

मोरेश्वरराव यांनीं बडोद्याहून आल्यावर पुष्कळ दिवसांनीं आपले एका मित्रास आपल्या स्थितीचें एक पत्र पाठविलें; त्या पत्राची त्यांचे स्वतःचे हातची रफ कॉपी मिळाली आहे. त्यांतील तात्पर्य असें कीं, "मी दत्तक झालों, त्या वेळीं किती संकटांत होतों तें पहा! त्या वेळीं माझें वय १२ वर्षांचें होतें. माझ्या पूर्वींचे गादीवर बसणारे थोड्या थोड्या मुदतींत पिशाच्चबाधेनें मृत्यु पावले. लक्ष्मणराव यांस तर गादीवर बसविण्याचें ठरवितांच उपद्रव झाला. त्यापुढें मला दत्तक पसंत केलें. बावडा येथील गादीवर बसणारास पिशाच्चबाधा फार दिवस वांचूं देत नाहीं; अशी परंपरेची प्रसिद्धि असून, त्याप्रमाणें रोखठोकीचे अनुभवही होते. अशा स्थितींत दत्तकाची पाळी मजवर आली!! तेव्हां माझ्या मनाची स्थिति कशी झाली असेल, याची कल्पना करा. या सर्व गोष्टी माझे जनकपित्यास माहित होत्या. प्रथम त्यांचे मनांतून मला दत्तक द्यावयाचें नव्हतें. परंतु, इतके भाऊबंद असून, परगोत्रांतील दत्तक होणार ही गोष्ट त्यांस लांछनास्पद वाटली. तेव्हां त्यांनीं मोठ्या संकटानें – त्यांचा एकुलता एक मुलगा जो मी, त्या—मला दत्तक देण्याचें ठरविलें. त्यावेळीं मीं वडिलांस सांगितलें कीं, आह्मांस असलेलें उत्पन्न पुरें आहे. आपण मला दत्तक कबूल करूं नका. त्यावरून त्यांनीं माझें शांतवन केलें कीं, यापूर्वीं झालेले संस्थानचे मालक कृपण होते; ते दानधर्म करीत नसत. आपण पुष्कळ दानधर्म करूं ह्मणजे आपल्यास कांहीं भीति नाहीं. पुढें माझें

दत्तविधान होतांच वडिलांनीं धर्मसंबंधीं कायमचीं अनुष्ठानें सुरू केलीं; तसेंच अंगारे, धुपारे वगैरे अनेक तजविजी केल्या, आणि वडील नेहेमीं मजजवळ राहूं लागले. त्यापासून कांहीं दिवसांनीं माझी भीति गेली, आणि माझा काळ आनंदांत जाऊं लागला. परंतु, वडील बडोदा मुक्कामीं मृत्यु पावले, तेव्हांपासून एखादी आवडती वस्तु मागण्यास किंवा मनांतील गोष्ट सांगण्यास कोणी नाहींसें झालें; ह्मणून कांहीं दिवस चित्त उदास होतें. सरकारतर्फे कारभारी असत, त्यांपैकीं दिनकर रघुनाथ यांनीं माझी व्यवस्था चांगली ठेविली होती. त्यानंतरचे टिकेकर यांना तशी समाधानकारक व्यवस्था ठेवितां आली नाहीं. यापुढें मी थोडा प्रौढ झालों व माझी आणि पोलिटिकल ऑफिसर साहेब यांची ओळख झाली. मला जरूर ते पदार्थ त्यांस कळविलें असतां मिळूं लागले. त्यामुळें आतां माझी सर्व उदास वृत्ति नाहींशी झाली आहे".

इ० स० १८५८ त रामचंद्र सुबराव यांची पत्नी आनंदीबाई मृत्यु पावली.

इ० स० १८५९ चे एप्रिल महिन्यांत अमात्य यांनीं संस्थानचे कामाची माहिती करून घ्यावी, असें पोलिटिकल एजंट साहेब यांजकडून लिहून आल्यावरून, अमात्य हे कारभाऱ्यांबरोबर बसून सर्व खात्यांचीं कामें कशीं चालतात तें पाहूं लागले. पुढें याच सालचे नवंबर महिन्यांत अमात्य करविरीं असतां एजंट साहेब यांनीं त्यांची हुषारी व कामांतील माहिती पाहून, त्यांस मुखत्यारी मिळण्याविषयीं मुंबई–सरकारांत शिफारस केली.

इ० स० १८६० त मुंबईचे गव्हरनर सर बार्टल् फ्रियर हे करविरीं आले. त्यांस आणण्याकरितां अमात्य हे सहा-सात कोस पुढें गेले

होते; तेथें उभयतांची मुलाखत झाली. नंतर करविरीं गव्हर्नर व अमात्य यांच्या आणखी मुलाखती झाल्या, त्यांत अमात्यांची हुषारी व चलाखी पाहून गव्हर्नर साहेब फार खुष झाले, आणि पुढें थोड्याच दिवसांत त्यांनीं अमात्यांस त्यांचे संस्थानची मुखत्यारी दिल्हीं. हा समारंभ तारीख १० माहे एप्रिल सन १८६१ इसवी रोजीं झाला.

याच सालीं मे महिन्यांत चवथे शिवाजी महाराज, त्यांचे सरदार व एजंट साहेब असे शिकारीकरितां बावडा येथें आले. अमात्य यांनीं या स्वारीची व्यवस्था उत्तम ठेविली. त्यावरून महाराज व एजंटसाहेब खुष होऊन त्यांनीं अमात्य यांचे आभार मानिले.

यांस इ० स० १८६१ सालीं एक कन्या झाली; परंतु ती पुढें चार वर्षांची होऊन मृत्यु पावली.

इ० स० १८६२ त यांची आजी जानकीबाईसाहेब या श्रीकाशी-क्षेत्राची यात्रा करून परत आल्या.

इ० स० १८६३ या वर्षीं कोल्हापूरचे शिवाजी महाराज यांस मुखत्यारी देतेवेळीं इंग्रजसरकार व महाराज यांचेमध्यें एक तह ठरला. त्यांत आठवे कलमांत "मोठे मोठे जहागीरदार पोलिटिकल एजंट यांचे देखरेखीखालीं असावे" असें नमूद झालें. यापासून या व इतर संस्थानचा इंग्रजसरकाराशीं एक निराळा संबंध असल्याचें स्पष्ट झालें.

इ० स० १८६६ त करविरीं शिवाजी महाराज फार आजारी असल्याचें अमात्यांस नाधवडें मुक्कामीं समजलें. हे दिवस ऐन पावसाचे होते. तरी अमात्य महाराजांस भेटण्याकरितां निघाले व साळवणानजीक मरळी गांवीं आले. त्या ठिकाणीं, महाराज पूर्वरात्रीं ह्मणजे तारीख ४ आगष्ट रोजीं कैलासवासी झाल्याचें वृत्त यांस समजलें. तेव्हां यांनीं विचार केला कीं, ज्यांच्याकरितां डोंगराळ मार्गांतील पाऊस, नदीनाले

व चिखल यांस जुमानिलें नाहीं, करविरीं महामारीचा जोराचा वाखा असल्याची भीति बाळगिली नाहीं, त्यांची भेट आतां व्हावयाची नाहीं; तेव्हां अशा निकडीनें जाण्यांत कांहीं अर्थ राहिला नाहीं. ह्मणून अमात्यांनीं लागलीच पुढें जाण्याचें रहित करून साळवणास परत येऊन मुक्काम केला.

महाराजांचे मृत्यूनें अमात्यांस अत्यंत दुःख झालें. उभयतांही हुषार असून परस्परांचे गुण परस्पर जाणत होते. किंबहुना उभयतांचा—सेव्यसेवकभावापेक्षां गुणावरून अंतःकरणें एकवटून—स्नेहभाव दृढ झाला होता. कोल्हापूरचा राज्यकारभार जुन्या कालाप्रमाणें अष्टप्रधानांच्या अनुमतानें चालावा, असा उभयतांचा संकेत ठरला होता, व त्यास अक्कासाहेब घाटगे व इतर मंडळी यांचेंही अनुमत होतें.* असो! पुढें अमात्य साळवणाहून तारीख ८ आगष्ट रोजीं राणीसाहेब यांच्या शांतवनाकरितां करविरीं गेले.

यानंतर राजाराम महाराज हे इ० स० १८६६ चे आक्टोबरांत दरबाराकरितां मुंबईस निघाले. त्यांजबरोबर अमात्य मुंबईस गेले. दरबार झाल्यानंतर अमात्य हे कांहीं दिवस तेथेंच राहिले. त्या मुदतींत त्यांनीं लेडी गव्हर्नर, कौन्सिलर्स व सेक्रेटरीज् यांस पानसुपारीकरितां आणून त्यांचा सत्कार केला. तसेंच दरबाराकरितां आलेले सरदार, संस्थानिक यांच्या भेटी घेऊन त्यांस मेजवान्या दिल्या. याप्रमाणें तेथें सुमारें एक महिना मुक्काम करून सर्वांचा लोभ संपादिला. नंतर हे पुण्यास आले व तेथें त्यांस ज्वर येऊं लागला. तेव्हां कांहीं दिवस

* ही गोष्ट घडती तर हल्लींचे ले.कांची जी इच्छा कीं, प्रतिनिधिनिक्षिप्त राज्यव्यवस्था असावी, तिचें बऱ्याच अंशीं परिमार्जन झालें असतें. मग राजा व अष्टप्रधान इतक्यांच्या नजरेआड अन्याय व जुलूम यांस आपलें ठाणें ठेवण्यास फार कठिण पडलें असतें!

त्यांचा तेथेंच मुक्काम झाला. पुढें इ० स० १८६७ चे फेब्रुवारी महिन्यांत हे परत आपल्या संस्थानीं आले.

कोल्हापूरचे राज्यव्यवस्थेसंबंधीं अमात्यांचे मनांतील विचार शिवाजी महाराजांचे मरणानें कांहीं दिवस बंद पडले होते. अमात्य मुंबईस गेले, तेव्हांपासून त्यांचे मनांत हा विषय पुन्हां घोळूं लागला. त्यांनीं मुंबई येथें मोठमोठ्या विद्वान् व अधिकारी लोकांशीं या विषयावर संभाषणें केलीं. त्यांत पुष्कळ लोकांचीं मतें अमात्यांचे विचारासारखींच पडलीं. यावरून त्यांनीं कोल्हापूरचा राज्यकारभार अष्टप्रधानांच्या विचारें चालावा, अशाविषयीं खटपट करण्याचें योजिलें.

यावेळीं रामरावजी ताडपत्री हे कोल्हापूरचे कारभारी होते. त्यांस ही गोष्ट समजतांच ते याच सालचे एप्रिल महिन्यांत अमात्यांचे भेटीस बावडा येथें आले. उभयतांची भेट होऊन या विषयावर एकांतीं कांहीं बोलणें होऊन ताडपत्री परत करविरीं गेले.

पुढें थोड्याच दिवसांनीं ह्मणजे तारीख १० माहे मे सन १८६७ इसवी रोजीं मोरेश्वरराव बाबासाहेब मृत्यु पावले. यावेळीं त्यांचें वय २६ वर्षांचें होतें. हे मुंबईहून आल्यापासून थोडे थोडे आजारी असत. शेवटीं ज्वर अधिक होऊन त्यांत यांचा अंत झाला. हे शरीरप्रकृतीनें अशक्त, तथापि निरोगी होते. यांस संतति नव्हती; याकरितां यांनीं मरणसमयीं दत्तक मिळणेविषयीं करवीरसरकांत थैली पाठविली.

यांनीं मुखत्यारीनें संस्थानचा कारभार ६ वर्षें चालविला. त्यांत दिवाणी व फौजदारी कामें चालविण्यास वेगवेगळे दोन कामगार नेमिले होते. त्यांचे ठरावावरील अपिलें आपण स्वतः तपाशीत असत.

यांस कारभाराचे कामीं सल्लामसलत देणारांत बाजी सखाराम सुखठाणेकर हे प्रमुख असत. सुखठाणेकर हे संस्थानचे वतीनें करवीरदरबारांत व एजंटसाहेब यांजकडे वकील असत.

बावासाहेब यांनीं खर्चाची व्यवस्था उत्तम ठेविली होती, तेणेंकरून खजिन्यांत शिल्लक रहात असे. यांनीं धान्यसंग्रह फार केला; त्याचा उपयोग रयतेस अडचणीचे वेळीं स्वस्त दरानें धान्य देण्यांत होत असे. यांनीं एक सरकारी पेढी स्थापन केली होती. त्यांतून संस्थानचे रयतेस शेंकडा चार आण्यांपासून आठ आण्यांपर्यंत व्याजानें रक्कम मिळत असे. यांनीं बावडा येथें अँग्लोव्हर्न्याक्यूलरस्कूल व संस्कृत पाठशाला नवी स्थापिली. हे संस्थानांतील सर्व शाळांची तपासणी आपले कामगारांमार्फत करवीत; व केव्हां केव्हां स्वतः परीक्षा घेऊन विद्यार्थ्यांस उत्तेजन देत. हे उत्तम लेखक होते. एखाद्या भानगडीच्या कज्जांत हे मसुद्याशिवाय दहापंधरा पानांपर्यंत ठराव लिहीत.

बावडा येथील हवा निरंतर रहाण्याचे सोईची नाहीं ह्मणून हे नाधवडें गांवीं रहात. यांनीं तेथें वाडा वगैरे इमारती बांधिल्या, आणि वाड्याभोंवतीं एक विस्तृत बाग तयार केली.

हे नित्य पहांटे तासरात्रीं उठत आणि प्रातर्विधी आटोपून सूर्योदयीं कामास लागत. यांचा वेळ निरनिराळे कामांकडे वांटला गेला होता. हे दिवसांतून आठ तास संस्थानचें काम पहात. हे जबर उद्योगी व निर्व्यसनी होते. यांनीं मुखत्यारीनंतर वेळांत वेळ काढून कांहीं थोडा इंग्रजी भाषेचा अभ्यास केला होता. हे लहानशा कामांतदेखील आळस किंवा हयगय करीत नसत. यांची बुद्धि विशाल होती, त्यायोगानें यांस या लहानशा संस्थानचा कारभार पाहण्यांत फारसे श्रम पडत नसत.

यांचे पत्रसंचयांत, यांचे श्वशूर रायरीकर यांजकडून आलेलें एक पत्र आहे. तें श्रीमंतांनीं इतर प्रसंगींही लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. ह्मणून त्याचें तात्पर्य पुढें दिलें आहे:—

" तूर्तकाळीं आमचे दिवस विषम आहेत. त्यायोगानें आमचे स्नेही व चाकर, आमची अपकीर्ति व अहित होईल असे वागत आहेत. तुह्मीं आमचे पत्राशिवाय आह्मांकडील कोणी आल्यास त्यास वर्षानुवर्ष ठेवून घेऊन खर्च सोसावा आणि अखेर त्यानें आपले गुणावर जावें, असें होत आहे. याकरितां पत्राशिवाय कोणी आल्यास, तो पैसा काढण्याकरितां आला असें समजून, त्यास आश्रय देऊं नये. पत्र घेऊन आल्यास चारदोन दिवस ठेवून घ्यावा व लागलींच निरोप द्यावा असें केल्यानें उभयकुळांची उपहास्यता होणार नाहीं. उभयकुळें मनांत आणून दिवसेंदिवस लोक चांगलें ह्मणतील, व परमेश्वर संतोष पावेल, तेंच करीत असावें. सर्व व्यवहार परिमित असल्यानें कोणासही वाईटपणा येत नाहीं. तुह्मीं लोकांस दिलें तर आह्मांस संतोष आहे; परंतु, गैरचालीचे लोकांचें संगोपन होणें चांगलें नाहीं. तुह्मांपाशीं दत्तू व गोपाळा आहेत; ते लुच्चे, तोंडावर महाराज ह्मणून मागें निंदा करणारे, आणि लोकांत पैशून्य दाखविणारे आहेत; त्यांस ठेवून घेऊं नये. जवळ लुच्चे, चहाड, विषयी, किंवा मतलबी असे लोक बाळगूं नयेत. तोंडापुरतें गोड बोलणाराविषयीं फार जपावें; ते लोक फार भयंकर असतात. तुमच्या गैर गोष्टी कोणा कामगाराच्यानें तुह्मांस सांगवणार नाहींत. तोंडावर 'ठीक आहे महाराज' असें ह्मणतील— सल्ला विचारिली तर मर्जीचा कल पाहून तसाच अभिप्राय देतील—त्यांस तुमच्या मर्जीप्रमाणें वागणें प्राप्त आहे; परंतु बाहेर तुमचें—अमुक कृत्य गैर—असें बोलतील; याकरितां बहुत सावधगिरीनें वागावें. निस्पृह व विद्वान् अशीं मनुष्यें जवळ असावीं; त्यांनीं तुमचे मताविरुद्ध

मजकूर असेल तो एकांतीं कळवावा; नंतर आपण त्यांचे मताचा विचार करावा, आणि मग योग्य दिसेल तें करावें; तशा समंजस मनुष्यास खरें दिसेल तें त्यांनीं निर्भीडपणानें सांगण्याविषयीं आपलें उत्तेजन असावें".

यावरून रायरीकरांस पक्कें समजलें होतें कीं, श्रीमंतांस निस्पृह व योग्य मनुष्याची फार जरूर असून तशा लोकांचा त्यांस दुष्काळ असतो.

शिवाय, वर दिलेल्या पत्रावरून रायरीकर यांची योग्यता व अनुभव यांविषयीं बऱ्याच अंशीं अटकळ होण्यासारखी आहे.

---

## माधवराव मोरेश्वर ऊर्फ बाळासाहेब.

### इ० स० १८६८ पासून आजतागायत.

मोरेश्वरराव बाबासाहेबांनीं मरणसमयीं दत्तकाची परवानगी मागितलेलें काम संस्थानची व्यवस्था होईपर्यंत चालावयाचें तहकूब राहिलें होतें. तें नंतर चालू होऊन, माधवराव हे दत्तक पसंत होईपर्यंत दहा अकरा महिने काळ गेला.

माधवराव ऊर्फ बाळासाहेब हे लक्ष्मणराव तात्यासाहेब पंडित नंदगांवकर यांचे वडील पुत्र असून, इ० स० १८६८ एप्रिल तारीख २ या दिवशीं राधाबाईसाहेबांस दत्तक झाले. दत्तकाची निवड मुंबईसरकारच्या परवानगीनें कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट कर्नल अंडरसन यांनीं यांच्या भाऊबंदांचीं ६।७ मुलें आणवून त्यांतून केली. यावेळीं यांचें वय ९ वर्षांचें होतें.

बाबासाहेबांचे मृत्यूनंतर लागलीच संस्थानचें काम पहाण्यास करवीरदरबारांतून कारभाऱ्याची नेमणूक झाली.

यांचा जन्म यांचे आजोळीं ह्मणजे अम्मणगी तालुका चिकोडी या गांवीं तारीख २९ माहे नवंबर सन १८५८ या दिवशीं झाला. हे सहा महिन्यांचे झाल्यावर नंदगांवास आले. यांच्या वयाच्या तिसऱ्या वर्षी यांस अतिशय देवी आल्या, आणि त्यांत यांच्या एका डोळ्यांत फूल पडलें डोळा बरा होण्याकरितां यांस कागवाडास वैद्याकडे न्यावें लागलें. तेथें उपचारांनीं डोळा बरा झाला. या देवीचे थोडेसे पुसट वण यांच्या चेहेऱ्यावर असून, डावा डोळा किंचित् लहान झालेला आहे.

हे दत्तक झाल्यापासून यांचे जनक लक्ष्मणराव तात्यासाहेब यांस संस्थानांतून खर्चाची नेमणूक करून देऊन, त्यांनीं, हे वयांत येईपर्यंत यांजबरोबर असावें असें ठरविलें होतें. त्याप्रमाणें तात्यासाहेब सकुटुंब यांजबरोबर रहात होते. यामुळें यांस आपण मूळच्या कुटुंबांत आहों असें वाटून, दत्तकसंबंधानें लहानपणीं दुसऱ्या कुटुंबांत राहण्यापासून वाटणारा विषमपणा यांस वाटला नाहीं.

दत्तक झाल्यानंतर यांस विद्याभ्यासाकरितां कोल्हापुरास यांच्या स्वतःच्या वाड्यांत ठेविलें. हा वाडा कोल्हापुरांतील राजवाड्याशिवाय इतर सरदार व श्रीमान् गृहस्थ यांच्या वाड्यापेक्षां मोठा विस्तृत आहे.

यांच्या विद्याभ्यासाचा आरंभ नंदगांव येथें घरीं शिक्षक ठेवून त्यांजकडून वयाच्या सहाव्या वर्षी झाला. नंतर हे कोल्हापूर येथें राहून व्हर्न्याक्यूलर, आंग्लोव्हर्न्याक्यूलर व हायस्कूल यांत क्रमाक्रमानें अभ्यासास गेले. जरी हे शाळेंत जात असत, तरी शाळेंतील वेळेशिवाय शिक्षणाकरितां यांजकडे एक स्वतंत्र शिक्षक नेमणुकीस असे.

यांचा अभ्यास मराठी इयत्ता ४ व इंग्रजी इयत्ता ४ होईपर्यंत इतका उत्तम चालला होता कीं, यांस प्रत्येक इयत्तेंत वर नंबर येऊन बक्षीस मिळत असे.

या वेळीं कोल्हापूरच्या अधिकारीवर्गांत अशी एक समजूत प्रचलित झाली होती कीं, सरदारांच्या मुलांस जुन्या समजुतीच्या लोकांतून काढून एकीकडे ठेविल्यावांचून त्यांचा अभ्यास चांगला होणार नाहीं व चांगल्या पद्धति लागणार नाहींत. या समजुतीप्रमाणें त्यांनीं सर्व सरदारांच्या मुलांस कोल्हापूरच्या माळावरील निरनिराळ्या बंगल्यांत नियमित नौकरांसह नेऊन ठेविलें, त्यांत यांसही तिकडे राहण्यास नेलें; आणि यांचे जनक यांस नंदगांवास जाण्यास सांगितलें.

या कृत्याचा परिणाम यांच्यावर विरुद्ध झाला. पूर्वीं यांस वाटत असे कीं, आपण नीट अभ्यास केला नाहीं तर आपणास बंगल्यावर राहण्यास नेतील आणि त्यापासून आईबापांच्या व इतर परिचित मंडळींच्या सहवासास मुकावें लागेल. या भीतीनें व काळजीनें हे चांगला अभ्यास करीत असत. आतां ती काळजी राहिली नसून ममत्वरहित मंडळींच्या सहवासांत दिवस घालविणें भाग झालें.

यापासून यांचा उत्साह नाहींसा होऊन यांच्या कोमल अंतःकरणांत त्वेष उत्पन्न झाला. आपण केला नाहीं तर चांगला अभ्यास कसा होतो तें पाहूं, अशी मनाची विरोधी वृत्ति झाली. जुलमानें अभ्यासास बसावयाचें व शाळेंत जावयाचें, असा क्रम सुरू झाला. अर्थात् अभ्यास चांगला होईनासा झाला.

पुढें बंगल्यांत ठेवण्यानें अभ्यास होत नाहीं असें समजून यांस वाड्यांत राहण्यास पाठविलें. नंतर थोड्या दिवसांत पुन्हा बंगल्यांत राहण्यास नेलें आणि फिरून वाड्यांत राहण्यास पाठविलें.

याप्रमाणें चालत असतां इंग्रजी ५ व ६ इयत्तांचें शिक्षण अत्यंत दिलाईचें झालें. यापुढें यांच्या मनानें चांगला अभ्यास करण्याचें घेतलें

आणि सातवे इयत्तेत एक वर्ष झटून अभ्यास करून मागील दोन इयत्तांतील उणीव भरून काढिली.

या सुमारास यांस मुखत्यारी देण्याची वेळ जवळ येत चालली होती. या करितां कामाची माहिती होण्यासाठीं यांनीं असिस्टंट पोलिटिकल एजंट यांच्या कोर्टांत कामें चालत असतां तेथें असावें व त्यांची माहिती घ्यावी; आणि यांच्या संस्थानच्या कारभाऱ्यांनीं डिस्ट्रिक्ट ऑफिसराकडे केलेले रिपोर्ट यांच्या नजरेखालून जावे. असें ठरल्याप्रमाणें यांनीं तसें वागून कामाची माहिती करून घेतली.

पुढें इ० स० १८८० त यांनीं स्वतः दुसरा वर्ग माजिस्ट्रेटचीं कामें करावीं व तिसरा वर्ग माजिस्ट्रेटच्या कामाचीं अपिलें तपासावीं; आणि त्याजविषयींचे ठराव असिस्टंट पोलिटिकल एजंट क्यॉपटन फेरिस यांचे मंजुरीनें कायम व्हावे. याप्रमाणें ठराव झाला. या ठरावाप्रमाणें हे हीं कामें चालवीत होते.

याप्रमाणें विद्याभ्यास व कामाची माहिती झाल्यानंतर इ० स० १८८१ च्या मार्च महिन्याचे १२ तारखेस यांस संस्थानची मुखत्यारी देण्यांत आली.

हे गादीवर बसल्यापासून यांस मुखत्यारी मिळेपर्यंत संस्थानचा कारभार वेळोवेळीं करवीर दरबारांतून नेमिलेले कारभारी इंग्रजी कायद्याला अनुसरून पोलिटिकल एजंटसाहेबांच्या हुकुमाप्रमाणें करीत होते. मुखत्यारीनंतर यांनीं संस्थानचें काम पाहण्यास एक कारभारी नेमून त्यास दिवाणी कामांत मुनसफाइतका व फौजदारी कामांत दुसरा वर्ग माजिस्ट्रेटाइतका अधिकार दिला व त्याजवरील अपिलें स्वतःच्या कोर्टांत तपाशीत आहेत. मुलकी कामांत अखेरहुकूम आपल्या हातीं ठेवून, बाकीचें सर्व काम कारभाऱ्याकडे सोंपविलें आहे.

हे या संस्थानास दत्तक होण्यापूर्वीं निळकंठराव ऊर्फ बळवंतराव पंडित कोकिसरेकर यांस संतति नसून ते नरसिंहवाडी येथें अत्यंत आजारी असतां त्यांनीं यांस नंदगांवाहून नेऊन आपणाकरितां दत्तक पसंत केलें, आणि त्यांचें कुटुंब उमाबाईसाहेब यांनीं यांस त्या निमित्तानें सुवर्णकटकें दिलीं. पुढें हे या संस्थानीं दत्तक झाले, तेव्हां उमाबाई-साहेबांनीं यांचे धाकटे बंधु सुभराव यांस दत्तक घेतलें.

हे दत्तक होण्यापूर्वीं यांची मुंज नंदगांव मुक्कामीं झाली होती. दत्तकानंतर एक वर्षाच्या आंत कोल्हापूर येथें यांची सोडमुंज झाली. यांस दत्तक झाल्यानंतर एक वर्षपर्यंत वारंवार ताप येत असे, त्यापासून यांची प्रकृति अगदीं क्षीण झाली होती.

यांनीं मुकत्यारी मिळाल्यापासून आजवर राजकीय, न्यायाचीं, मुलकीचीं व सार्वजनिक अशीं कामें कोणासही कुरकुर करण्यास जागा न ठेवितां सुयंत्र चालविलीं आहेत. यांचें सार्वजनिक कामाकडे फार लक्ष आहे. यांनीं कोंकणांतील आपल्या प्रदेशाचें व नजीकच्या बंदर-गांवांचें दळणवळण वाढून व्यापाराची सोय होण्याकरितां भुइबावडा व करूळ या दोन घांटाच्या पायथ्यापासून रस्ते तयार केले आहेत. हे बावड्याहून कोल्हापुरास जाणारा रस्ता थोडथोडा पक्का बांधीत नेत आहेत. यांनीं साळवण येथें चांगल्या प्रकारची धर्मशाळा, बावडा येथें श्रीरामचंद्राचें देवालय व याशिवाय आणखी धर्मशाळा व देवालयें बांधिलीं आहेत. लायब्ररीस मदत करून इमारत बांधून दिली आहे. आपल्या संस्थानांतील प्रजेच्या मुलांची शाळेंतील फी माफ केली आहे. यांचें शेती सुधारण्याकडे लक्ष असून, इकडील डोंगराळ प्रदेशांत बागा-यती व त्यासारखी शेती कशा प्रकारानें होईल याविषयीं प्रयोग करून पाहण्याचें काम चालविलें असून, त्यांत यांस ऊंस व फळफळावळ या कामीं थोडथोडें यश येत चाललें आहे.

यांनीं बावडा येथें इंग्लिश पद्धतीचा दवाखाना स्थापन केला आहे. तसेंच संस्थानच्या वैद्यांकडून आर्यवैद्यक पद्धतीचीं औषधें धर्मार्थ देवविण्याची योजना केली आहे.

यांनीं ज्योतिष, आर्यवैद्यक, इंग्लिश पद्धतीचें वैद्यक इत्यादि विषयांतील विद्यार्थ्यांस स्कॉलरशिपा देऊन त्यांचें शिक्षण पुरें झाल्यानंतर त्यांनीं संस्थानच्या उपयोगीं पडावें असें ठरविलें आहे. महाराष्ट्रांतील निरनिराळ्या सुधारणासंस्थांस वार्षिक देणग्या चालू केल्या आहेत. निरनिराळ्या धर्मसंस्थांस वर्षासनें करून दिलीं आहेत.

हे इ० स० १८७२ त लॉर्ड नार्थब्रूक यांनीं भरविलेल्या मुंबई येथील दरबारास महाराजांबरोबर गेले होते.

इ० स० १८९३ त श्रीमन्महाराज शाहुछत्रपतिसाहेब हे मुकत्यारी मिळण्यापूर्वी आपला प्रांत पहात फिरत असतां, चैत्र शु० २ या दिवशीं बावडा पाहण्याकरितां आले होते.

इ० स० १८९६ त हे आपले व कुटुंबाच्या प्रकृतीच्या दुरुस्ती-करितां कांहीं दिवस पुण्यास जाऊन राहिले होते. तेथून मुंबईस जाऊन यांनीं आपल्या प्रकृतीच्या निदानाविषयीं तेथील नामांकित डाक्टरांचे अभिप्राय मिळविले.

इ० स० १९०२ या वर्षीं यांच्या प्रजेनें यांचा ज्युबिली उत्सव केला. यावेळीं यांच्या प्रजेनें व महाराष्ट्रांतील निरनिराळ्या संस्थांनीं व लोकांनीं यांस प्रेमपूर्वक मानपत्रें अर्पण केलीं.. यांच्या कारकीर्दींत रयत संतुष्ट असून ती हाच धनी दीर्घकाल असावा अशी इच्छा करीत आहे. हे रयतेच्या सुखाकरितां आपल्या स्वतःच्या सुखास कमीपणा देत असतात.

याच वर्षी यांची कन्या धोंडूबाई यांचा विवाह कोल्हापूरचे राजोपाध्ये अप्पासाहेब यांचे वडील पुत्र अण्णासाहेब यांजबरोबर बावडा येथें मोठ्या समारंभानें झाला.

या लग्नाचा उत्सव झाल्यावर थोड्या दिवसांत राजोपाध्ये यांजवर वेदोक्तासंबंधानें मोठें संकट गुदरलें. तेव्हां यांस, यांचे थोरथोर हितचिंतक व खुद्द राजोपाध्ये हेही या लग्नाचा झालेला करार रद्द करा असें ह्मणत असतां आणि तशी सवड असतां, यांनीं आपलें वचन फिरविलें नाहीं. यांच्या या अलौकिक गुणाबद्दल यांच्या इतिहास-प्रसिद्ध पूर्वजांप्रमाणें हे सज्जनांच्या स्तुतीस पात्र होऊन राहिले आहेत.

इ० स० १९०३ त हे कोल्हापूरच्या महाराजांबरोबर दिल्लीस दरबाराकरितां गेले. तेथून परत आल्यानंतर कांहीं दिवसांनीं या समारंभासंबंधानें इंग्रजसरकारांतून यांस एक चांदीचें पदक मिळालें. हें पदक कोल्हापूरचे पोलिटिकल एजंट कर्नल फेरिस यांनीं कोल्हापूर येथें दरबार भरवून त्यांत महाराजांच्या हस्तें यांस दिलें.

याच वर्षाच्या जानेवारी महिन्यांत यांच्या जनक घराण्यांतील यांची आजी ताईसाहेब या मृत्यु पावल्या. गृहसौख्यांत यांस ताईसाहेब जननींपेक्षां अधिक वाटत होत्या.

स० १९०४ या वर्षी यांच्या न्यायाच्या कोर्टाचे अधिकार वाढविले किंवा पूर्वी असलेले अधिकार स्पष्ट करण्याकरितां महाराजांनीं कोल्हापुरास दरबार भरवून यांस त्या अधिकाराबद्दलचें आज्ञापत्र दिलें.

हे रहात असलेल्या बंगल्यावर तारीख २२ आक्टोबर सन १९०४ या दिवशीं वीज पडली. यावेळीं हे दुसऱ्या मजल्यावर एका खुर्चीवर बसून तावदानानें बंद अशा खिडकींतून बाहेर पडत असलेला पाऊस

यहात होतें. वीज कौलांतून तिसऱ्या मजल्यावर आणि तेथून पेंड व फळ्यांतून दुसऱ्या मजल्यावरील पडदीच्या खांबांतून हे ज्या खुर्चीवर बसले होते तेथून दोन हातांच्या अंतरावर आली आणि तेथून खुर्चीच्या मागील पायापासून वीत दीडवीत अंतरावरची जमीन उकरीत येऊन दिशा बदलून दारकडे वळली. त्यांतून जिना उतरून खालीं गेली. विजेच्या या चलनवलनापासून ५।६ मनुष्यें जमिनीवर पडलीं आणि त्यापैकीं १ मनुष्य गतप्राण झाला. यांच्या जवळचा मनुष्य खालीं बसला. यांचे डोळे मिटले व हे खुर्चीवर मागें पडले. पुढें ४।५ दिवस यांना नीटशी झोंप आली नाहीं. अशा संकटांतून परमेश्वरानें यांस पार पाडल्याबद्दल यांच्या सर्व प्रजेस आनंद होऊन त्यांनीं उत्सव केले व यांनींही पुष्कळ दानधर्म केला.

इ० स० १९०५ च्या जानेवारी महिन्यांत यांचे जनक लक्ष्मणराव तात्यासाहेब हे बावडा मुक्कामीं मृत्यु पावले. यावेळीं त्यांचे पुत्र दत्तात्रयराव हे ७ वर्षांचे असल्यानें, करवीर दरबारचे सरन्यायाधीश यांजकडून सर्टिफिकिट मिळून श्री० बाळासाहेब यांस यांचे पालनकर्ते नेमण्यांत आलें. दत्तात्रयराव हे हल्लीं बावड्यासच शिकत आहेत.

आजपर्यंत यांचीं पांच लग्नें झालीं. यांचीं कुटुंबें मृत्यु पावलीं आहेत. पहिल्या तीन कुटुंबांस संतति होऊन ती अल्पायु मृत्यु पावली. चवथे कुटुंबापासून झालेल्या संततींतील धोंडूबाई नांवाची मुलगी हयात असून तिच्या लग्नाचें वर्णन पूर्वीं दिलेंच आहे. पांचव्या कुटुंबापासून झालेली एक मुलगी सहा महिन्यांची होऊन मृत्यु पावली. यापुढें याच कुटुंबास ता० १७ फेब्रुवारी १९०७ इ० रोजीं पुत्र होऊन त्याचें नांव परशुरामराव ऊर्फ भाऊसाहेब असें ठेविलें आहे. भाऊसाहेब यांस इ० स० १९०९ यांत कोल्हापूरचे महाराजांनीं पूर्व पद्धतीप्रमाणें कोल्हापुरास समारंभानें आणवून व दरबार भरवून भेटीचीं वस्त्रें दिलीं.

यांस इ० स० १९१० त कन्या झाली, तिचें नांव शांताक्का असें ठेविलें आहे.

इ० स० १९११ तारीख २२ जून रोजीं हिंदुस्थानचे बादशहा पांचवे जॉर्ज यांचे राज्यारोहणानिमित्तानें कोल्हापुरास महाराजांनीं दरबार भरवून त्यांत यांस सोन्याची भालदारकाठी वापरण्याची सनद, काठी व सुवर्णपदक अशीं दिलीं, आणि याच सालचे तारीख १२ दिजंबर रोजीं बादशहाचें दिल्ली येथील राज्यारोहण जाहीर करण्याचे दिवशीं करवीर येथें भरलेले दरबारांत ही सोन्याची काठी वंशपरंपरा वापरण्याचा हक्क यांस दिल्याचें जाहीर करण्यांत आलें आणि नंतर तशी सनद दिली.

इ० स० १९१४ एप्रिल ता० ३ रोजीं बावडा येथें यांचें पांचवें कुटुंब मृत्यु पावलें. यामुळें यांचे समाचारास श्रीमन्महाराज शाहुछत्रपति ता० ६ मिनहू रोजीं कोल्हापुराहून बावड्यास येऊन गेले.

यांच्या समकालीन सरदारांत हे घोड्यावर बसण्यांत पहिल्या प्रतीचे आहेत. यांस स्वतःस घोड्याच्या शिक्षणाची उत्तम माहिती आहे. यांस बंदुकीनें चांगलें निशाण मारितां येतें.

हे आर्य वैद्यकांत वाकब आहेत. निरनिराळ्या प्रकारचीं औषधें, भस्में, मात्रा, कुपीचीं रसायनें हीं स्वतः तयार करून लोकांस धर्मार्थ देतात, आणि तसें करितां यावें ह्मणून मौल्यवान् औषधांचाही संग्रह वाढवीत आहेत.

यांनीं फोटोग्राफीचा अभ्यास करून उत्तम फोटो काढण्याची कला प्राप्त करून घेतली आहे. या विद्येंतील यांचा एक शिष्य या धंद्यावर निर्वाह करीत आहे.

यांची हिंदुधर्मावर पूर्ण श्रद्धा आहे. त्यांतील धार्मिक कृत्यें कर्तव्य समजून पूर्ण निष्ठेनें करितात. हे गीता, रामदासाचे ग्रंथ, ज्ञानेश्वरी, इत्यादि धार्मिक ग्रंथांचें अवलोकन करीत असतात. यांस वाचनाचा मोठा नाद असून त्यापासून यांस ज्ञानप्राप्ति व करमणूक हीं होतात.

यांचा स्वभाव उदार, विचार उदात्त, वृत्ति शांत, गंभीर व हास्ययुक्त चेहरा असून आप्तस्वकीयांवर प्रेम, वचनाची खंबीरता, भेटीची सर्वदा मोकळीक इत्यादि अनेक सद्गुण यांजमध्यें वास करीत आहेत.

मुकत्यारी मिळाल्यापासून कांहीं दिवस हे बावडा येथें राहत होते. पुढें राशिवडें गांवीं राहण्याचा बेत होऊन तेथें इमारती वगैरेची योजना ठरली; परंतु तेथें पाण्याची सोय बरोबर बसेना ह्मणून तो बेत रहित करावा लागला. यानंतर हे कुटुंबांच्या प्रकृतिकरितां बरींच वर्षें कोल्हापूर येथें राहत होते. इ० स० १८९६ पासून बावडा येथें राहूं लागले आहेत.



# भूगोल भाग.

## संस्थान बावडा.

हें संस्थान कोल्हापूर राज्यापैकीं एक असून त्याचे पश्चिमेस आहे. याच्या सीमा–पूर्व, उत्तर व दक्षिण या बाजूस कोल्हापूरचें राज्य व पश्चिमेस रत्नागिरी जिल्हा अशा असून या सीमेच्या बाहेर या संस्थानचे कांहीं गांव आहेत.

याची पूर्व पश्चिम तुटक तुटक लांबी सुमारें ४० मैल व दक्षिणोत्तर रुंदी सुमारें २५ मैल आहे. याचें क्षेत्रफळ २४३ चौरस मैल असून त्यांत लागवडीलायख जमीन १२७००० एकर व जंगलाची ७५००० एकर आहे. यांतील लोकसंख्या ४४४०० आहे. संस्थानचें एकंदर उत्पन्न ८७००० रुपयांचें असून तें जमीन, सायर, जंगल, बाबती, इनामें, इतर हक्क व स्टांप वगैरेपासून होतें.

यांत खोती, खातेवारी, रयतवारी असे जमिनीचे तीन सत्ताप्रकार आहेत.

या संस्थानचे सह्याद्रि पर्वताचेयोगानें वरघाट आणि तळघाट किंवा कोंकण असे स्वाभाविक दोन भाग झाले आहेत. यांतील बहुतेक प्रदेश डोंगराळ असून जंगलमय आहे. यांतील प्रदेशाची समुद्रसपाटीपासून उंची तळघाटची ४४७ फूट, व घाटपायथ्याची ६८४ फूट आणि वरघाट तळसाफची २००० फूट आहे. यांतील पर्वत शिखरांची उंची ३२५० फूटपासून ३४०० फुटांपर्यंत आहे.

नद्या वरघाटी–१ भोगावती ही शिवगडानजीक ओलवणचे डंगांत उगम पावून राशिवडें गांवाजवळून वाहते. २ भद्रा ही मानबेटचे जंग-

लांत उगम पावून बावेली, धुंदवडें वगैरे गांवांजवळून वाहते. ३ कुंभी ही वाबव्यापासून चार मैलांवर उगम पावून कातळी, मांडुकली वगैरे गांवांजवळून वाहते. या नदीस कुवादें गांवांजवळ उगम पावलेली लहानशी नदी तळयें, वेसरडें गांवांजवळून वाहत येऊन साळवण गांवाजवळ मिळते.

तळघाटी — १ सुक ( शुक ) नदी ही सह्याद्रीचे खोऱ्यांत उगम पावून एडगांव, कुसूर वगैरे गांवांजवळून वाहते. पुढें या नदीस खारेपाटणची खाडी असें नांव मिळालें आहे. या खाडीचे कांठीं संस्थानचे पोंभुर्लें गांवाजवळ त्याच गांवाचे नांवाचे लहानसें बंदर आहे. या नदीचे उगमाजवळ शुकाची एक गुहा असून, तीवरून या नदीस हें नांव मिळालें आहे. २ जामदा ही जांभवडें खोऱ्यांत उगम पावून नानिवडें, तिथवली वगैरे गांवांजवळून वाहते.

या सर्व नद्या व त्यांस मिळणारे असंख्य ओढे यांचे प्रवाहास अत्यंत वेग व ओढ असते. यावरून उतरून जाण्यास डोंगराळ प्रदेशीं "सांकव" नांवाचे लाकडी पुलाची योजना केलेली असते. हे पूल दोन्ही तीरांवरील वृक्षांचे खांद्यांवर मोठमोठे वासे टाकून व त्यांस आडवीं लांकडें बांधून केलेले असतात. सपाट प्रदेशांत सांगडी, होड्या व नावा यांची योजना केलेली असते. उन्हाळ्यांत यांतील बहुतेक प्रवाह कोरडे पडतात. फार थोडे ठिकाणचें पाणी उन्हाळी पिकाचे उपयोगीं येण्यासारखें आहे.

संस्थानचे सर्व प्रदेशीं पिण्याचें पाणी विपुल असून त्याचें निर्मलत्व व रुचि हीं वर्णनीय आहेत. उन्हाळ्यांत वरघाटी मुऱ्यांतील पाण्याचा गारपणा अवर्णनीय सौख्यदायक असतो.

धबधबा—नापणें गांवचे नदीस पाहण्यासारखा एक धबधबा आहे.

ही लहान नदी नाधवडयाचे उभाडयापासून उत्पन्न होऊन नापणें, उंबर्डे या गांवांपासून वाहत जाऊन सुक (शुक) नदीस मिळाली आहे.

पर्वत – सह्याद्री हा एकच असून याचे फाट्यांनीं सर्व प्रदेश व्यापिला आहे. हा पर्वत संस्थानचे प्रदेशामधून दक्षिणोत्तर गेला आहे. यांतील " काळा कडा " हा वरघाट व कोंकण यांची सीमा असून हा सह्याद्रीचे पश्चिमेकडील तुटलेले भागाचे मध्यावर आहे. हा समुद्र-सपाटीशीं समांतर भिंतीप्रमाणें अत्यंत कठीण काळया दगडाचे पट्टीचा आहे. या पट्टीवर लहानसहान झुडपें, गवत अथवा लहान वनस्पतीही उगवत नाहींत.

**घाट**—संस्थानचे दक्षिण हद्दीस फोंडा घाट असून तो गाडी जाण्या-येण्यासारखा आहे. याचे उत्तरेस ओलवण गांवाजवळ शिवगड नांवाचा घाट आहे. पूर्वी या घाटानें जनावरांवरून मालाची ने आण होत असे. हल्लीं फोंडा घाट गाडी जाण्याचे सोईचा झाल्यापासून या घाटानें फक्त माणसांची रहदारी असते. मध्यमार्गीं बावडा घाट असून त्याचे भुईबावडा घाट व करूळ घाट असे दोन निरानिराळे फांटे होऊन ते भिन्नभिन्न खोऱ्यांत उतरले आहेत. यांतील भुईबावडा घाटानें जनावरांवरून मालाची ने आण चालते. करूळ घाटानें जनावरांवरून मालाची ने आण होण्यास फार प्रयास पडतात.

पाजा-- ( अत्यंत लहान घाट ) ह्या अनेक असून त्यांतील कांहीं शीरओझीं वाहण्यासारख्या आहेत. बाकीच्यांनीं जवळ जवळचे लोक पायमार्गानें सह्याद्री ओलांडून एकमेकांशीं दळणवळण ठेवितात.

किल्ले गगनगड व शिवगड असे दोन डोंगरी किल्ले आहेत. यांचीं बांधकामें इ० स० १८४६ त अंशतः पाडून टाकलीं असून तेव्हां-पासून त्यांवरील वसाहत मोडली आहे.

डंग व रानें—मानबेट, तळयें, मौंदें, सडुरें, नावळें इत्यादि गांवांचे हद्दींत मोठे डंग असून बाकीच्या बहुतेक गांवीं रानें व राया आहेत. भुरटी झाडी सर्वत्र आहे. नदी, ओढे, ओहोळ यांचे किनारे वृक्षाच्छादित आहेत. लागवडीचे जमिनींतदेखील मोठमोठे वृक्ष आहेत यामुळें सर्व प्रदेश वृक्षमय दिसतो. मुख्य जंगलें सह्याद्रीचे खोऱ्यांतून व माथ्यावरील शिखरांचे बाजूंवरून आहेत.

खनिज द्रव्यें सह्याद्री पर्वतांत लोखंडी दगड सांपडतात. त्यांपासून धावड जातीचे लोक लोखंड काढून त्याचे तवे, कुऱ्हाडी वगैरे लहान लहान जिन्नस तयार करितात. या पर्वतांत तांब्याच्या खाणी सांपडतील असें भूगर्भशास्त्रवेत्त्यांचें मत आहे. ठिकठिकाणीं निरनिराळ्या रंगांच्या मृत्तिका सांपडतात. एक प्रकारचे काळे व घट्ट असे चुन्याचे दगड सांपडतात. त्यापासून होणारा चुना अति तीक्ष्ण असतो.

हवा—कोंकणांतील हवा उष्ण असून घाटावरील थंड आहे. यांतील प्रदेश सह्याद्रीचेयोगानें पूर्वेकडे व पश्चिमेकडे उतार होत गेला आहे. यामुळें यावर समुद्रसपाटीवरील व पूर्वेकडील वारा मोकळेपणानें वाहतो. या वाऱ्यांत क्वचित् उत्पन्न होणारीं रोगबीजें विद्रुत होतात. यांतील वसाहत विरल विरल असून, तीपासून होणारा कर्दम व दोषी वायु हे उतार प्रदेशाचे अनुकूलतेमुळें व वारा आणि पाऊस यांच्या आधिक्यानें वाहून जातात. या कारणांनीं हवा निरोगी असते व सांथीचे रोग उत्पन्न होत नाहींत. केव्हां केव्हां मुऱ्यांत एक प्रकारचा ताप उत्पन्न होऊन तो कांहींसा उपद्रवकारक होतो.

लागवडीची जमीन - यांतील बहुतेक जमीन डोंगराळ असून तांबडमातीची आहे. ती सर्वत्र उतार व पडलागवडीची आहे. जमीन १०।५ वर्षें पड टाकून पुढें तीन वर्षें तींत तीन निरनिराळे जातींचीं

पिकें घेऊन पुन्हां पड टाकावी लागते. या जमिनींतून पिकाचे प्रत्येक वर्षीं तयार असलेली बरीच माती पावसानें वाहून जाऊन ती तीन वर्षांनीं नापीक होते. यामुळें शेतकऱ्यांस ती पड टाकून, राब घालून, मुरमाची नवी माती बनवून लागवडींत आणावी लागते. अशा जमिनींत नाचणा, वरी, तीळ अशीं धान्यें क्रमानें होतात. दरएक गांवीं कांहीं थोड्या जमिनी चांगल्या प्रतीच्या असून त्यांत उंची जातीचें भात पिकतें, परंतु अशा जमिनींत देखील राब घालावा लागतो, नाहीं तर त्याही निकस होतात. एकंदरींत सर्व प्रकारच्या जमिनी श्रमाचे मानानें कमी पीक देणाऱ्या आहेत.

उत्पन्नाचे जिन्नस—लागवडीचे जमिनींपासून भात, नागली, वरी, हरीक वगैरे धान्यें; उडीद, वरणे, कुळीथ वगैरे कडधान्यें; तीळ, भुईमूग वगैरे गळिताचीं धान्यें आणि ऊंस हीं उत्पन्नें होतात. जंगलापासून इमारती व जळाऊ लांकूड; हिरडे, बेहडे, मध, मेण, शिकेकाई, मिरीं, वावडिंगें, तमालपत्र, रंगाच्या साली, वनौषधी इत्यादिकांचें उत्पन्न होतें; कांहीं गांवीं उत्तम जातीचे फणस, अननस, महाळुंगें, कोहाळे, भुईकोहाळे हीं उत्पन्न होतात. कणगें, चिनीं, आलें, हळद हीं थोडीं थोडीं उत्पन्न होतात.

जनावरें—सामान्य पाळींव जनावरें सर्व जातींचीं आहेत. जंगलांत रानटी जनावरांत वाघ, अस्वलें, वगैरे हिंसक आणि गौ, सांबरें वगैरे अहिंसक जनावरें आहेत. कोंकणांत सर्पाच्या निरनिराळ्या प्रकारच्या अनेक नामांकित विषारी जाती आहेत.

व्यापार — मुख्यत्वेंकरून राजापूर व खारेपाटण हीं बंदरें व कोल्हापूर शहर यांशीं चालतो. बाहेर जाणाऱ्या पदार्थांत उंची जातीचें भात, इमारती व जळाऊ लांकडें, हिरडे, बेहडे वगैरे जंगलांतील पदार्थ हे

असून, येणारे पदार्थांत कापड, मीठ, मिरची, कांदे, तंबाकू, जोंधळा गहूं, हरभरा व मासळी हे मुख्य आहेत.

जत्रा— १ आर्चिणें गांवीं पौषपौर्णिमेस श्रीदेवी रासाईची जत्रा भरते. यावेळीं येथें दूरदूरचे ठिकाणांहून कापड, कांबळीं, धातूंचीं भांडीं इत्यादींचीं दुकानें येत असून, तीं पुढें सुमारें एक महिन्यापेक्षां अधिक दिवस असतात. व्यापार ५।६ हजार रुपयांचा होतो.

२ कुर्ली गांवीं श्रीदेवी कुर्लाईची जत्रा त्रिपुरीपौर्णिमेस भरते. या देवीची नवसास पावण्याची बरीच प्रसिद्धी आहे.

लोकांच्या जाती — यांत मुख्यत्वें मराठे व कुणबी या जाती मुख्य आहेत. कोंकणांत व घाटावरील मुऱ्यांत नामांकित कुलीन मराठ्यांचीं घराणीं असून तीं गरिबीचे स्थितींत आहेत. जंगलांत धनगराची एक जात असून, ती थारेपालट करून राहणारी आहे. हे धनगर चाऱ्याचे सोईप्रमाणें आपलीं घरें एका ठिकाणांतून काढून दुसरे ठिकाणीं नेतात. हे आपला निर्वाह गुरें बाळगून त्यांचे दुभत्यावर करतात हे हल्लीं थोडी शेतकी करूं लागले आहेत. यांच्या १०।५ घरांचे समुदायास धनगरवाडा असें ह्मणतात. हे वाडे गांवापासून दूर स्वतंत्र असतात. हे लोक अनार्यांपैकीं आहेत. यांच्यांत " गज्जो " नांवाचा नाच प्रति वर्षीं दसऱ्यांत होतो. त्यावेळीं पुरुषमंडळी अंगांत पायघोळ झगा व पायांत वाजणारे वाळे घालीत असतात. हे नाचाचे वेळीं आपल्या देवाच्या नांवांचे उच्चार करितात. त्यावरून व इतर क्रियेवरून आणि नेहमींच्या इतर चालीरीतीवरून विद्वान् शोधकास कांहीं ऐतिहासिक माहितीचीं अनुमानें ठरवितां येतील.

भाषा— सर्वत्र मराठी भाषा चालते. कोठें कोठें भ्रष्ट अशी कानडी व मुसलमानी भाषा चालते.

लोकस्थिति – बहुतेक लोक दरिद्री आहेत. हे हंगामाचे दिवसा-शिवाय अर्धपोटीं असतात. यांचें खाण्याचें धान्य मुळचें निकस असतां कोंडा घालून अधिक सत्त्वहीन करून यांस खावें लागतें. तो कोंडाही चांगल्या प्रतीचा असत नाहीं. या प्रदेशीं सुपीक जमीन थोडी असून पुष्कळ श्रमानें थोडें फळ देणारी अशीच फार आहे. यामुळें जमिनीचे उत्पन्नावर लोकांचा कनिष्ठ प्रतीचाही चरितार्थ चालत नाहीं. पूर्वीं मराठी राज्यांत लष्करी धंद्यावर लोकांचा चांगला निर्वाह होत असे. तें साधन हल्लीं नाहींसें झालें आहे. या प्रदेशीं ज्यावर लोकांस आपला चरितार्थ चालवितां येईल असा खनिज द्रव्यांचा, औषधी द्रव्यांचा अथवा जंगलापासून उत्पन्न होणाऱ्या द्रव्यांचा, लहान किंवा मोठ्या प्रमाणावर चालणारा एकही कारखाना नाहीं. हल्लीं कांहीं लोक मुंबईस कारखान्यांत मजूरीकरितां जातात.

या प्रदेशांतील बहुतेक कुटुंबांची मालमत्ता २५ ते ५० रुपयांच्या आंत असते. कांहीं कांहीं घरीं धातूंचीं भांडीं आढळतात. दाग-दागिने दुर्मिळ असतात. यांचीं घरें कुडामेढीचीं व गवती असून त्याची किंमत ५।१० रुपयांपेक्षां अधिक असत नाहीं. कांहीं थोडीं घरें कच्च्या विटांचीं व कौलारू आढळतात. अशीं घरें असतांही त्याचा निर्मळपणा, त्या पुढील व मागील आंगणें, त्या भोंवतालचे नीटनेटके कट्टे, त्यावरील गर्द मंडप, त्यांतील तुळसीवृंदावनें, घराभोंवतालचीं वृक्षमर्यादित विस्तीर्ण आवारें ( परसवें ), सुंदर गोड पाण्याच्या विहिरी किंवा पाट, फलपुष्पांचे लहान मोठे वृक्ष व वेली, हीं थोड्या फार फर-कानें सर्वसाधारण असतात. अशा प्रकारची एखाद्या गरिबाची झोंपडी पाहून मन प्रसन्न व संतुष्ट होतें. प्रवाशास इतर ठिकाणचे मोठमोठ्या धनिकांचे वाडेही असे आनंददायक होत नाहींत. लोक अज्ञानी परंतु सात्विक, नीतिमान्, सत्यनिष्ठ, प्रामाणिक व कष्टाळू आहेत. हे पांथस्थांचें आदरातिथ्य करण्यांत तत्पर असतात.

## विशेष असलेलीं स्थळें, गांवें इत्यादींचें वर्णन.

**बावडें**—हें गांव सह्याद्रीचे पूर्वपश्चिम उत्तारावर वसलेलें असून, संस्थानचें मुख्य ठिकाण आहे. येथें संस्थानचीं सर्व सरकारी कामें चालतात. या ठिकाणीं पावसाची सरासरी २२५ इंच निघते. इ० स० १८९२ त ४०० इंच पाऊस पडला. येथें दरसाल चैत्रमासीं रामाचा उत्सव होत असून, त्यास ४।५ हजार रुपये खर्च होतात. हा उत्सव या संस्थानिकांचे घराण्यांत निळो सोनदेवापासून आजवर अव्याहत चालत आला आहे.

गगनगड हा किल्ला पन्हाळ्याचे भोज राजानें इ० स० ११७८—१२०९ त जे कितीएक किल्ले बांधिले त्यांतील एक आहे. याची समुद्रसपाटीपासून उंची २२४४ फूट आहे. हा सह्याद्रीच्या कोंकणांत उतरलेल्या एका उंच टेंकडावर असून, मुख्य पर्वतापासून फार थोड्या अंतरावर आहे. याच्या सर्व बाजूंनीं तुटलेला कडा असून, तो एका अंगास लहानशा भागानें मुख्य पर्वतास जोडला आहे. या सांध्याच्या २ बाजूनें २ घाट कोंकणांत गेले आहेत. हा सांधा कांहीं थोडा मुख्य पर्वत उतरून गेल्यावर लागतो. तेथपर्यंत एकच घाट असून तेथें त्याचे २ फांटे झाले आहेत. या सांध्याच्या कण्यावरून गडावर जाण्याचा रस्ता असून, तो तुटलेले कड्याचे काठाबरोबर अरुंद व अवघड चढणीचा आहे. हा किल्ला स्वाभाविकपणें बिकट व दुर्भेद्य असून, कृतींचे बांधकामांनीं जास्त बळकट केला आहे. याचे वायव्य कोंपऱ्यास एक अवघड चोरवाट असून ती कोंकणांत गेली आहे. किल्ल्यावर गोड पाण्याचीं विपुल टाकीं आहेत. बाले किल्ल्यावर तळ्याचे आकाराची एक मोठी विहीर असून सध्यां ती नादुरुस्त आहे. येथें धान्याचीं व दारूगोळ्याचीं कोठारें पडक्या स्थितींत आहेत. किल्ल्यावर " गडदी " या नांवाचा एका खडकाखालीं कोरलेला सभामंडप आहे.

या मंडपाचे ३ बाजूंस व माथ्यावर खडक असून चवथ्या उघड्या बाजू-पुढें थोड्या अंतरावर एक मोठा खडक आडवा आला आहे. यामुळें लढाईचे वेळीं हें ठिकाण शत्रूचे गोळ्यांपासून बचावाचें मोठें साधन झालें आहे. बाले किल्ल्यावर सुबराव कृष्ण अमात्य यांनीं बांधिलेला एक पिराचा दरगा अद्यापि बऱ्या स्थितींत आहे.

हा किल्ला इ० स० १६६०त मराठ्यांचे ताब्यांत आला असून शिवाजीनें निळो सोनदेव यास जहागीर दिला. नंतर थोडे दिवस हा अली अदीलशहाचे ताब्यांत गेला व पुन्हां मराठ्यांचे ताब्यांत आला. तो इ० स० १६८९ पर्यंत मराठ्यांचे ताब्यांत होता. मोंगलांनीं संभाजीस धरल्यानंतर कांहीं थोडे दिवस हा मोंगलांचे ताब्यांत गेला. त्याजपासून इ० स० १६८९ ते १७००त रामचंद्रपंत अमात्यानें परत घेतला. त्यावेळीं हा राजारामानें त्यास सरंजामांत दिला. पुढें हा कोल्हापूरचे संभाजीराजे यांनीं भगवंतरावाकडे कायम केला. या वेळीं बावडेकर यांचा कोंकणांत मालवण व विजयदुर्गपर्यंत मुलूख असून हे स्वार व २५ हजार पायदळ ठेवून स्वाऱ्या करीत असत. इ० स० १८००त सुबराव अमात्यांनीं या किल्ल्याची दागदुजी केली आणि हा घेण्याकरितां येणारे पेशव्याचे सरदाराचा पराभव करून त्यास ठार मारिलें. इ० स० १८४५–४६ सांत या किल्ल्याची तटबंदी अंशतः पाडून टाकिली. तेव्हांपासून यावरील वसाहत मोडली.

नाधवडें — येथें पाण्याचे मोठमोठे उभाडे किंवा कारंजासारखे उडणारे झरे आहेत. कांहीं कालापूर्वी यांतील एक उभाडा इतके जोराचा होता कीं, त्यावर धान्याचा मुडा ठेविला असतां तो त्यास चेंडूप्रमाणें उडवीत असे. ज्या खडकांत हा आहे त्यास कालांतरानें भेगा पडत पडत आतां त्याचा जोर कमी झाला आहे.

कोकिसरें - येथेंही पाण्याचे उभाडे आहेत येथें मातीचीं भांडीं व कवलें चांगलीं होतात. या गांवाचे 'सालवा' नांवाचे डोंगरांत कमी खसखशीत असे सहाणेचे दगड सांपडतात.

पोंभुर्लें— हें खाडीकिनाऱ्यास लहानसें बंदर आहे.

मौंदें — या गांवीं बुजालेला एक पडसर तलाव असून त्याचे आजूबाजूस खणीत किंवा नांगरीत असतां, कधीं कधीं जुन्या काळचे प्रपंचोपयोगी पदार्थ सांपडतात. प्राचीन काळीं या ठिकाणीं फार मोठी वसाहत होती असें ह्मणतात.

संभापूर हें ठिकाण बावड्यानजीक असून, येथें पहिले संभाजीचा मुक्काम असतां त्याचे नांवाचें गांव वसलेलें होतें. हल्लीं या ठिकाणीं गांव नसून फक्त एक बाग आहे. ३०।३५ वर्षांपूर्वीं या ठिकाणीं पडक्या घरवंदाच्या जागा दिसत असत.

सांगशी — या गांवचे पश्चिम अंगास एक देवालय असून त्यांत एक शिलालेख आहे. कांहीं वर्षांपूर्वीं हमीक साहेब अ० पोलिटिकल एजंट यांनीं तो लेख उतरून मुंबईस पाठविला. त्यांतील अर्थावरून हें ठिकाण एका जैन राजकन्येचें सती गेल्याचें व त्या ठिकाणीं इमारत बांधिल्याचें आहे असें समजतें.

पळसंबें---या गांवचे एका ओढ्यांत दगडाचे कोरीव मंडप आहेत. या ठिकाणीं शिवरात्रीचे दिवशीं आजूबाजूचे गांवचे पुष्कळ लोक स्नानास व यात्रेस जमत असतात.

रंभापात्र--हें कोरींव लेणें करूळ घाटांतील एका खडकांतील गुहेंत असून, तें हल्लीं गुहेच्या तोंडाशीं मात्र पाहतां येतें.

सह्याद्री---या पर्वतावर उभें राहून याची कोंकणाकडील उतरण, तुटलेले कडे व याचींच कोंकणांत उतरलेल्या फांट्यांवरील शिखरें हीं पाहिलीं असतां त्यांत, ज्याप्रमाणें नदीचें पाणी उतरल्यावर तींतील वाळूचे निरनिराळे समांतर असे थर दिसतात त्याप्रमाणें याचेही थर समांतर असे स्पष्ट दिसतात. यावरून एके काळीं हा पर्वत समुद्राचा किनारा होता या ह्मणण्याची सत्यता भासते.

या पर्वतावरून समुद्राचे पाण्याची एक पट्टी दिसते. या पट्टींत, त्यावरील धुक्यांत किंवा वाफेंत सूर्यबिंब क्षितिज मर्यादेजवळ असतां किंवा खालीं गेलें असतां अथवा किरण वक्रीभवन व परावर्तन पावण्यानें दिसत असतां निरनिराळे आकाराचें दिसतें. क्वचित् प्रसंगीं याचवेळीं समुद्रांतून जाणाऱ्या आगबोटी सूर्यबिंबावरून जातातसें दिसतें. या पर्वताचे मोठमोठे व दूरवर गेलेले फांटे, उंच उंच शिखरें, खोल खोल दऱ्या, भिंतीप्रमाणें तुटलेले कडे, विस्तृत खोरीं व त्यांतून वाहणारे जल-प्रवाह, पर्वतशिखरावरील व बाजूचीं लहान मोठीं अरण्यें, हीं इतकीं भव्य व विशाल आहेत कीं पाहणाराचे मनांत प्रथम भीति, नंतर गांभीर्ययुक्त चकितपणा आणि त्या मागून आनंद हीं उत्पन्न करितात. या पर्वतावरून पाहण्यासारखे निरनिराळे ऋतूंतील देखावे अवर्णनीय असतात इतकें ह्मणणें ह्या ठिकाणीं पुरें आहे. यापेक्षां अधिक वर्णनाचें हें ठिकाण नव्हे.

